# "मराठा कालखंडातील पराक्रमी महार सरदार : एक अभ्यास (इ.स.१६५० ते १८१८)"



स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
सामाजिक शास्त्रांतर्गत
इतिहास विषयातील पीएच.डी. पदवी
करिता सादर केलेला शोध प्रबंध.

• संशोधक •
प्रा. प्रकाश संभाजीराव वाघमारे
(इतिहास विभाग प्रमुख)
नारायणराव वाघमारे महाविद्यालय
आ. बाळापूर ता. कळमनूरी जि. हिंगोली

• मार्गदर्शक •
डॉ. विश्व. लक्ष. कालेकर
प्रपाठक व इतिहास विभाग प्रमुख (यु. जी., पी. जी.)
वसंतराव नाईक महाविद्यालय, वसरणी, नवीन नांदेड.

जानेवारी - २००७

# प्रमाणपत्र

*प्रमाणित करण्यात येते की, प्रा. प्रकाश संभाजीराव वाघमारे यांनी "**मराठा कालखंडातील पराक्रमी महार सरदार : एक अभ्यास (इ.स. १६५० ते १८१८)**" या विषयावरील शोधप्रबंध स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या सामाजिकशास्त्रे शाखेअंतर्गत पीएच.डी. पदवी करीता माझ्या मार्गदर्शनाखाली संशोधन पूर्ण केले आहे.*

*त्यांनी केलेले संशोधन कार्य हे त्यांचे स्वत:चे असून त्यांनी वापरलेल्या आवश्यक त्या संदर्भस्त्रोत्रांचा योग्य निर्देश शोध प्रबंधात करण्यात आलेला आहे. तो इतर कोणत्याही विद्यापीठातील अन्य पदवी किंवा पदवीकेसाठी सादर केलेला नाही.*

स्थळ : नांदेड

दिनांक :२२/०१/२००७

मार्गदर्शक

**डॉ. विश्व. लक्ष. कालेकर**
प्रपाठक व इतिहास विभाग प्रमुख (यु. जी., पी. जी.)
वसंतराव नाईक महाविद्यालय, वसरणी, नवीन नांदेड.

M.A.Ph D
Reader in History,
Vasantrao Naik College New Nanded

# प्रतिज्ञा पत्र

*मी प्रतिज्ञापूर्वक नमूद करतो की, "**मराठा कालखंडातील पराक्रमी महार सरदार : एक अभ्यास (इ.स. १६५० ते १८१८)**"*

*हा प्रबंध मी स्वतः संशोधनपूर्वक लिहिला असून प्रबंधातील सर्व मजकूर माझ्या संशोधनपर अभ्यासावर आधारलेला आहे. हा प्रबंध या पूर्वी मी कोणत्याही विद्यापीठात कुठल्याही पदवीसाठी सादर केलेला नाही.*

स्थळ : आ. बाळापूर

दिनांक : २२/०१/२००७

**संशोधक**

**प्रा. प्रकाश संभाजीराव वाघमारे**
(इतिहास विभाग प्रमुख)
नारायणराव वाघमारे महाविद्यालय
आ. बाळापूर ता. कळमनूरी जि. हिंगोली.

# अनुक्रमणिका

*ऋणनिर्देश...*

शिवकाळ व पेशवेकालखंडामध्ये महारांनी आपल्या पराक्रमाच्या जोरावर दोन्ही सत्तांना स्थिर करण्यात मोठे योगदान दिले. अनेक प्रसंगी महारांनी आपला जीव दिला; परंतु सत्ताधाऱ्यांना कसलाही धोका होऊ दिला नाही; परंतु याच महाराच्या पराक्रमाची कदर पेशवेकाळात झाली नाही. पेशव्यांनी महारांच्या पराक्रमांचा गौरव करण्याऐवजी त्यांच्या गळ्यात मडके व कमरेला झाडू बांधून जीवन जगण्यास भाग पाडले. या महारांच्या पराक्रमाची ओळख व्हावी म्हणून हा विषय मी संशोधनासाठी निवडला आहे. या संशोधन कार्यासाठी अनेकांनी मला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष सहकार्य केले आहे. मी जीवनभर त्यांच्या ऋणात राहू इच्छितो. त्यांचा नामोलेख करून मी त्याच्या ऋणातून मुक्त होऊ इच्छित नाही; परंतु त्या बद्दलच्या जाणिवांच्या अभिव्यक्तीमुळे स्वत:च्या मणावरचा भार अल्पप्रमाणात का होईना कमी करण्याच्या उद्देशाने हा ऋणनिर्देशाचा प्रपंच मांडत आहे.

ज्यांच्या मार्गदर्शनामुळे हा शोधप्रबंध पूर्ण होऊ शकला ते माझे मार्गदर्शक डॉ. विश्व. लक्ष्य. कालेकर, ज्यांनी मला शोधदृष्टी दिली असे माझे मानसपिता प्राचार्य डॉ. अनिल सिंगारे (संत जनाबाई महाविद्यालय, गंगाखेड), डॉ. पंचशिल एकंबेकर (नांदेड), डॉ. अनिल कठारे (कंधार), डॉ. एस. एस. नरवाडे (मुंबई विद्यापीठ, मुंबई), प्रा उमाजी मस्के (उपप्राचार्य, सिध्दार्थ कॉमर्स कॉलेज, मुंबई), प्रा. अनंत कदम (मुंबई), प्रा. भारत कचरे, प्रा. शेखर घुंगरवार, प्रा. नागेश कांबळे, प्रा. प्रदिप बिराजदार (नांदेड), डॉ. बबन पवार (कळमनूरी), प्रा. दिलीप पाईकराव (वसमत), प्रा. रमेश ढगे, प्रा. अनमुलवाड, सुनिल ढाले (नांदेड)

त्याच बरोबर मा. कृष्णाराव भिसे पाटील, प्राचार्य डॉ. एस. आर. टकले, प्रा. विजय पाईकराव, प्रा. गोमचाळे, प्रा. उत्तम कऱ्हाळे, प्रा. विलास कऱ्हाळे, प्रा. भारत देशमुख, डॉ. जाधव, प्रा. गाढे, प्रा. सुरेश मुन, प्रा. श्रीमती शिंदे, प्रा. संध्या रंगारी, प्रा. किर्तनकार, प्रा. मोरे, प्रा. कदम, डॉ. इगळे,

माझ्या मित्र परिवारामधील अविनाश नरवाडे, बाबुराव नरवाडे, सुभाष वाघमारे, रमेश

पंडित, रमेश कदम, पंडित थोरात, यु. जे. नरवाडे, कांबळे सर, बालाजी थोरात, के. एम. थोरात, डॉ. शेषेराव नरवाडे.

माझी पत्नी सौ. रंजिता चि. प्रसेनजित, कु. प्रणिता यांनी मोकळीक व निवांतपना उपलब्ध करून दिला. आई-वडिल सौ. द्वारकाबाई संभाजी वाघमारे, जो माझ्या पाठिशी आर्थिक व मानसिक बळ देऊन खंबीरपणे उभा राहीला असा माझा लहान बंधू राजेश वाघमारे. मेव्हुणे गौतम बहादुरे (सी.आय.डी इन्स्पेक्टर, नांदेड), पुरभाजी कांबळे, विठ्ठल वाघमारे (काका), सोनबा वाघमारे (काका), माझे सासू-सासरे सौ. गंगाबाई विष्णू ढगे, वसंत खंदारे (हिंगोली), यांनी सदैव संशोधन कार्य करण्यासाठी मला प्रेरीत केले. त्यांच्या प्रोत्साहनामुळे मी हे संशोधन कार्य पूर्णत्वास नेऊ शकलो.

तसेच ग्रंथपाल, यशवंत महाविद्यालय नांदेड, ग्रंथपाल, पिपल्स महाविद्यालय नांदेड, ग्रंथपाल, संतजनाबाई महाविद्यालय, गंगाखेड, ग्रंथपाल, ज्ञानोपासक महाविद्यालय, परभणी व तसेच या शोध प्रबंधासाठी ज्या लेखकांच्या ग्रंथाचा मला पुरेपूर वापर करता आला त्या सर्व लेखकांच्या मी ऋणात राहू इच्छितो.

प्रस्तुत प्रबंधाचे अक्षरजुळणीचे अवघड काम गजानन बोखारे यांनी अत्यंत कमी वेळात आणि दर्जेदार करून दिले तेव्हा त्यांचे ही आभार मानने मी माझे कर्तव्य समजतो.

अजून ही प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष स्वरूपात प्रेरणा व सहकार्य मिळालेल्या व्यक्तिंचे नामोल्लेख न करता मी त्यांचे आभार मानतो.

संशोधक

प्रा. प्रकाश संभाजीराव वाघमारे

*प्रकरण पहिले*

# विषय प्रवेश

---

## १. प्रास्ताविक :

भारतीय इतिहासाचे अभ्यासाच्या दृष्टीकोनातून किंवा कालमापन पद्धतीनूसार ठळक असे तीन भाग पडतात.

१) प्राचीन कालखंड

२) मध्ययुगीन कालखंड

३) आधुनिक कालखंड

ब्रिटीशांचे भारतात आगमन होईपर्यंत प्राचीन काळाचा आरंभ हा वैदिक काळापासून होत असे; परंतु ब्रिटीशांच्या आगमनामुळे भारतीय इतिहासात शास्त्रीय संशोधनाला वेग आला. ऐतिहासिक स्थळांचा शोध घेण्यास प्राधान्य दिले. त्यामुळे १९२१ साली सिंधू संस्कृती प्रकाशात आली. म्हणून भारताच्या प्राचीन काळाचा आरंभ हा वैदिक काळापासून नव्हे तर तिच्याही अगोदर ५००० (पाच हजार) वर्षापूर्वी अतिशय प्रगत संस्कृती भारतात अस्तित्वात होती. ती म्हणजे सिंधू संस्कृती होय, हे आता सर्वमान्य झाले आहे. सिंधू ते मुसलमानांच्या आगमनापर्यंतचा काळ हा प्राचीन मानला जातो.

साधारणतः इ.स. १० व्या शतकापासून मुस्लिम आक्रमकांचे भारतावर आक्रमणे सुरू होतात; परंतु इ.स. १२०६ साली गुलाम साम्राज्य स्थापन झाले. तेथूनच मध्ययुगीन कालखंडाला प्रारंभ झाला. आतापर्यंतच्या भातीय राजकारणात, समाजकारणात, अर्थकारणात व धर्मकारणात मुलभूत बदल मुसलमांनी राजवटीने घडवून आणला. मुसलमानी राजवटीचा परिणाम भारताच्या प्रशासनावर ही मोठ्या प्रमाणावर जाणवतो. या कालखंडात उत्तरेत गुलाम घराणे, लोधी घराणे, मोगल घराणे, हे प्रमुख राजघराणी होऊन गेलेली आहेत. याच काळात दक्षिणेत आदिलशाही, कुतुबशाही, इमादशाही, निजामशाही, बरीदशाही आणि मराठे असे प्रमुख राज्यकर्ते आपापल्या कार्यक्षेत्रात कार्यरत होते.

दक्षिणेतील बहुतांश प्रदेश मुसलमानी राज्यकर्त्यांनी व्यापल्यानंतर सर्वांच्या मध्यभागी

छत्रपती शिवाजी महाराजांनी मराठी माणसाला सोबत घेऊन हिंदवी स्वराज्याची स्थापना करून हिंदूचे प्रबळ राज्य अस्तित्वात आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला. महाराष्ट्रात इ.. १६५० ते १८१८ ह्या एकशे अडुसष्ट वर्षाच्या काळाला मराठा कालखंड म्हणतात, या काळाचे पुन्हा अभ्यासाच्या दृष्टीकोनातून दोन प्रमुख टप्पे पडतात.

१) शिवशाही

२) पेशवाई

इतिहासाच्या अभ्यासाच्या दृष्टीकोनातून शिवशाहीचा कालखंड इ.. १६५० ते १७५० हा मानला जातो; परंतु इ.स. १७१३ मध्ये छत्रपती शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथ भट यांना पेशवाईचे वस्त्र प्रदान केले. म्हणून खऱ्या अर्थाने इ.स. १७१३ पासूनच पेशवाईस आरंभ होतो. असे म्हणण्यास हरकत नसावी. कारण इथून पुढे छत्रपती पदापेक्षाही पेशवा ह्या पदास जास्त महत्त्व आल्याचे दिसून येते. म्हणून प्रस्तुत शोध प्रबंधामध्ये छत्रपती शाहू महाराजांच्या काळातील महाराबद्दलच्या घटना पेशवाई कालखंडात घेण्यात आल्या आहेत.

शिवशाहीमध्ये छत्रपती शिवाजी महाराजांनी जी लष्करी निती अवलंबिली होती. त्यात पारंपरिक लष्करी सरंजामदार व लोकांना काढून त्या ठिकाणी पराक्रमी लोकांना सरळ लष्करात भरती केले जात होते. लष्करी भरती करत असताना छत्रपती शिवाजी महाराजांनी कधीही जातीला किंवा धर्माला प्राधान्य दिले नाही. महाराजांनी व्यक्तीची जात किंवा धर्म बघून नियुक्ती, पदोन्नती व निलंबन केलेले नाही. एकनिष्ठ आणि कर्तृत्ववान व्यक्ती मग तो कुठल्याही जातीधर्माचा असो, त्याच्या कर्तृत्वाला पूर्णपणे संधी प्राप्त करून दिली म्हणूनच बाजीप्रभू देशपांडे (ब्राह्मण),तानाजी मालुसरे (मराठा), जीवा महाल (न्हावी),सिद्दी इब्राहीम व नुरबेग (मुसलमान), गोदनाक,|रायनाक,|बहिरनाक, खंडनाक, महादनाक इत्यादी महार जातीतील लोकांना पराक्रमी म्हणून ओळखले जात होते. हिंदवी स्वराज्याच्या जडणघडणीत उपरोक्त सर्वांचा सहभाग प्रकर्षाने जाणवतो. राजा हा कितीही चांगला असला तरी त्यांच्या हाताखालची

सहकारी मंडळी कशी आहे. यावरच त्या राजाचे यश किंवा अपयश अवलंबून असते. छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या हिंदवी स्वराज्याच्या यशस्वी वाटचालीमध्ये अस्पृश्य मानल्या गेलेल्या महार या जातीच्या पराक्रमी लोकांनी आपला वैशिष्ट्ये पूर्ण असा ठसा उमटविलेला आहे; परंतु दूर्दैवाने आद्यापपर्यंत म्हणावे तसे संशोधन झालेले नाही. त्यामुळे ते उपेक्षित राहिलेले आहेत. शिवकाळातील आणि पेशवेकाळातील पराक्रमी महारांचा शोध घेऊन त्यांच्या शौर्यावर प्रकाश टाकणे प्रस्तुत शोध प्रबंधाचा मुख्य हेतू आहे.

### १.१ विषय निवडीचे महत्त्व व गरज :

प्रस्तुत शोध प्रबंधाच्या विषय निवडीचे महत्त्व सांगत असताना असे सांगता येईल की, महाराष्ट्रात मध्ययुगीन काळामध्ये अनेक जाती धर्माचे लोक राहात होते; परंतु या सर्व जाती वेगवेगळ्या प्रकारच्या वर्णांशी बांधलेल्या होत्या. त्या वर्णाची संख्या चार होती. १) ब्राह्मण २) क्षत्रिय ३) वैश्य ४) शुद्र. या चार वर्णामधील जो चौथा किंवा शेवटचा वर्ण होता, त्याचे परत शुद्र व अतिशुद्र असे दोन भागात विभाजन करण्यात आले होते. अतिशुद्रांनाच अस्पृश्य ह्या नावाने देखील ओळखले जात होते. या अस्पृश्य जातीमध्ये महार, मांग, ढोर, चांभार, यांचा समावेश होता. यापैकी महार ही जात प्रमुख होती. या बरोबरच यांची लोकसंख्या देखील इतर अस्पृश्य जातीपेक्षा जास्त होती. महार ही जात शूर, धाडसी, काटक, बुद्धीमान, इमानदार, प्रेमळ, संयमशील व पराक्रमी होती. यांनी मध्यमयुगीन कालखंडामध्ये जेवढे शासक झाले त्या सर्वांना आपल्या पराक्रमाच्या जोरावर सत्ता मिळवून दिली. ज्यामध्ये मुस्लिम शासक, शिवकालखंडातील राजे, पेशवाईतील शासक व ब्रिटीश सत्ताधिश यांचा समावेश आहे. ज्या महारांनी सर्वांना आपल्या पराक्रमाच्या जोरावर सर्व फायदे मिळवून दिले तेच महार मात्र सर्व अधिकारापासून वंचित राहिले. म्हणून यांच्या कार्यावर प्रकाश टाकने, मला महत्त्वाचे वाटते. महारांनी मध्ययुगीन काळात अनेक प्रसंगी प्रणांचे बलिदान देऊन आपला पराक्रम सिद्ध केला. त्या पराक्रमी कार्याची इतिहासात प्रकर्षाने नोंद होणे गरजेचे आहे. म्हणून महारांच्या

पराक्रमाला न्याय देण्याच्या हेतूने हा विषय निवडला आहे.

**१.२ संशोधनाची उद्दिष्ट्ये :**

१) महार हे भारतातीलच मूळ निवासी होते काय याचा शोध घेणे.

२) मध्ययुगीन काळातील महार व प्राचीन नागवंशीय लोक यांचा संबंध काय होता याचा शोध घेणे.

३) महारांवर अनेक प्रकारची कामे का लादली गेली याचा शोध घेणे.

४) महार हे चोर व गुन्हेगार होते का हे शोधणे.

५) महाराष्ट्रातील अनेक सत्ताधिशांच्या कारकिर्दीत महारांच्या पराक्रमी कार्याचा शोध घेणे.

६) महाराष्ट्रातील शासकांनी महारांना योग्य न्याय दिला काय ? हे पडताळणे.

**१.३ संशोधन विषयाची व्याप्ती व मर्यादा :**

प्रस्तुत शोध प्रबंधाचा विषय मराठा कालखंडातील पराक्रमी महार सरदार : एक अभ्यास (इ.स. १६५० ते १८१८) असा आहे. मराठ्यांचे साम्राज्य हे महाराष्ट्राच्या परिसरामध्ये होते; परंतु आर्थिक लाभासाठी व मराठ्यांचा दबदबा निर्माण करण्यासाठी मराठा कालखंडातील शासकांनी महाराष्ट्राच्या बाहेरही युद्धे केलेली आहेत. म्हणून प्रस्तुत शोध प्रबंधात त्या परिसरातील घटनांचा अंतर्भाव त्या त्या शासकाच्या कालखंडात करण्यात आला आहे. परंतु जास्तीत जास्त घटना ह्या महाराष्ट्रातीलच असल्यामुळे मूळ शोध प्रबंधाची व्याप्तीही महाराष्ट्र परिसर हीच आहे. या बरोबरच प्रस्तुत शोध प्रबंधाची मर्यादा इ.स. १६५० पासून इ.स. १८१८ या कालखंडापर्यंत आहे.

**१.४ संशोधन पद्धती :**

प्रस्तुत शोध प्रबंधात उपेक्षित अशा अनेक अस्पृश्य जातीपैकी महार या जातीच्या पराक्रमी कार्यावर प्रकाश टाकण्यात आला आहे. महार ही जात मध्ययुगीन कालखंडामध्ये समाजव्यवस्थेपासून व धर्मव्यवस्थेपासून दूर सारलेली होती. महारांना जवळ जवळ सर्व प्रकारचे

अधिकार नाकारले होते. म्हणून यांच्या पराक्रमाबद्दलची माहिती सांगणारी मूळ साधने सापडणे अशक्य आहे.म्हणून या जातीच्या पराक्रमाविषयी माहिती देत असताना, वृत्तेतिहास संशोधन पद्धतीचा अवलंब करण्यात आला आहे. यासाठी

१) प्रकाशीत मूळ साधने

२) दुय्यम साधने

३) मासिके, शब्दकोष व वृत्तपत्र

या साधनांचा आधार घेण्यात आला आहे.

**१.५ संशोधन विषयाच्या शिर्षकासंबंधी :**

प्रस्तुत शोध प्रबंधाचा विषय किंवा शिर्षक ''मराठा कालखंडातील पराक्रमी महार सरदार : एक अभ्यास (इ.स. १६५० ते १८१८)'' हा आहे. शोध प्रबंधाच्या शिर्षकातील सरदार हा शब्द पदवाचक या अर्थाने घेतला नसून तो गुणवाचक या अर्थाने घेण्यात आलेला आहे. ''महर या शब्दाचा अर्थ सरदार असा होतो आणि महर या शब्दाचे रूप महाराष्ट्रात महार असे बनले.''[१] म्हणून महार म्हणजेच सरदार होय. या बरोबरच विस्तारीत शब्द रत्नाकार या शब्दकोषामध्ये 'सरदार' या शब्दाचा अर्थ ''राजाच्या दरबारातील सभासद''[२] असा देण्यात आला आहे. सभासद म्हणजेच सदस्य व सदस्यालाच शिवकाळामध्ये मावळे असा शब्दप्रयोग होतो. या बरोबरच शिख धर्मामध्ये प्रत्येक व्यक्तीस सरदारजी हा शब्दप्रयोग वापरला जातो. याचे कारण असे की, शिख जात ही अत्यंत लढवयी व शूर जात म्हणून ओळखली जाते. शिखातील प्रत्येक व्यक्ती ही शूर, पराक्रमी समजली जाते. म्हणून त्यास सरदार म्हटले जाते. त्या प्रमाणेच महार ही देखील लढवयी व पराक्रमी जात होती. महार कुटुंबातील प्रत्येक पुरुष म्हणजे सैनिक व कुटुंब प्रमुख सेनापती होता. म्हणून महार जात देखील महाराष्ट्रातील शूर व लढवई जात असल्यामुळे सरदार हा शब्द त्यांच्या गुणावरून लावण्यात आला आहे.

प्रस्तुत शोध प्रबंधाची प्रकरण रचना सारांश रूपाने पुढीलप्रमाणे आहे.

**१.६ प्रकरण रचना :**

१) प्रकरण पहिले : विषय प्रवेश

२) प्रकरण दुसरे : महारांचा इतिहास

३) प्रकरण तिसरे : शिवकालखंडातील पराक्रमी महार

४) प्रकरण चौथे : पेशवेकालीन पराक्रमी महार

५) प्रकरण पाचवे : ब्रिटीश कालखंड आणि महार (१८१८ पर्यंत)

६) प्रकरण सहावे : उपसंहार

**१.६.१ प्रकरण पहिले : विषय प्रवेश**

प्रस्तुत प्रकरणामध्ये 'मराठा कालखंडातील पराक्रमी महार सरदार : एक अभ्यास (इ.स. १६५० ते १८१८)' या शोध विषयाच्या अनुषंगाने अभ्यास करीत असताना या शोध विषयाची प्रारंभीक मांडणी पुढीलप्रमाणे केली आहे.

१) प्रास्ताविक

२) विषय निवडीचे महत्त्व व गरज

३) संशोधनाची उद्दिष्ट्ये

४) संशोधन पद्धती

५) संशोधन विषयाच्या शिर्षकासंबंधी

६) प्रकरण रचना

७) उपसंहार

**१.६.२ प्रकरण दुसरे : महारांचा इतिहास**

मध्ययुगीन महाराष्ट्राच्या समाज जीवनामध्ये स्पृश्य आणि अस्पृश्य असे दोन प्रमुख घटक होते. अस्पृश्य या समाज घटकामध्ये महार, मांग, चांभार व ढोर इत्यादी जाती प्रमुख होत. महाराष्ट्रातील अस्पृश्यामध्ये महार ही जात अतिप्राचीन कालखंडापासून वास्तव्य करणारी

जात म्हणून ओळखली जाते. म्हणूनच महाराष्ट्रात गाव तेथे महारवाडा अशी म्हण प्रचलित आहे. यावरूनच महाराष्ट्रात महारांचे महत्त्व लक्षात येते. मध्ययुगीन कालखंडाच्या शिवशाही व पेशवाईमध्ये जातीव्यवस्था ही समाजव्यवस्थेचा आधारस्तंभ होती. मध्ययुगीन महाराष्ट्राच्या समाज घटकामध्ये ब्राह्मण, कायस्थ, मराठा, लिंगायत, धनगर, हटकर, मुसलमान, सुतार, लोहार, चांभार, महार, कुंभार, मांग, परीट, न्हावी, भट, मुलाना, गुरव, कोळी, गोंधळी, भोई, शिंपी, तेली, माळी, साळी, कासार, बुरुड, जिनगर, शिकलकर, बेलदार, घडशी, डवऱ्या गोसावी, गवंडी, पिंजारी, वंजारी, लमानी, वडार, घिसाडी इत्यादी जातीचे अस्तित्व आढळते. या जातीपैकी महार, मांग, चांभार व ढोर ह्या जातींचा समावेश अस्पृश्य किंवा अतिशुद्र या सदरामध्ये करण्यात आला होता. ''शिवशाही व पेशवाईच्या अस्सल कागदपत्रामध्ये महारांचा उल्लेख भूमिपुत्र, राबता, पाडेवार, तराळ, वेसकर, जागला, कोतवाल, ध्येड, अतिशुद्र, वेशीराखा इत्यादी नावाने वेगवेगळ्या संदर्भात केल्याचे दिसून येते''[३] वि.रा. शिंदे [४] यांनी आपल्या भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न या ग्रंथामध्ये ''महार हा शब्दप्रयोग म्हार या शब्दाचा अपभ्रंश आहे,'' असे मत व्यक्त केले आहे. तर कोसारे एच.एल.[५] यांनी ''महर या शब्दाचे रूप महाराष्ट्रात महार असे बनले'', यावरून असा निष्कर्ष निघतो की, मूळ महर या शब्दापासून म्हार शब्द तयार झाला. पुढे त्याचेच रूपांतर 'महार' असे झाले. प्राचीन भारताच्या राजवंशामध्ये 'नागवंश'हा एक प्रमुख वंश होता. भारताच्या विविध भागामध्ये नागवंशाची राज्ये होती. आर्यपूर्व काळात नागलोकांची संस्कृती अस्तित्वात होती. नागलोकांचे उल्लेख ऋग्वेदाच्या अनेक सुक्तामध्ये आढळतात. यावरून त्यांची प्राचीनता लक्षात येते. महाराष्ट्रातील महार लोक हे नाग लोकांचे वंशज होते या मताला इतिहासाचार्य वि.का.राजवाडे, राजारामशास्त्री भागवत, श्री.व्यं.केतकर, कोसारे एच.एल., शेणोलीकर, ह.श्री. देशपांडे, प्र.न., डॉ. आंबेडकर बी.आर. व डॉ.एन.जी.भवरे या सर्व इतिहास अभ्यासकांनी पाठींबा दिला आहे.

''नाक हा शब्द नाग शब्दाचा अपभ्रंशीत शब्द असून महार हे मध्ययुगीन काळात आपल्या

नावासमोर हा शब्द लावत''।[५] महाराष्ट्रातील महारांच्या उत्पत्तीबद्दल भारतीय आणि परकीय इतिहास संशोधकांनी आपापले सिद्धांत मांडले आहेत. यामध्ये म.ज्योतिबा फुले, डॉ. आंबेडकर, श्री.म.माटे, विठ्ठलरामजी शिंदे, वामनराव ए.भट, डॉ.दत्तात्रय पुरुषोत्तम खानापूरकर, कोसारे एच.एल., भारदे, त्र्य.ना.अत्रे, डॉ. रामकृष्ण भांडारकर या भारतीय संशोधकांशिवाय जॉन विल्सन, मोल्सवर्थ, डॉ. ओपार्ट, आर.ई.इन्थोव्हेन इ. परकीय विद्वानांनी महारांच्या उत्पत्तीचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे. या बरोबरच महारांच्या उत्पत्तीबद्दल अनेक दंतकथाही प्रकाशीत आहेत. वरील सर्व भारतीय, परकीय व दंतकथातील माहितीचा चिकित्सक अभ्यास केल्यानंतर महात्मा फुलेंची ''आर्यांचा सर्वात मोठा शत्रू म्हणजे महा + अरी = महार''।[७] ही उत्पत्ती योग्य वाटते.

भारतीय समाज व्यवस्थेमधील सर्व समाज घटकांना किंवा जातींना फुटीरतेचा शाप लागलेला दिसून येतो. ब्राह्मणी विचारधारेने भारतीय समाजव्यवस्थेचे हजारो जातीमध्ये आणि प्रत्येक जातीमध्ये श्रेष्ठ कनिष्ठत्वाची भावना वृद्धींगत होण्यासाठी असंख्य पोटजातीमध्ये विभागणी करून टाकली आहे. याला महार जात ही अपवाद नाही. महाराष्ट्रातील महार जातीमध्ये अनेक पोटजाती अस्तित्वात आहेत. पोटजातीच्या संख्येबाबत संशोधकामध्ये एकवाक्यता दिसून येत नाही. प्रत्येक संशोधक त्याला ज्ञात असलेल्या पोटजाती नमूद करतो. महारांच्या पोटजातींचा अभ्यास करणाऱ्या संशोधकापैकी काही मानांकित संशोधकांची मते पुढील प्रमाणे सांगता येतील.

''अलेक्झांडर रॉबर्टसन यांनी महारलोक या ग्रंथात महारातील पोटजातींची संख्या १८ (अठरा) सांगीतली आहे.''[८] ''मी. इंन्थोव्हेन या इंग्रज अधिकारी व समाजशास्त्रज्ञांनी महारातील पोटजातीची संख्या १५ (पंधरा) सांगीतली आहे.''।[९] ''भारतीय संस्कृती कोशात महारातील पोटजातींची संख्या ११ (अकरा)' सांगण्यात आली आहे.''[१०] ''शिवकाल व पेशवाईतील महारांचा इतिहास' या ग्रंथामध्ये डॉ.कठारे अनिल यांनी महारातील पोटजातींची

संख्या ६५ (पासष्ट) सांगीतली आहे.''[११] मराठीचे ज्येष्ठ साहित्यिक शंकरराव खरात यांनी ''महारातील पोटजातींची संख्या ५३ (त्रेपन्न) सांगीतली आहे.''[१२] या बरोबरच ''संयुक्त महाराष्ट्राचा ज्ञान कोश यात महारांच्या पोटजातींची संख्या ५३ सांगीतली आहे.''[१३] महारजातीतील पोटजातींचा चिकित्सक अभ्यास केल्यास असे दिसून येते की, वरील पोटजाती ह्या प्रादेशिकतेवरून उद्योग धंद्यावरून पडेलल्या आहेत. यामुळे संपूर्ण महार जातीमध्ये कसलाही वांशीक भेद नाही. महार जातीतील पोटजातीमध्ये जी काही उच्च निचतेची भावना जोपासली जाते तो ब्राह्मणी मानसिकतेच्या प्रभावाचा एक प्रकार आहे.

महाराष्ट्रामध्ये मध्ययुगीन काळात सर्व जाती धर्माची कामे परंपरेने निश्चित केलेली होती. एक जात आपले काम सोडून इतर जातीचे काम करू शकत नव्हती किंवा आपला व्यवसाय सोडण्याचे धाडस सुद्धा करू शकत नव्हती. प्रत्येक जातीची कामे ठरवून दिलेली होती. उदा. कुंभाराने मातीची भांडी तयार करावी. लोहाराने लोखंडी अवजारे बनवावेत. सुताराने लाकडी सामान तयार करावे, तेल्याने तेल गाळावे, चांभाराने पादत्राने बनवावीत इत्यादी. परंतु महारांना मात्र एकच काम नव्हते. त्यांना विविध प्रकारचे प्रशासनातील गावातील व शेतातील कामे करावी लागत. म्हणून महारांना मराठेकालीन कागदपत्रा 'हरकाम्या' असे संबोधलेले दिसून येते. यांच्या कामाचे वर्गीकरण चार भागात करण्यात आले आहे. (अ) सरकारी कामे (ब) गावातील कामे (क) वेठबिगारी (ड) इतर कामे.

**अ) महारांची सरकारी कामे**

१) प्रशासकीय अधिकाऱ्यांची सेवा करणे [१४]

२) प्रशासकीय निरोप देणे [१५]

३) शिवतंटा सोडविणे व साक्ष देणे [१६]

४) महसूल व्यवस्थेत काम [१७]

५) चोरीचा तपास लावणे [१८]

६) गावचे रक्षण करणे [१९]

७) सरकारी कामगार व गावची वेठबिगारी वाहाने [२०]

८) साफसफाई करणे [२१]

९) दवंडी देणे [२२]

१०) मार्गदर्शक व वाटाड्या [२३]

११) पिकांचे रक्षण करणे [२४]

१२) जन्म-मृत्यूची नोंद ठेवणे [२५]

**ब) गावातील कामे**

१) सण व उत्सवा वेळची कामे [२६]

२) सरपण फोडणे व आणणे [२७]

३) प्रेतासाठी खड्डा करणे [२८]

४) मुऱ्हाळी म्हणून जाणे [२९]

५) निरोप पोहोचविणे [३०]

६) होळीसाठी गोवऱ्या व लाकडे पुरविणे [३१]

७) मृत्यूची बातमी देणे [३२]

८) शेतकऱ्यांचे ओझे वाहून नेणे [३३]

**क) वेठबिगारी कामे :**

''गावगाड्याचा महार हा हरकाम्या शिपाई व वेठबिगारी होता. महारास सर्व वतनदाराकडे वेठबिगारी म्हणून राबावे लागे''।[३४]

**ड) महारांची इतर कामे :**

**१) वेसकर :**

वेसकरकी किंवा येसकरकी हा महारकीच्या वतनाचा एक पोट विभाग आहे. ''येसकर

म्हणजे मुकदमाच्या हाताखाली गावाची रात्री गस्त घालणारा आणि गुन्ही, गुन्हेगारी शोधून काढणारा मनुष्य असे.''[३५]

**२) जागला :**

वेसकरकी प्रमाणेच जागलकी हा महारकीच्या वतनाचाच एक पोट विभाग होता. जास्तीत जास्त जागले हे महार जातीचेच आढळतात. ''जागल्यास गावच्या शिवाराची सर्व माहिती ठेवावी लागते. शेत, बांध, उरूळ्या तसेच कोणाच्या शेतात काय पेरले व कोणते शेत पडीक आहे, यावर ही त्यास निगराणी ठेवावी लागे. शेतजमीनीच्या सर्व तंट्यात जागल्याची साक्ष महत्त्वाची मानली जाई.''[३६]

**३) प्रसुती व गर्भपात करण्याचे काम [३७] :**

महार ही भारतातील अतिपुरातन जात आहे. या बरोबरच ते या भूमिचे मूळ पुरुष आहेत. म्हणूनच यांना 'भूमिपुत्र' असे म्हटले आहे. महार हे अत्यंत कर्तबगार व पराक्रमी होते. एकंदरीत महारांच्या कर्तबगारी वरूनच या प्रदेशास 'महाराष्ट्र' हे नाव पडले आहे. मोल्सवर्थ यांच्या शब्द कोशात जॉन विल्सनयांनी दाखवून दिले आहे की, ''गुजर + राष्ट्र = गुजराथ असे होते तसेच महार + राष्ट्र = महाराष्ट्र असे होणे सत्य आहे.''[३८] महारापासूनच या प्रदेशास महाराष्ट्र हे नाव पडले या मतास आलेक्झांडर रॉबर्टसन, महात्मा फुले, श्री वामन भट, डॉ. दत्तात्रय पुरुषोत्तम खानापूरकर, डॉ. एन. जी. भवरे, डॉ. ओपार्ट, सोमवंशी बी. सी., राजारामशास्त्री भागवत, डॉ. हटन यांनी पाठिंबा दिला आहे.

**१.६.३ प्रकरण – तिसरे : शिवकालखंडातील पराक्रमी महार**

छत्रपती शिवाजी महाराजांनी इ.स. १६५० मध्ये हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. या कालखंडात मुसलमान सत्तांचा पगडा महाराष्ट्रावर होता. या सत्तांना पायबंद घालून महाराष्ट्र स्वतंत्र करण्याचे स्वप्न छत्रपती शिवाजी महाराजांनी उराशि बाळगले होते. याच काळात महाराष्ट्रात मोठ्या प्रमाणावर जातीयता पाळली जात होती. समाज चार वर्णामध्ये विभागला

गेला होता. समाजात मोठ्या प्रमाणावर अंधश्रद्धा होती. याचाच फायदा या मुसलमानी सत्तांनी घेतला. यांना प्रतिकार करण्यासाठी जातीयता नष्ट करणे अत्यंत आवश्यक होते म्हणून सर्व प्रथम शिवाजी महाराजांनी 'सर्वधर्मसमभाव' या नीतीचा अवलंब केला. सर्व जातीतील लोकांना त्यांनी आपल्या लष्करात व प्रशासनात सामावून घेतले. आठरा पगड जातीतील लोक त्यांच्या सैन्यात होते. शिवाजी महाराजांनी आपल्या हिंदवी स्वराज्य स्थापनेच्या लढ्यात रामोशी, मुसलामन, पठाण, बेरड, भंडारी, धनगर, कोळी, बेलदार, भिल्ल, न्हावी, ब्राह्मण, मराठा या शिवाय ज्यांना गावकुसाच्या आत प्रवेश मिळत नव्हता अशा महार लोकांनाही सामावून घेतले. ज्या महारांना या समाजव्यवस्थेने दूर ठेवले होते त्या महारांच्या पराक्रमाची चुनूक छत्रपती शिवाजी महाराजांना आली होती. त्यांच्या पराक्रमाच्या जोरावर आपण स्वराज्याची निर्मिती करू शकतो या बद्दल महाराजांना खात्री झाली व अनेक महारांनी आपल्या प्राणाची आहुती देऊन, स्वत:च्या संसाराची राख रांगोळी करून मोठा पराक्रम गाजविला. महाराजांनी स्थापन केलेले स्वराज्य अभेद्य ठेवण्यास मदत केली. अशा या पराक्रमी महारांची सारांश रूपाने खालीलप्रमाणे माहिति सांगता येईल.

''इ.स. १६६५ मधील पुरंदर गडावरील मोगल व मराठे यांच्यातील संघर्ष विलक्षण आहे. मोगल बादशहा औरंजेबाने मिर्झाराजा जयसिंग व दिलेरखानास १४,००० सैन्य घेऊन दक्षिणेत शिवाजी महाराजाविरूद्ध रवाना केले. यातील ५००० सैन्यानी पुरंदर गडास वेढा दिला. यावेळी गडावर फक्त ७०० सैनिक होते. उभयतात मोठी लढाई सुरू होती अशातच मुरारबाजी जो गडावरील मराठा सैन्याचे नेतृत्व करत होता तो मारला गेला. परंतु गडावरील मावळ्यांनी न डगमगता लढा सुरूच ठेवला. गडावरील सैन्यामध्ये इतर जाती बरोबरच 'महार' सैन्य मोठ्या प्रमाणावर होते.''[३९] ''इ.स. २७ जुलै १६५२ रोजी गोदनाक महाराने मोकादमाचा जीव वाचविण्यासाठी स्वत:चा जीव दिला होता म्हणून त्याचा मुलगा अर्जनाक यास तराळचे वतन दिले.''[४०] ''छत्रपती शिवाजी महाराजांच्या तोफखान्यावर व शिबंदीमध्ये महार मोठ्या

प्रमाणावर होते.''[४१] ''कृष्णाजी अनंत सभासद यांच्या मते महाराजांच्या घोडदळात व पायदळात महारांचा समावेश होता.''[४२] ''रायनाक महाराने रायगड किल्ल्याचे सर्व दरवाजे बंद केल्यानंतर महाराजांच्या आज्ञेप्रमाणे गडावर चढून दाखविले यामुळे त्यास बक्षिस मिळाले.''[४३] ''औरंगजेबाच्या सैन्याने एक वेळा रायगड किल्यास वेढा दिला होता. हा वेढा बरेच दिवस असल्यामुळे किल्ल्यातील दारूगोळा व अन्नधान्य कमी होऊ लागले. यामुळे लोकांचे मोठे हाल होत होते. म्हणून महाराजांनी किल्ल्यामध्ये दवंडी दिली की जो कोणी गडामधून बाहेर पडण्यासाठीची चोरवाट दाखवेल त्यास बक्षिस दिले जाईल. यावेळी खंडू महाराने महाराजास चोर वाट दाखविली. खंडू गरीब असल्यामुळे तो शत्रुच्या पैशाच्या अमिशाला बळी पडून हि चोर वाट शत्रुला सांगू नये म्हणून महाराजांनी खंडूस त्याचे पाय मागीतले. खंडूने देखिल न डगमगता महाराजास आपले पाय दिले. व महाराज सुखरूप बाहेर पडावेत म्हणून रायगड किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या रायरोबा या देवास आपला एकुलता एक मुलगा फूल म्हणून वाहिला.''[४४] ''पुरंदर किल्ल्याचे रक्षक म्हणून अविचारे व बेगले महारांची नेमणूक करण्यात आली होती.''[४५] ''महाराजांच्या काळात पुरंदर किल्ल्याचा किल्लेदार म्हणून चिव्हे महार हा होता.''[४६] ''छत्रपती शिवाजी महाराजांच्या पायदळामध्ये बहिरनाक महार हा नाईक या पदावर होता.''[४७] छत्रपती शिवाजी महाराजांनी इ.स. १६५९ नंतर सिद्धीचा बंदोबस्त करण्यासाठी बाजी पासलकर यास मोठे सैन्य देऊन पाठविले होते. या वेळी ''बाजी पासलकराचे अंगरक्षक म्हणून खंड्या महार व येल्या मांग हे शूर शिपाई होते.''[४८] छत्रपती शिवाजी महाराजांच्या स्वराज्याचा आत्मा म्हणजे किल्ले हा होता. यात भुईकोट, डोंगरी व जलदूर्ग असे तीन प्रकार होते. डोंगरी किल्ल्याच्या उतरणीवरील सपाट भागावर वस्ती असे त्यास मेट किंवा मेटे म्हणत. या मेट्या वरती मेटनाईक म्हणून बहुधा महारच असत. या मेट्यानांच संरक्षण चौक्या म्हणत. शिवाजी महाराजांच्या काळात 'खंडनाक' [४९] 'बेगले महार' [५०] व 'महादनाक' [५१] हे मेटकर म्हणून होते. या बरोबरच ''छत्रपती शिवाजी महाराजांची मुलगी सखुबाई हिच्यावर एकदा संकट आले होते त्या वेळी

वाल्हे येथील महार तिच्या कामी आले. म्हणून तिने त्यांना आपला भाऊ म्हटले म्हणून त्यांचे अडनाव भोसले पडले.''[५२] शिवाजी महाराजांच्या काळात जसा महारांनी पराक्रम गाजविला तसाच पराक्रम छ. राजारामाच्या काळातही नागनाक महाराने गाजविल्याचे दिसून येते. ''मौजे नागेवाडी प्रांत वाई येथील पाटीलकी ही मूळची महारांची होती. येथे नागनाक महार पाटील म्हणून होता. याने दोन गुरव पूजा करून राहण्यासाठी आनले होते. परंतु त्यांनी नागनाकाची पाटीलकी बळकावली. याची तक्रार नागनाकाने परशुरामपंत प्रतिनिधीकडे केली. परशुरामपंतांनी नागनाकाच्या बाजूने निर्णय दिला. नंतर हे गुरव राजाराम महाराजांकडे तक्रार घेऊन गेले. हि तक्रार पुन्हा आल्यामुळे राजाराम महाराजांनी महारास धारदिव्य करण्याचा आदेश दिला. यामध्ये मोगलकडील वैराटगड जिंकून स्वराज्यात विलीन करावा व पाटिलकीचे वतन प्राप्त करावे अशी ती अट होती. हे आव्हान नागनाकाने स्विकारून वैराटगट जिंकून छ. राजारामाच्या स्वाधीन केला व पाटिलकीचे वतन मिळविले. ''[५३] याच काळात शिदनाक महाराने स्वत:ची मोठी फौज निर्माण करून मोगलांची दाणादाण उडवून दिली होती.''[५४] मध्ययुगीन कालखंडामध्ये जातीयतेने मोठे थैमान घातले होते. अस्पृश्य जातींना माणूस असून ही प्राण्यापेक्षाही हिन वागणूक येथील सवर्णांकडून मिळत होती. याच वेळी मुस्लिम सत्ताधिशांनी आपली सत्ता महाराष्ट्रात स्थिर करण्याचा मोठा प्रयत्न सुरू केला होता. यासाठी त्यांनी महाराष्ट्रातील बहिष्कृत जातीचा आपल्या सैन्यात मोठ्या प्रमाणावर समावेश केला होता. यामध्ये महार जात ही मोठ्या प्रमाणावर होती. नंतर महारांना येथील हिंदुपेक्षा परकीय मुस्लिम जवळचे वाटू लागले, म्हणून ''अनेक महारांनी मुस्लिम धर्म स्विकारल्याचे दाखले प्राप्त झाले आहेत.''[५५] महारांच्या या धर्मांतर सत्रामुळे अनेक पराक्रमी महार मुस्लिम बनले यामुळे त्यांचे पूर्वीचे नाव बदलून मुस्लिम नाव देण्यात आले. यामुळे धर्मांतरीत महार हा देखील एक संशोधन विषय बनू शकतो.

**१.६.४ प्रकरण चौथे : पेशवेकालीन पराक्रमी महार :**

मराठा कालखंडाचे अभ्यासाच्या दृष्टीने दोन भाग पडतात, शिवकालखंड व पेशवाई इ.स. १६५० ते १७५० हा शिवकालखंड मानला जातो तर इ.स. १७५० ते १८१८ हा कालखंड पेशवाईचा मानला जातो; परंतु खऱ्या अर्थाने छत्रपती शाहू महाराजांच्या काळापासूनच पेशवाईस प्रारंभ झाल्याचे दिसून येते. इ.स. १७१३ मध्ये छ. शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथ भट यांना पेशवाईची वस्त्रे दिली. या नंतर पहिला बाजीराव पेशवा झाला. (१७२० ते १७४०), इ.स. १७४० ते १७६१ मध्ये बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब, इ.स. १७६१ ते १७७२ मध्ये थोरला माधवराव इ.स. १७७२ ते १७७३ नारायणराव, इ.स. १७७४ ते १७९५ मध्ये सवाई माधवराव, इ.स. १७९५ ते १८१८ बाजीराव दुसरा हे पेशवे होते. अशा प्रकारे इ.स. १८१८ पर्यंत पेशवाई होती. शिवकालखंडा नंतर सत्तेत आलेल्या पेशवाईमध्ये देखील महारांनी आपल्या तलवारीचे पाणी शत्रूंना पाजण्यात कसलीच कसूर केली नव्हती. परंतु पेशवाईत त्यांच्या गुणाचा योग्य गौरव न करता त्यांना किळसवाणे जीवन जगावे लागले तरी महारांनी मालकाशी कधीच गद्दारी केली नाही. पेशवाईतील महारांचा पराक्रम खालीलप्रमाणे सांगता येईल.

जो शिदनाक राजारामाच्या काळात होता त्याच शिदनाकाने शाहू महाराज व ताराबाई यांच्यातील सत्ता संघर्षाच्या काळात शाहू महाराजांची बाजू घेऊन त्यांना सत्ता मिळवून देण्यात मोठा सहभाग नोंदविला. ''छत्रपती शाहू महाराजांनी सत्ता प्राप्तीनंतर त्यांना ज्यांनी ज्यांनी मदत केली होती त्यांना त्यांच्या कामगिरीप्रमाणे बक्षिसे दिली त्यात शिदनाकास कळंबी गाव इनाम म्हणून दिले. तसेच त्यास वस्त्रालंकार व बसण्यास पालखी दिली.''[५६] इ.स. १७३९ मध्ये मराठे व पोर्तुगीज यांच्यामध्ये वसईची लढाई झाली. मराठा सैन्याचे नेतृत्व चिमाजी अप्पा करत होता. यावेळी ''तुकनाक महाराने वसईचा किल्ला चिमाजी अप्पास जिंकून दिला होता. या शौर्याबद्दल त्यास कंठी, कडी व तोडे बक्षिस देण्यात आले होते.''[५७] याच वसई माहिमेत उत्तम पोहणारे महार होते. त्यांनी ''वसई वेढ्याच्या वेळी माणसे, पत्रे व युद्ध सामुग्री इ. सामान

पाण्यातून युद्ध स्थळी पोहोचविण्याचे काम केले होते त्या पराक्रमी व धाडसी महारात सिता महार, फकिरा मार, बिरा महार, याण महार, हंसा महार यांचा समावेश होता.''[५८] ''इ.स. १७५२ साली शिराळे गुमट येथील लढाईत तीन महार गोळी लागून जखमी झाले होते. या वेळी चिमाजी आप्पाच्या पाटीत गोळी लागली होती त्यास खंडनाक महाराने पाटिवर उचलून घेऊन सुरक्षीत स्थळी आनले होते.''[५९] इ.स. १७६० साली मराठे व निजाम यांच्यामध्ये उदगीरची लढाई झाली होती. या वेळी माणिक महार हा मराठ्यांच्या विरूद्ध व निजामाच्या बाजूने लढत होता. ''या लढाईत निजाम मोठ्या संकटात सापडला होता. तेव्हा माणिक महाराने निजामास खांद्यावर घेऊन एका चोर वाटेने गोदावरी नदी ओलांडून राक्षसभुवन येथे सुरक्षित आणले होते. परंतु ही वाट इतरांना कळू नये म्हणून निजामाने त्यास ठार मारले. ज्या मार्गाने माणिक महाराने निजामास आणले होते तो मार्ग आजही माणिकदंड या नावाने ओळखला जातो.''[६०] आरबी समुद्रामध्ये जंजिरा नावाचा किल्ला होता. या किल्ल्यावर आफ्रिकेतील ॲबिसीनिया देशाच्या सिद्धीची सत्ता होती. छ. शिवाजी महाराजांनी इ.स. १६७६ पर्यंत हा किल्ला जिंकण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यांना अपयश आले. छ. शाहू महाराजांच्या काळात परत सिद्धी सात सोबत संघर्षाला प्रारंभ झाला. यावेळी चिमाजी अप्पा मराठ्यांच्या सैन्याचे नेतृत्व करत होता. याने उभयतांच्या संघर्षात सिद्धी सातला ठार केले. ''जंजिऱ्याच्या या मोहिमेत कोंडनाक महार हा सिद्धी सात याच्या बाजूने म्हणजेच मराठ्यांच्या विरूद्ध लढत होता.''[६१] इ.स. १७९५ मधील खर्ड्याच्या लढाईत शिदनाकाने आपल्या फौजेसह सामील होऊन मोठा पराक्रम गाजविला. या वेळी त्याने परशुराम भाऊ पटवर्धन यास मोठ्या संकटातून सहिसलामत बाहेर आणले.''[६२] पेशवाई मध्येच ''रायगड किल्ल्याचा किल्लेदार म्हणून रायनाक महार होता. हा ब्रिटिशा सोबत सतत पंधरा दिवस लढला तो स्वत: संपला; परंतु त्याने किल्ला ब्रिटिशांना जिंकू दिला नाही.''[६३] या बरोबरच पेशवाईच्या काळामध्ये ''अनेक महार पथकदार होते यांची उपलब्ध संख्या ४४ आहे.''[६४] ''युद्धाच्या वेळी जे सैनिक रणभूमिवर जखमी अवस्थेत पडलेले असत त्यांना

आणण्याचे धाडसी काम देखील महारांनी केल्याचे दिसून येते.''[६५] ''उडत रूमाल ही बहुमानाची पदवी देखील महारांना दिली गेली होती.''[६६] पेशवाई मध्ये ''महार लोकांचा वापर हुलस्वार म्हणून केल्याचेही दिसून येते.''[६७] ''पेशव्यांच्या दरबारात त्यांच्या जनानखान्याचे रक्षक म्हणून महारांची नेमणूक केली जात असे.''[६८] या वरून पेशवाईतील महारांच्या पराक्रमाची कल्पना येते.

**१.६.५ प्रकरण – पाचवे : ब्रिटिश कालखंड आणि महार (१८१८ पर्यंत)**

छत्रपती शिवाजी महाराजांनी जात, धर्म या गोष्टीचा विचार न करता गावकुसा बाहेरच्या महारांच्या पराक्रमी वृत्तीमुळे, त्यांना गावात प्रवेशीत करून हिंदवी स्वराज्य स्थापनेत त्यांची मदत घेतली. महारांनी देखील अनेक प्रसंगी आपला प्राण सोडला; परंतु महाराजांच्या विश्वासास तडा जावू दिला नाही. असेच कार्य महारांनी पेशवाईत देखील केले; परंतु पेशवाईत महारांच्या पराक्रमाचे गोड कौतुक होण्या ऐवजी त्यांना पदोपदी अपमान व अवहेलना सहन करावी लागली. माणूस असून प्राण्यापेक्षा ही हीन दर्जाचे जीवन जगावे लागले. तरीपण महारांनी मालका सोबत कधीही गद्दारी केली नाही; परंतु पेशव्यांनी अन्याय व अत्याचाराचा कळस गाठल्यामुळे नाविलाजास्तव महारांना इंग्रजांचे दरवाजे ठोठावणे भाग पडले. भारतात ब्रिटिश व्यापार करण्यासाठी आले होते. त्यांच्या हातात तराजू होता; परंतु व्यापार करत करत त्यांनी भारतीय राजकारण जवळून पाहिले. त्यावेळी त्यांना कळले की भारतीय लोक राजकारणापेक्षा जात, धर्म व अंधश्रद्धा यामध्ये जास्त गुंतले आहेत. ही बाब चाणक्ष ब्रिटिशांच्या लक्षात येताच त्यांनी तराजू फेकून तलवार हातात घेतली व राज्यकर्ते बनले. त्यांनी भारतातील जाती जातीतील वादास मोठ्या प्रमाणात खतपाणी घातले व स्वत:चा फायदा करून घेतला. त्यांनी स्व-संरक्षणासाठी व साम्राज्यविस्तारासाठी भारतात मोठे लष्कर उभे केले. लष्कर भरती करत असतांना जातीपेक्षा पराक्रमाला अधिक महत्त्व दिले. पूर्वीचा भारतीय इतिहास अभ्यासल्यानंतर त्यांना महार ही जात पराक्रमी जात असल्याचे दिसून आले, म्हणून त्यांनी आपल्या लष्करात

मोठ्या प्रमाणात महारांची भरती केली. इंग्रजांनी जातीस महत्त्व न देता गूण व पराक्रमाला जास्त महत्त्व दिले. इंग्रजांनी महारांच्या ताकदीचा फायदा स्वत:ची सत्ता स्थिर करण्यासाठी करून घेतला. शिवकाळ व पेशवाईप्रमाणेच ब्रिटिश सत्ता भारतात स्थिर करण्यात महारांचा सिंहाचा वाटा होता. हे पुढील महारांच्या पराक्रमी कार्यावरून सिद्ध होते.

महारांना हिंदू असूनही प्रस्थापित सवर्णांनी दूर लोटले होते. त्यांना आपल्या घरी कामास ठेवण्याचे मोठे काम इंग्रजांनी केले होते. ''आपले गृहकार्य चालविण्यासाठी ब्रिटिश गृहिणीला मदतीची आवश्यकता भासली तेव्हा त्यांच्या मदतीसाठी तिरस्कृत महार धावून आला व तो कार्यदक्ष घरगडी आढळला आणि घरची लहान मुले सांभाळण्यासाठी त्या महाराची बायको कुशल व विश्वासपात्रबाई सिद्ध झाली.''[६९] डॉ. आंबेडकर देखील म्हणतात की, ''इंग्रजामुळेच महारांना नशिब काढण्यास वाव मिळाला. पेशवाईतील अमानुष वागणुकीमुळे महारांना ब्रिटिश सैन्यात सामील होण्यावाचून गत्यंतर नव्हते.''[७०] डॉ. आंबेडकराप्रमाणेच महात्मा फुले म्हणतात की, ''इंग्रज लोक आज आहेत, उद्या नाहीत. ते आपल्या जन्मास पुरतील म्हणोन कोणाच्याने खास करून सांगवत नाही. यास्तव त्या लोकांचे राज्य या देशात आहे, तोच आपण सर्व शुद्रांनी जलदी करून भटांच्या वडिलोपार्जित दास्यत्वापासून मुक्त व्हावे यामध्ये मोठा शहाणपणा आहे.''[७१] महात्मा फुले यांनी असे आव्हान करण्यापूर्वी कितीतरी अगोदर महारांनी ब्रिटिश सैन्यात प्रवेश केला होता; परंतु या समाजसुधारकांनी अस्पृश्याच्या उद्धाराच्या दृष्टीने पुन्हा हा सल्ला दिलेला होता. इस. १७५१ साली इंग्रज व पेशवे यांच्यात अर्काटची लढाई झाली. हे युद्ध महारांनी स्पृश्या विरुद्ध अस्पृश्य या पद्धतीने लढून इंग्रजांना मोठा विजय प्राप्त करून दिला होता.''[७२] ''इ.स. १७५७ मध्ये बंगालचा नबाब सिराजउद्दोला व ब्रिटिश गव्हर्नर जनरल क्लाईव्ह यांच्यात प्लासीची लढाई झाली यात देखील महारांनी मोठा पराक्रम गाजवून ब्रिटिशांना विजय मिळवून दिला.''[७३] ''इ.स. १८०२ -०३ साली बाजीराव दुसरा व वेलस्ली यांच्यामध्ये दुसरे इंग्रज मराठा युद्ध झाले. पहिल्या युद्धात ब्रिटिशांना अपयश आले होते; परंतु दुसऱ्या युद्धाच्या

वेळी ब्रिटिशांनी सर्व बहिष्कृत जातींचा समावेश आपल्या सैन्यात केल्यामुळे दुसऱ्या युद्धात ब्रिटिशांना विजय मिळाला. या ब्रिटिशांच्या सैन्यात बहुसंख्य महार होते.''[७४] ''इ.स. १७८७ साली 'व्हायपर' नावाचे जहाज ब्रिटिश नौका गल्फ ऑफ कच्छ हे मरीन बटालीयनच्या एका तुकडीसह इराणच्या आखातात कामगिरीवर होते या जहाजात महार सैनिक होते. यावर अचानक लढावू बोटींनी हल्ला केला. या वेळी महार सैनिकांनी केलेल्या कडव्या प्रतिकारामुळे सर्व बोटी पळून गेल्या. यामुळे हवालदार सुभानक वाहनाक व मदनाक येसनाक यांना ब्रिटिशाकडून बक्षिस व पदोन्नती देण्यात आली.''[७५] इ.स. १८१० मध्ये इंग्रज व फ्रेंच यांच्यात हिंदी महासागरात आरमारी युद्ध झाले होते. यात धोंडनाक पुंडनाक याने मोठा पराक्रम गाजविला होता. त्यास रूप्याचे पदक व लेफ्टनंट हविलदार म्हणून बढती देण्यात आली.''[७६] ''५ नोव्हेंबर १८१७ साली इंग्रज व पेशवे याच्यामध्ये खडकीची लढाई झाली. या लढाईमध्ये इंग्रजांच्या छोट्याशा सैन्याने पेशव्यांच्या प्रचंड सैन्याचा दारुण पराभव केला होता. या लढाईत अनेक महारांनी आपल्या तलवारीचे पाणी पेशव्यांना पाजले होते.''[७७]

भारतीय इतिहासामध्ये गौरवाने नोंद करावी अशी १ जानेवारी १८१८ ची लढाई होती. ज्या लढाईत महारांनी ब्रिटिशांच्या बाजूने मोठा पराक्रम करून अनेक वर्षाची पेशवाई संपुष्टात आणली होती. ''१ जानेवारी १८१८ च्या लढाईत ब्रिटिश सैन्यापेक्षा ४० पट जास्त असणाऱ्या पेशव्यांच्या सैन्याची दाणादाण उडविण्याचे काम ब्रिटिश फौजेने केले. या ब्रिटिश सैन्यात मोठ्या प्रमाणावर महार होते. या लढाईत २० महार ठार झाले तर ३ जखमी झाले.''[७८]

आशा प्रकारे महारांनी जेवढे सत्ताधीश भारतात आले त्या सर्वांना त्या त्या परिस्थितीनुरूप सहकार्य केले; परंतु महार जातीचा सर्वांनी उपयोग करून घेतला त्या मोबदल्यात त्यांचा म्हणावा तसा उद्धार केला नाही. शेवटी त्यांना अस्पृश्यच ठेवले.

### १.६.६ प्रकरण – सहावे : उपसंहार

प्रस्तुत प्रकरणामध्ये शोधप्रबंधाच्या अभ्यासाचे निष्कर्ष नोंदविण्यात आले आहेत. पूर्व प्रकरणाचा परामर्श घेऊन निष्कर्षाचे प्रस्तुतीकरण करण्यात आले आहे. उपसंहारामध्ये देखील काही ठिकाणी निष्कर्षाच्या विश्वसनियतेसाठी संदर्भ देण्यात आले आहेत.

## संदर्भग्रंथ सूची


१. डॉ. कठारे अनिल , शिवकाळ व पेशवाईतील महारांचा इतिहास , पृ. २९०

२. भावे ह. अ. , (विस्तार) , आपटे वा. ना. , विस्तारीत शब्दरत्नाकर , पृ. ७३८

३. ओतूरकर रा. वी. (संपा.) , पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्र व्यवहार , लेख ९६ पृ. ७१

अ) जोशी श. ना. (संपा.) , शिवकालीन पत्रसार संग्रह खंड - १ , लेख ६२१ , पृ. १३३

ब) ऐतिहासिक संकिर्ण साहित्य , खंड - ७ , लेख ३२

क) राजवाडे वि. का (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने , खंड २५ , लेख ७३

ड) सरदेसाई गो. स. (संपा.) , पेशवे दफ्तर , खंड ४२ , पृ. ३२

ई) कित्ता , खंड ४३ , नोंद ६२

उ) बाड ग. चि. / पारसनिस द. बा. (संपा.) , पेशवे रोजनिशी , खंड ९ , नोंद १९२५

ए) Elphinstone Mounstuart, Territories Conquered from the Paishwa A. Reports , P. 23 , 46

४) शिंदे वि. रा. , भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न , पृ. १२१

५) कोसारे एच. एल. , प्राचीन भारतीय नाग , पृ. ९८, १०१,१०७,१०८,११४ ते ११६

६) राजवाडे वि. का. , (संपा.) उपरोक्त , खंड १६ , लेख ५८ पृ. ६६

७) फुले ज्योतिराव , पवाडा छ. शिवाजी राजे भोसले यांचा , पृ. १

अ) फडके य. दि. , (संपा.) म. फुले समग्र वांङ्मय , पृ. १५७

८) अनु. भिक्षू सिवली बोधी , (आलेक्झांडर रॉबर्टसन) , महारलोक , पृ. ५४

९) खरात शंकरराव , महाराष्ट्रातील महारांचा इतिहास , पृ. ८५

१०) जोशी प. महादेवशास्त्री , भारतीय संस्कृती कोश खंड ७ , पृ. १८९ ते १९०

११) डॉ. कठारे अनिल , शिवकाळ व पेशवाईतील महरांचा इतिहास , पृ. ३९

१२) खरात शंकरराव , उपरोक्त , पृ. ८६

१३) कर्वे चि. ग. / जोगळेकर स. आ. , जोशी य. गो. (संपा.) महाराष्ट्र परिचय अर्थात संयुक्त महाराष्ट्राचा ज्ञानकोश , पृ. ९४

१४) औचरमल ल. या. , निजामकालीन मराठवाड्यातील समाजरचना व अस्पृश्यांचे स्थान, पृ. १७२

१५) अनु. भिक्षू सिवली बोधी , उपरोक्त , पृ. २३

अ) औचरमल ल. या. , (संपा.) उपरोक्त , पृ. १७३

१६) Elphinstone Mounstuart, Ibid, P. 23

१७) भावे वा. कृ. , पेशवेकालीन महाराष्ट्र , पृ. ३४६

१८) Sen S.N. , Administrative system of the Maratha , P. 130, 256

अ) भावे वा. कृ. , उपरोक्त , पृ. ३४७

१९) भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक , ६२ , १.२ , पृ. १२८

२०) औचरमल ल. या. , उपरोक्त , पृ. १७३

२१) बाड ग. ची / पारसनिस द. बा. , उपरोक्त खंड ३ , नोंद ५२१

२२) भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक , ६२ , १.४ , पृ. १२८

अ) अत्रे त्र्य. ना. , गावगाडा , पृ. ४ , ३४ , ३५

ब) कुलकर्णी अ. रा. , शिवकालीन महाराष्ट्र , पृ. ४८

२३) Elphinstone Mounstuart , Ibid , P. 23

अ) Gazetter of India Maharastra state History, Part III , P. 213, 215

२४) Elphinstone Mounstuart , Ibid , P. 23

२५) भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक , ६२ , १.४ , पृ. १२८

२६) राजवाडे वि. का. , (संपा.) उपरोक्त , खंड २१ , लेख ६

अ) बाड ग. ची / पारसनिस द. बा. , उपरोक्त खंड १ , नोंद २८९

ब) डॉ. कठारे अनिल , मराठेकालीन सरकारी अधिकारी व त्यांचे गैरवर्तन , पृ. ३१

२७) औचरमल ल. या. , उपरोक्त , पृ. १७४ , १७५

२८) डॉ. गवळी पी. ए., पेशवेकालीन समाज व जातीय संघर्ष , पृ. ४८

२९) आत्रे त्र्य. ना. , उपरोक्त, पृ. ३५ , ६८

अ) भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक , ६२ , १.४ , पृ. १२७

३०) भा. इ. सं. मं. पुणे , शिवचरित्र साहित्य खंड १ , लेख ८४ , पृ. १०२

३१) ओतूरकर रा. वी. , उपरोक्त , लेख ४६ , पृ. ३२

३२) राजवाडे वि. का. , उपरोक्त , खंड ६ , पृ. १०५

अ) इतिहास संशोधन मंडळ , मुंबई , भारतीय इतिहास व संस्कृती , पृ. ३३

३३) भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक , ६२ , १.४ , पृ. १२७

३४) भा. इ. सं. मं. पुणे , शिवचरित्र साहित्य , खंड १ , लेख ३१ , पृ. ५३

३५) राजवाडे संशोधन मंडळ , धुळे संशोधक , पृ. ३३

३६) Elphinstone Mounstuart , Ibid , P. 23

३७) वाडेकर दे. दे. /कर्वे चि. ग. / टीकेकर श्री. रा.,(संपा.) चाफेकर संस्मृती , पृ. ३३ ते३४

३८) मोल्सवर्थ , मराठी - इंग्रजी शब्दकोश , पृ. २३

३९) पुरंदरे ब. मा. , राजा शिवछत्रपती , पृ. ५ , २०

अ) दीक्षित आवळे , नागवंशीय आंबेडकरी चळवळीतील महारांचे योगदान , पृ . ४१

ब) देशमुख मा. म. , युगप्रवर्तक शिवराज आणि मराठ्यांची शौर्यगाथा , पृ. ३३

क) खांबे सुधाकर , शौर्य आणि पराक्रमाचे प्रतिक भिमा कोरेगावचा विजयीस्तंभ , पृ. ०३

४०) राजवाडे वि. का. (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड - १५ , लेख २७२

अ) डॉ. देशपांडे प्र. न. (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने , लेख २७२ , पृ. २४७

ब) केळकर न. चि. / आपटे व. दी. , शिवाजी निबंधावली भाग २, पृ. १४५

क) जोशी श. ना. (संपा.) शिवकालीन पत्रसार संग्रह , खंड १ , लेख ६२१ , पृ. १३३

४१) भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक , ६२ , १.४ , पृ. १४०

अ) Sr. Pitar cadal, Hishtory of the Bombay Army, P. 12

४२) Sen S.N. , Military Systam of the Maratha, P. 18

४३) नाथमाधव , स्वराज्याची स्थापना , पृ. ०१

अ) खांबे सुधाकर , उपरोक्त , पृ. ०४

४४) खरे ग. ह. , (संपा.) शिवचरित्र वृत्त संग्रह , खंड ३ , पृ. ८५, ८६

अ) दीक्षित आवळे , उपरोक्त , पृ. ४२

ब) शेजवलकर त्र्यं. श. , श्री शिवछत्रपती प्रस्तावना , आराखडे व साधने , पृ. ३३७

४५) पुरंदरे कृ. वा. , (संपा.) शिवचरित्र साहित्य खंड ३ , लेख ९२ , पृ. १११, ११२

अ) दीक्षित आवळे , उपरोक्त , पृ. ४१

४६) कठारे अनिल , उपरोक्त , पृ. १८३

४७) पुरंदरे कृ. वा. व आपटे ब. द. , (संपा.) शिवचरित्र साहित्य खंड ७ , लेख १३ , पृ. १५

४८) खैरमोडे चा. भ. , डॉ. बी. आर. आंबेडकर चरित्र खंड १ , पृ. १८९

४९) भा. इ. सं. मं. पुणे , शिवचरित्र साहित्य खंड ३ , लेख ६०९ , पृ. १९७

५०) कित्ता , लेख ४१५ , पृ. १६, १७

अ) भा. इ. सं. मं. पुणे , शिवचरित्र साहित्य खंड १ , लेख ९२ , पृ. १११

५१) भा. इ. सं. मं. पुणे , ऐतिहासीक संकिर्ण साहित्य , खंड ४ , पृ. ३३, ३४

५२) खैरमोडे चा. भ. , उपरोक्त , पृ. १८८

अ) दीक्षीत आवळे, उपरोक्त, पृ. ४१

५३) जोशी शंकरराव सत्कार समिती, (संपा.) मराठेकालीन समाजदर्शन, पृ. १२३, १२४

अ) पोतदार द. वा. व मुजुमदार श. ना., सप्तसंम्मेलन वृत्त, पृ. ५५ ते ५७

५४) मोरे चिंतामण, रणझुंजार शिदनाक, पृ. २४, २६

अ) दीक्षित आवळे, उपरोक्त, पृ. ४४

५५) प्रदिप गायकवाड, (संपा.) (डॉ. आंबेडकर), आग्रलेख बहिष्कृत भारत व मूकनायक, पृ. १८४, १८५

५६) भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक, ६२, १.४, पृ. १४१

अ) खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. १५७

ब) खांबे सुधाकर, उपरोक्त, पृ. १९

५७) खैरमोडे चा. भ., उपरोक्त, पृ. १८९

अ) खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. १६२

५८) सोमवंशी बी. सी., भारतीय जाती संस्थेत मातंगाचे स्थान, व महार-मांग संबंध, पृ. ७८

५९) पवार अप्पासाहेब, (संपा.) ताराबाई कालीन कागद पत्रे, खंड ३, पृ. ७०, ७१

६०) डॉ. कठारे अनिल, उपरोक्त, पृ. १९६

६१) पेशवे सनदा, प्रकरण १७, पृ. ३०४

अ) पारसनिस द. बा., (संपा.) ब्रहमेंद्रस्वामी धवडशीकर चरित्र व पत्रव्यवहार, लेख २७०

ब) खैरमोडे चा. भ., उपरोक्त, पृ. १८८

६२) शिंदे वि. रा., उपरोक्त, पृ. १५८

अ) मोरे चिंतामण, उपरोक्त, पृ. ४२, ४३

ब) गुरू गोपाळ चक्र नारायण, एकच समाज महार - मराठा, पृ. ४७

६३) भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक, ६२, १.४, पृ. १४१

अ) प्रदिप गायकवाड, (संपा) (डॉ. आंबेडकर) आग्रलेख बहिष्कृत भारत व मुकनायक, पृ. २८

६४) खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. १६३

६५) बाड ग. ची. / पारसनिस द. बा. / साने / मराठे / जोशी, (संपा.) सवाई माधवराव रोजनिशी, खंड २, पृ. ४३

६६) खांबे सुधाकर, उपरोक्त, पृ. २०

६७) पेशवे सनदा, प्रकरण १७, पृ. ३०४

अ) खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. १७०

६८) अनु. भिक्षू सिवली बोधी, उपरोक्त, पृ. २६

६९) अनु. डॉ. तिवारी बलभद्र, (कर्नल व्ही. लंगर), सदैव आग्रगामी, पृ. १३

अ) अनु. भिक्षू सिवली बोधी, उपरोक्त, पृ. १५

७०) वसंत मुन / हरीनरके / गोडघाटे / डॉ. कासारे / कांबळे, (संपा) डॉ. आंबेडकर यांची भाषणे खंड १८, भाग २, पृ. १४९

७१) फडके य. दी., (संपा.) महात्मा फुले समग्र वांङ्मय, पृ. १७८

७२) Kamble N.D., Diprived castes and Their Struggle for Equality, P. 123, 124

७३) कित्ता, पृ. १२४

७४) कित्ता, पृ. १२४

७५) अनु. डॉ. तिवारी बलभद्र, उपरोक्त, पृ. १६

अ) खैरमोडे चा. भ., अस्पृश्यांचा लष्करीपेशा, पृ. ९

ब) लोखंडे हि. गो., डॉ. आंबेडकरी सैनिकांची गौरवगाथा, भाग १, पृ. १२८

क) खांबे सुधाकर, उपरोक्त, पृ. ८

७६) अनु. डॉ. तिवारी बलभद्र , उपरोक्त , पृ. १६

अ) खैरमोडे चा. भ. , उपरोक्त , पृ. १०

ब) लोखंडे ही. गो. , उपरोक्त , पृ. १२८

७७) Kamble N.D., Ibid , P. 124, 125

७८) खैरमोडे चा. भ. , उपरोक्त , पृ. १० ते १२

अ) खांबे सुधाकर , उपरोक्त , पृ. ९

ब) शिंदे वि. रा. , उपरोक्त , पृ. १७२

*प्रकरण दुसरे*

# महारांचा इतिहास

२.१ प्रस्ताविक

२.२ महारांची उत्पत्ती

२.३ महारांच्या उत्पत्ती संदर्भातील दंतकथा

२.४ महारातील पोटजाती

२.५ महारांची कामे

- २.५.१ सरकारी कामे
- २.५.२ गावातील कामे
- २.५.३ वेठबिगारी कामे
- २.५.४ महारांची इतर कामे

२.६ महार आणि महाराष्ट्र

२.७ समारोप

## २.१| प्रास्ताविक :

मध्ययुगीन महाराष्ट्राच्या समाज जीवनामध्ये स्पृश्य आणि अस्पृश्य असे दोन प्रमख घटक होते. अस्पृश्य या समाज घटकामध्ये महार, मांग,|चांभार, ढोर इत्यादी जाती प्रमुख होत. महाराष्ट्राबाहेर ही अस्पृश्यांचा वर्ग आढळतो. माळवा,गुजराथ, राजस्थान व मध्य भारत या परिसरात अस्पृश्यांना म्हेत्तर, म्हेर, मेर असे संबोधले जाते. पंजाब प्रांतात यांनाच मेघ-मद्य, मेघवाल-मोघीया असे म्हणतात, ओरिसा,| आंध्रप्रदेश, मलबार इत्यादी परिसरामध्ये माल, मालो, माली, मलयन, असेही म्हटले जाते. ''बंगाल प्रांतामध्ये अस्पृश्यांना नमःशुद्रा असे म्हणतात.''[१] भारताच्या भिन्न-भिन्न राज्यामध्ये वेगवेगळ्या नावाने अस्पृश्यांना ओळखले जात असले तरी त्यांचा सामाजिक स्तर सारखाच होता. ब्राह्मणी धर्म शास्त्राने अस्पृश्यांची प्रत्येक ठिकाणी नाकेबंदी करुन त्यांचा समाजातील कनिष्ठ दर्जा कायम टिकवण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो.

महाराष्ट्रातील अस्पृश्यामध्ये महार ही जात अतिप्राचीन कालखंडापासून वास्तव्य करणारी जमात म्हणून ओळखली जाते. म्हणूनच महाराष्ट्रामध्ये 'गाव तेथे महारवाडा' अशी म्हण प्रचलीत होती. यावरूनच महाराष्ट्रात महारांचे महत्त्व लक्षात येते. मध्ययुगीन कालखंडाच्या शिवशाही व पेशवाईमध्ये जाती व्यवस्था ही समाज व्यवस्थेचा आधारस्तंभ होता. मध्ययुगीन महाराष्ट्राच्या समाज घटकामध्ये ब्राह्मण, कायस्थ,| मराठा, लिंगायत, धनगर,| हटकर, मुसलमान, सुतार, लोहार,| चांभार, महार, कुंभार, मांग, परीट, न्हावी, भट,मुलाना, गुरव, कोळी, गोंधळी, भोई, शिंपी,तेली, माळी,साळी, कासार, बुरुड, जिनगर, शिकलकर, बेलदार, घडशी, डवऱ्या गोसावी, गवंडी, पिंजारी, वंजारी, लमाणी, वडार, घिसाडी इत्यादी जातीचे अस्तित्व आढळते. या जातीपैकी महार, मांग, चांभार व ढोर ह्या जातींचा समावेश अस्पृश्य किंवा अतिशुद्र या सदरामध्ये करण्यात आलेला होता. ''शिवशाही व पेशवाईच्या अस्सल कागदपत्रामध्ये महारांचा उल्लेख भूमिपुत्र, राबता, पाडेवार, तराळ, वेसकर, जागला, कोतवाल,

ध्येड, अतिशुद्र, वेशीराखा इत्यादी नावाने वेगवेगळ्या संदर्भात केल्याचे दिसून येते.''[२] वि.रा. शिंदे [३] यांनी आपल्या 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' या ग्रंथामध्ये ''महार' हा शब्द प्रयोग 'म्हार' या शब्दाचा अपभ्रंश आहे.'' असे मत व्यक्त केले आहे. तर कोसारे एच.एल. [४] यांनी ''महर' या शब्दाचे रूप महाराष्ट्रीत 'महार' असे बनले.'' या दोन मतांचा चिकित्सक पद्धतीने विचार केला तर असा निष्कर्ष निघतो की, 'महर' या मूळ शब्दापासून 'म्हार' हा शब्द तयार झाला. पुढे त्याचेच रूपांतर, 'महार' असे झाले. प्राचीन भारताच्या राजवंशामध्ये 'नागवंश' हा एक प्रमुख वंश होता. भारताच्या विविध भागामध्ये नागवंशाची राज्ये होती. आर्य पूर्व काळात नाग लोकांची संस्कृती अस्तित्वात होती. नागलोकांचे उल्लेख ऋग्वेदाच्या अनेक सुक्तामध्ये आढळतात. यावरून त्यांची प्राचीनता लक्षात येते. ''महाराष्ट्रातील महार लोक हे नाग लोकांचे वंशज होते.'' या मताला इतिहासाचार्य वि.का.राजवाडे [५] राजारामशास्त्री भागवत [६] केतकर श्री.व्यं.[७] कोसारे एच.एल. [८] शेणोलीकर ह.श्री., देशपांडे, प्र.न. [९] डॉ. बी.आर. आंबेडकर [१०] व डॅ. एन.जी.भवरे [११] या सर्व इतिहास अभ्यासकांनी पाठींबा दिला आहे.

'नाक' हा शब्द 'नाग' या शब्दाचा अपभ्रंश असून मध्ययुगीन कालखंडातील महारांच्या नावामध्ये 'नाक' या शब्दाचा उल्लेख करत असत. उदाहरणार्थ खंडनाक महार, रायनाक महार, येसकर महार, कमळनाक महार [१२], महादनाक व लिंगनाक [१३] आणि सतनाक महार [१४] ''महारांच्या परंपरेनूसार त्यांचा पहिला राजा 'नाग' या नावाचा होता'' [१५] त्यांची स्मृती म्हणून महार लोक स्वतःच्या नावासमोर नाग असा उल्लेख करीत असत. नाग कुलांची नावे आज महारांची अड्नावे आहेत. उदा. : ''क्षहरात या नाग कुलाचे खरात असे अडनाव प्रचलीत आहे.'' [१६] तसेच ''अहिवित्र या नागराजापासून आहिरे हे आडनाव पुढे प्रचलित झाले असावे.[१७] महार हे नागवंशी लोक असून ते महाराष्ट्राचे मूळ निवासी व राज्यकर्ते होते.म्हणूनच ''मराठे कालीन कागदपत्रामध्ये महारांचा उल्लेख भूमिपुत्र असा करण्यात आला आहे.'' [१८] ''कोकण प्रांतात महारांची अनेक राज्य होती. पुढे दक्षिणेच्या कदंबानी ती राज्य जिंकून घेतली.'' [१९] महारांचे

महाराष्ट्रामध्ये प्राबल्ये होते. महार या शब्दावरूनच या प्रदेशाला महाराष्ट्र असे नाव मिळाले. या विधानाला जॉन विल्सन याने ही दुजोरा दिला आहे. जॉन विल्सन यांनी 'महारांचे राष्ट्र ते महाराष्ट्र'[२०] अशी महाराष्ट्र शब्दाची उत्पत्ती सांगितली आहे. श्री वामन भट[२१] यांनीही "प्राचीन काळात महार एक राष्ट्र होते असे मत नोंदवलेले आहे." श्रीधर व्यंकटेश केतकर, म.फुले, आलेक्झांडर रॉबर्टसन, डॉ. ओपर्ट या सर्व विद्वानांनी "महारांच्या नावावरून महाराष्ट्र हे नाव प्रचलीत झाल्याचे नमुद केलेले आहे."[२२]

## २.२ महारांची उत्पत्ती :

महाराष्ट्रातील महारांच्या उत्पत्तीबद्दल भारतीय आणि परकीय इतिहास संशोधकांनी, आपापले सिद्धांत मांडले आहेत. म.ज्योतिबा फुले, डॉ.बी.आर.आंबेडकर, श्री.म.माटे, विठ्ठलरामजी शिंदे, वामनराव ए.भट, डॉ. दत्तात्रय पुरुषोत्तम खानापुरकर, कोसारे एच.एल., भारदे, त्र्य.ना.अत्रे, डॉ. रामकृष्ण भांडारकर, या भारतीय संशोधकाशिवाय **जॉन विल्सन**, मोल्सवर्थ, डॉ. ओपार्ट, आर.ई.इन्थोव्हेन, इ. परकीय विद्वानांनी महारांच्या उत्पत्तीचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे.

म. ज्योतीराव फुले यांनी "आर्यांचा सर्वात मोठा शत्रू म्हणजे महा+आरी= महार' असा सिद्धात मांडला"[२३] डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दि. १५ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर या ठिकाणी आपल्या अनुयायासमोर भाषण देत असताना, "प्राचीन काळातील नाग म्हणजेच आत्ताचे महार होत असा सिद्धांत मांडला."[२४] श्री.म.माटे यांनी आपल्या 'अस्पृष्टांचा प्रश्न' या ग्रंथात महारांच्या उत्पत्ती बद्दलची आपली भूमिका मांडून "महार हा महाराष्ट्राचा भूमिपुत्र किंवा धरणींपुत्र असे म्हटले आहे."[२५] कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनी 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' या ग्रंथात महारांच्या उत्पत्तीबद्दल व वृत्ती (वतन) बद्दल व महाराष्ट्राच्या समाज जीवनातील त्यांच्या अस्तित्वाबद्दल सखोल अशी चर्चा केलेली आहे. वि.रा.शिंदे[२५] यांनी आपल्या ग्रंथात "महार ही जात फार पुरातन असून ती अभिजात असावी असे नमूद केले आहे." पुढे ते म्हणतात

की, ''महार हे नंतर मराठीत रूपांतरीत झाले. त्याचे मूळरूप 'म्हार' असे गावंढळ तोंडात अद्यापही आहे. तेच रूप पहिले असावे. माळव्यात व नागपुराकडे हिंदी भाषेत 'म्हेर' असे रूपही आहे. माळव्याप्रमाणे गुजरातेतही म्हारांना 'म्हेतर'| असे म्हणतात. त्यापासून 'म्हेर' असे रूप होणे शक्य आहे.अजमीर - मेरवाडमध्ये 'म्हेर' असे रूप आहे. 'म्हेतर' (महजर) म्हणजे मोठा माणूस अथवा जूना माणूस आणि ही उत्पती ह्या प्राचीन जातीच्या इतिहासाला अधिक सुसंगत दिसते.'' [२७] श्री. वामन ए.भट यांनी आपल्या 'द हरिजन ऑफ महाराष्ट्र' या ग्रंथामध्ये महार ही महाराष्ट्रातील सर्वात प्राचीन आणि बहुसंख्यांक जमात म्हणून उल्लेख केलेला आहे. ते महारांबद्दल म्हणतात ''There are many indications to show that the mahars were an ancient nation or a large community inhabiting and occupying the plains of maharashtra. Very probability probably through conquest they lose their possessions and have been treated for generations as a subject people''| [२८] महाराष्ट्रातील ज्येष्ठ समाजशास्त्रज्ञ डॉ. दत्तात्रय पुरुषोत्तम खानापूरकर यांनी 'नवा महाराष्ट्रः दलित समाज' या ग्रंथामध्ये ''भारतात आक्रमणकर्ते म्हणून आलेल्या आर्यांना ज्या मूळ भारतीयांनी प्रखर विरोध केला ते आर्य विरोधक म्हणजेच महाराष्ट्रातील महार होत. तसेच प्राचीन काळातील नाग आणि आताचे म्हार हे एकच आहेत. यामुळेच मध्ययुगीन कालखंडातील महार स्वतःच्या नावासमोर नाक हा शब्दप्रयोग वापरत असत. असे म्हटले आहे.'' [२९] यावरून आर्यांचे प्रतिस्पर्धी म्हणजे नाग लोक आणि नागलोक म्हणजेच आजचे महार लोक असा संबंध डॉ खानापुरकर जोडतात.

भारतीय समाजशास्त्राचे अभ्यासक एच.एल.कोसारे महारांच्या उत्पत्तीबद्दल पुढील मत व्यक्त करतात. ''आर्यांच्या प्राचीन सामाजिक व सांस्कृतिक अनुशासनाच्या दृष्टीने आद्य ब्रहमाने चौदा लोकसंस्थाची निर्मिती केली होती. त्यापैकी पहिले सात लोक हे वास्तविक लोक होते, तर शेवटचे सात लोक कल्पित होते. ब्रह्मा हा त्यांचा सर्वश्रेष्ठ अधिपती होता. पहिले सात लोक

ते मानव निर्मित होते. त्यापैकी चौथा लोक हा महर्लोक होय. ब्रहमाने भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक व सत्य किंवा ब्रह्म लोक या सात लोक संस्थांची निर्मिती केली. भुलोक, भुवर्लोक व स्वर्लोक मिळून त्रिलोक होते. या त्रैलोक्याचे पदाधिकारी देव होते. तसेच महर हा शब्द उच्चारून चौथा महर्लोक स्थापन करण्यात आला. तेव्हा त्रैलोक्य हे देवाचे तर महर्लोक हे दानव म्हणजे महर मानवाचे लोकराज्य होते. महर लोकात सर्व देवांना चार वर्षे निवास करावा लागे. त्यामुळेच सर्व लोकांची गणना असूरा मध्ये करण्यात आली. कारण महर्लोक हे असुरांचे लोकराज्य होते. असुर यांनाच नाग म्हटले आहे. म्हणजेच महर्लोक हे नागांचे (असुर) लोक राज्य होते. या प्राचीन नागांचा आधुनिक महारांशी सरळ संबंध असल्याचे स्पष्ट झाले आहे.|''[३०]

शिवरामपंत भारदे यांनी महारांच्या उत्पत्ती बद्दल ''महा+अर म्हणजे जंगलात किंवा पर्वताच्या गुहेत राहणारा असा अर्थ सांगतात. तर महार आणि राजस्थानातील मेहर या दोन्ही जाती एकच असून त्यांचे पूर्वज एकच आहेत. असा नाविण्यपूर्ण सिद्धांत '|सुलभ विश्वकोशा' मध्ये सांगीतलेला आहे.''|[३१]

त्रि.ना.अत्रे यांनी ''महार हा शब्द मेहत्तर याचा अपभ्रंश आहे असे आपले मत नमुद केलेले आहे.''[३२] मेहत्तर म्हणजे मोठा जुना माणूस होय. (मेहेत्रे=मेहत्तर महारांचा मोठा हिस्सेदार मानपान असणारा मोठा महार असा आजही महारात रिवाज आहे) माळवा आणि गुजरातमध्ये महारांना मेहत्तर असेच संबोधले जाते. राजारामशास्त्री भागवत यांनी ही महारांच्या उत्पतीबद्दल ''महार म्हणजेच प्राचीन कालखंडातील नागलोक होत''|[३३] असे मत व्यक्त केले आहे.

महारांच्या उत्पत्ती संदर्भात डॉ. रामकृष्ण भांडारकर यांनी इ.स. १९१२ मध्ये पुण्यातील डिप्रेस्ड क्लासेस मिशनची पहिली अस्पृश्यता निवारण परिषद भरली होती, त्यात अध्यक्ष पदावरून भाषण करत असताना भांडारकरांनी ''मृत + आहार = मेलेली गुरे ओढून नेणारा असे सांगीतले.''[३४] भांडारकरांच्या उत्पत्तीला व्यावसायीक आधार प्राप्त होतो तो सर्वस्वी चुकिचा आहे.|

भारतीय समाजशास्त्रज्ञ व विद्वानांबरोबरच पाश्चात्य विद्वांनांनीही महार या शब्दाची उत्पत्ती सांगीतली आहे. डॉ. ओपार्ट यांच्या मते "मल्ल आणि मार हे एकच आहेत. मार याच शब्दाचे रूपांतर नंतर म्हार असे झाले व म्हार पासून महार हा शब्द प्रयोग पुढे आला."[३५] मल्ल म्हणजेच महार कसे हा प्रश्न निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही. या बाबींचा विचार केल्यास असे दिसून येते की, "पैलवान लोक हातात व गळ्यात काळा दोरा बांधतात. मल्लविद्या ही अत्यंत जुनी विद्या असून तिचा उगम भारतातच अनार्य काळात झाला. महार हे येथील सर्वात जुने रहिवाशी आहेत व ते अनार्य आहेत. यावरून पुढे "मल्लांचे - म्हारांचे राष्ट्र ते महाराष्ट्र" अशी महाराष्ट्र नावाची उत्पत्ती देखील झाली."[३६] याबद्दलच दुसरे एक मत असे सांगता येईल की, "गौतम बुद्धाच्या काळी झल्ल, मल्ल नावाची क्षत्रिय राष्ट्रे शक्यांच्या शेजारी राहात होती. किंबहुना ती ही शाक्यांचीच पोटजात असावी. कालांतराने ही राष्ट्रे नष्ट झाली व नंतर मालो या नावाने अस्पृश्याप्रत पोहोचली असावी."[३७] वरील मतास हरप्रसाद शास्त्री हे देखील संमती दर्शवितात. ते म्हणतात की, "मल्ल राष्ट्र पूर्वी बौद्ध असून मुसलमानांच्या स्वारीनंतर बौद्ध धर्माचा उच्छेद झाल्यामुळे बहिष्कृत झाले असावे ."[३८] याबाबतच पाश्चात्य संशोधक मॅक्समुलर आपल्या 'Physical Religion Gittord Lectures' या ग्रंथात पान ३२० वर असे म्हणतात की, "पालीभाषेमध्ये 'मारू' हे पद दुष्ट देवतेसंबंधी योजलेले आढळते" मला वाटते या पदात 'मल' अथवा मर = डोंगर हा द्रविड धातू मूळ असावा. त्याच्यापासून मार, माल, म्हार वगैरे पर्याय होणे अगदी संभवनीय आहे."[३९] सुप्रसिद्ध युरोपीयन समाजशास्त्रज्ञ व संशोधक इंन्थोव्हेन आर.ई. यांनी आपल्या 'Tribes and casts in Bombay state (1920-22)' या ग्रंथात म्हणतात की, "महार शब्दाची उत्पत्ती कालौघात नष्ट झाली, तरी मह + हरी (महा+आहारी) म्हणजे पुष्कळ खाणारे यावरून महार हा शब्दप्रयोग आला."[४०] इन्थोव्हेन म्हणतात की, महार किंवा म्हार खरे सांगावयाचे तर अनेक जाती-जमातींचा समुह आहे. महारातील सुमारे ५० ते ५३ जाती जमातींच्या समुचयाला इंथोव्हेन म्हार असे म्हणतो.

जुन्या काळच्या महारांच्या कागदोपत्री महारांची नावे नोंद करताना 'महार' अशा शब्दाऐवजी म्हार असाच शब्द लिहीत. तसेच १९३० च्या पूर्वी महार मुलांची शाळेत नोंद करताना महार या शब्दाऐवजी म्हार या शब्दाची नोंद होत असे. खेडेगावाच्या बोली भाषेत ही महार या शब्दाचा उच्चार 'म्हार' असाच करतात. हे येथे नमूद करण्याचा हेतू हा की, ''म्हार' याच शब्दाचे अपभ्रंश मेर, म्हेर व नंतर महार आहेत.'' [४१]

## २.३ महारांच्या उत्पत्ती संदर्भातील दंतकथा

महारांच्या उत्पत्ती बद्दल भारतीय व पाश्चात्य विचारवंतांनी आपापली मते सांगीतलेलीच आहेत. त्यावरून महार शब्दाचा इतिहास आपणास कळतो; परंतु महार उत्पत्ती संदर्भात काही दंतकथा ही आहेत. त्यापुढीलप्रमाणे सांगता येतील.

''एकदा पर्वती नदीत स्नान करत होती. त्यावेळी पाण्यात पडलेल्या एका बेलाच्या पानावरील रक्ताच्या थेंबाला तिचा स्पर्श झाला. त्याबरोबर त्या बिंदूचे एका सुंदर बालकात रूपांतर झाले. तिने त्या बालकास उचलून घरी आणले व महादेवाला दाखविले महादेवाने त्याचे नाव महामुनी ठेवले. एक दिवस ते बालक रांगत घराबाहेर आले व तेथे पडलेल्या एका मृत गाईचे मांस खाऊ लागले. महादेवाने जेव्हा हे पाहिले तेव्हा त्याला फार राग आला व त्याने त्या मुलाला शाप दिला की तू गावाबाहेर राहशील, मृत जनावरांचे मांस खाशील व लोक तुझ्या सावलीचाही विटाळ मानतील.'' [४२]

''पार्वतीच्या कपाळावर घामाचा बिंदू आला. तो एका कमळपत्रावर पडला. त्याचे सुंदर मुल होऊन खेळू लागले. ते रांगत बाहेर जाऊन एक मेलेली गाय खाऊ लागले. म्हणून शिवाने रागावून त्यास महा आहारी मोठा खादाड हौशील असा शाप दिला तो महार झाला'' [४३]

''ज्याची आई ११० वर्षाची होऊन वारली आशा ७२ वर्षांच्या महाराकडून एक दंतकथा ऐकावयास मिळाली. त्या कुटुंबात तो १९ वा पुत्र होता. 'पर्वताची देवी (कन्या) म्हणजेच पार्वती एक दिवस आंघोळ करायला बसली आणि तिने आपले जडजवाहिरीचे दागिणे अंगधुणीच्या

खुंटीवर ठेवले. एका कावळ्याने ते दागिणे आपल्या चोंचीने एका झाडावर नेले. पार्वतीने ते पाहिले नाही जेव्हा पार्वती वस्त्र नेसत होती तेव्हा दागिणे खुंटीवर नव्हते. राजवाड्याच्या पहारेकऱ्यावर चोरीचा आरोप ठेवण्यात आला. पार्वतीच्या पतीने (महादेवाने) त्या पहारेकऱ्याचा तुकडेतुकडे करण्याचा हुकूम दिला. त्यावेळी तो पहारेकरी जोर जोराने ओरडू लागला ह्या महादेवापाशी काही न्याय नाही. आपण निर्दोष आहोत, हे दाखविण्यासाठी त्याने सांगीतले की, मी दागिणे शोधून देतो व खरा चोर दाखवून देतो. मग राजाने त्यास सोडले. पहारेकऱ्याने दिलेले वचन पूर्ण करण्यासाठी छडा लावला. त्याने कावळ्याला दागिण्याची माळ आपल्या घरट्याकडे नेतांना पाहिले होते, जेव्हा एक माणूस झाडावर चढला तेव्हा त्याला ते दागिणे घरट्यात आढळले. राणीने रागावण्याऐवजी त्याला महा-हार हे नाव घ्यायला सांगीतले व त्याचे वंशज पहारेकरी झाले. एका प्रामाणिक माणसावरून त्याच्या प्रित्यर्थ संपूर्ण जातीला महा-हार हे नाव मिळाले व पुढे त्याचे रूपांतर महार झाले.''[४४]

''गाईच्या पुत्रापैकी महार एक आहे. आईने आपल्या पुत्रांना असे विचारले की, ती मेल्यानंतर पुत्र तिचा मान सन्मान कसा करतील? चारपैकी तीन पुत्रांनी असे सांगीतले की, देवाच्या दिव्यत्वाइतका मानसन्मान ते करतील. चौथ्याने उत्तर दिले की, जसा तिने त्याचा उदरात प्रतिपाळ केला तसा तो देखील तिचा करील. ह्याचा अर्थ तो तिला पोटात ठेवील. ह्याबद्दल तिघांना त्याच्या अधार्मिकतेबद्दल राग आला. त्यांनी त्याला महा + आहार असे नामाभिधान दिले. पुढे त्याचेच रुपांतर महार झाले. महार हे नाव त्याला व त्याच्या वंशजाला चिकटले.'' [४५]

वरील दंतकथा महारांच्या उत्पत्तीबद्दल सांगीतल्या आहेत ; परंतु यामध्ये काहीही तथ्यांश दिसत नाही. कारण ह्या पौराणीक कथा आहेत. महारांचे शौर्य दडपून टाकण्यासाठी या काल्पनीक कथांचा आधार घेतल्याचे दिसते. आजच्या विज्ञान युगात मानव निर्मिती पहाता वरील कथा ह्या टाकावू आहेत. महार हे शूर, कर्तबगार, विश्वासू व आर्यांचे सर्वात मोठे शत्रू होते. हे सिद्ध होऊ नये म्हणून या भाकड कथा पुढे आणल्याचे दिसते.

वरील सर्व भारतीय व पाश्चिमात्य इतिहास संशोधकांच्या महाराबद्दलच्या व्याख्या किंवा महार शब्दाची उत्पत्ती तटस्थपणे अभ्यासल्यानंतर कुठलीही व्याख्या किंवा उत्पत्ती परीपूर्ण वाटत नाही. परंतु महाराबद्दलची आपली भूमिका मांडत असताना अनेकांनी आहार, गोमांस भक्षण, महार नावातील नाक शब्द, महारांचे गलिच्छ व्यवसाय अशा गोष्टीवर जास्तीत जास्त लक्ष केंद्रित, केल्याचे दिसून येते. वरील सर्व इतिहास संशोधकांमध्ये केवळ म. ज्योतिराव फुले, यांनीच महारांच्या धाडसी स्वभावाचा अभ्यास करून जी व्याख्या सांगीतलेली आहे, ती सत्याच्या अधिक जवळ जाणारी वाटते. महा + आरी = महार म्हणजे सर्वात मोठा शत्रू असा म.ज्योतीराव फुलेंच्या व्याख्येचा मतीतार्थ होतो. प्राचीन काळी महारांचे पूर्वज नागलोक या नावाने ओळखले जात होते. हे सर्व ज्ञात आहेच. नागलोकांनी आर्य ब्राह्मणांचे आदेश नाकारले. त्यामुळे चिडलेल्या ब्राह्मणांनी आपले आदेश नाकारणाऱ्या नाग लोकांना सामाजिक दृष्ट्या हिन दर्जा प्राप्त व्हावा म्हणून त्यांनी त्यांचे सर्व प्रकारचे विधी करण्याचे नाकारले. ब्राह्मणांच्या या बहिष्कारामुळे महारांचा उपनयन विधी होणे शक्य नव्हते. ज्यांचा उपनयन विधी झाला नाही त्यांना आपोआपच शुद्रत्व प्राप्त झाले. ब्राह्मणांचा बहिष्कार आणि नागांचा स्पष्ट असा नकार यामुळे शुद्रत्वामधून अवमूल्यन होऊन नागांना अतिशुद्रत्व म्हणजे अस्पृश्यत्व प्राप्त झाले. अतिशुद्र किंवा अस्पृश्यत्व प्राप्त झाले तरी नागांनी ब्राह्मणी आदेश शेवटपर्यंत नाकारीतच राहिले. त्यामुळे ब्राह्मणांना त्यांचे आदेश शेवटपर्यंत नाकारणारे सर्वात मोठे प्रतिस्पर्धी किंवा शत्रू वाटू लागले. त्यामुळेच त्यांना महा +आरी = महाआरी असे वाटू लागले. 'महाआरी' या शब्दाचा कालौघा मध्ये 'महार' हा शब्द प्रयोग प्रचलीत झाला.

यावरून ब्राह्मणी आदेश नाकारून त्याचे शत्रूत्व ओढवून घेणारा आणि आपल्या भूमिकेवर शेवटपर्यंत ठाम राहणारा अतिशुद्रातला एक समाजघटक म्हणजेच महार होय. यावरून महार शब्दाची उत्पत्ती तपासत असताना त्यांच्या आहाराचा, व्यवसायाचा किंवा दंतकथांचा विचार करण्याऐवजी त्यांच्या धाडसी स्वभावाचा व आपल्या विवेकाला न पटणारी भूमिका नाकारणाऱ्या

स्वभावामध्ये शोधणे संयुक्तिक ठरेल. म्हणून महा + आरी = महाआरी = महार हीच महार शब्दाची उत्पत्ती सत्य वाटते.

### २.४ महारातील पोटजाती :

भारतीय समाज व्यवस्थेमधील सर्व समाज घटकांना किंवा जातींना फुटीरतेचा शाप लागलेला दिसून येतो. ब्राह्मणी विचार धारेने भारतीय समाज व्यवस्थेचे हजारो जाती मध्ये आणि प्रत्येक जातीमध्ये श्रेष्ठ कनिष्ठत्वाची भावना वृद्धींगत होण्यासाठी असंख्य पोटजातीमध्ये विभागणी करून टाकली आहे. याला महार जात ही अपवाद नाही. महाराष्ट्रातील महार जातिमध्ये अनेक पोटजाती अस्तित्वात आहेत. पोटजातींच्या संख्येबाबत संशोधकामध्ये एक वाक्यता दिसून येत नाही. प्रत्येक संशोधक त्याला ज्ञात असलेल्या पोट जातीनमूद करतो. महारांच्या पोटजातींचा अभ्यास करणाऱ्या संशोधकां पैकी काही मानांकित संशोधकांची मते पुढली प्रमाणे आहेत.

अलेक्झांडर रॉबर्टसन [४६] यांच्या मते,

| | | |
|---|---|---|
| (१) सोमसी किंवा सोमवंशी | (२) डोले | (३) पान महार |
| (४) सीलवन | (५) सुरती | (६) अनंत कुल्य |
| (७) बावीसे | (८), बेल | (९)सीरसलकर |
| (१०) बावने | (११) बारके | (१२) अंधवन |
| (१३) लाडवन | (१४) कोसरे | (१५) पाजिनी |
| (१६) धार्मिक | (१७) म्हाली | (१८) तेलवन. |

मी. इन्थोव्हेन हे एक इंग्रजी वरिष्ठ अधिकारी होते. तसेच ते समाजशास्त्रज्ञ होते. ते मुंबई राज्यात सेन्ससचे अधिकारी म्हणून काम करत होते. हे काम करत - करतच त्यांनी मुंबई प्रांतातील जाती-जमाती (caste and Tribes in Bombay stats) ची ही पाहणी केली. त्यानुसार इन्थोव्हेननी [४७] पुढील पोटजाती सांगीतल्या आहेत.

(१) अत्यज (२) अतिशुद्र (३) भूमिपुत्र किंवा धरणीपुत्र

(४) भूयल (५) चोखामेळा (६) धेड

(७) डोंब (८) हुलवस (९) काठीवाले

(१०) म्हेत्रे (११) मिरासी (१२) परवारी

(१३) तराळ (१४) थोरल्या घरचे (१५) वेसकर

भारतीय संस्कृती कोशात महारातील पोटजातीची संख्या पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आली आहे,

(१) अबने (२) औट (३) बालकांबळे (४) गोपाळ

(५) हेडसी (६) जोगवी (७) कड्डु (८) कासरे

(९) मुरळी (१०) पुलार (११) सोम किंवा सोमवंशी [४८]

डॉ. अनिल कठारे [४९] यांच्या मते,

(१) अवने २) अंधवन (अंधोन), अनंत (३) कुल्थ

(४) औठ कांबळे (५) वल्ही (६) बाळकांबळे (७) बार्के

(८) बावना (९) वावचा (१०) बाविसे

(११) बेल (बेले किंवा बोलिया) (१२) बेन (१३) बकर

(१४) बोले (१५) चेलकर (१६) डोले (१७) ध्येड

(१८) धार्मिक (१९) डोम किंवा डोंब (२०) गरदी (२१) गवसाई (गवसे)

(२२) घडसी (२३) घाट कांबळे (२४) गोंडवन (२५) गोपाळ

(२६) हेडसी (२७) डोलार (२८) झाडे (२९) जोगती

(३०) जुनरे (३१) कबुर्ले (३२) कडवन (३३) कांबळे

(३४) कासेरे (३५) खर्से (३६) खोचरे (३७) लाडवण

(३८) मठकांबळे (३९) मुरली (४०) प्राण (४१) प्रधान

(४२) पुलार (४३) रती (४४) सलादी (४५) सिलवन

(४६) सिरसाळकर (४७) सोमवंशी (४८) सोमकांबळे (४९) सोमाई बल

(५०) सुताड (५१) तिळवण (५२) पाने महार (५३) विनकर

(५४) गसेवार (५५) देसकर (५६) हटकर (५७) गोडालिमा

(५८) रायपुरे (५९) धरमीर (६०) डोंगरवार (६१) झाडेवन

(६२) सुरती (६३) बारके (६४) पाजिनी (६५) म्हाली.

मराठीचे ज्येष्ठ साहित्यिक शंकरराव खरात [५९] यांनी आपल्या ग्रंथामध्ये महारातील पोटजाती पुढील प्रमाणे नमूद केल्या आहेत,

(१) अबने (२) आंदवन किंवा अंधोन (३) अनंत कुल्य

(४) औट कांबळे (५) बल्ही (६) बाल कांबळे

(७) बास्के (८) बावन किंवा बावने (९) बावचा

(१०) बावेसे (११) बेले, बळे किंवा बेलिया (१२) बेन

(१३) बंकर (१४) ब्रोले (१५) चेष्कर

(१६) डौळे, (१७) धेड (१८) धार्मिक

(१९) डोंब किंवा डोम (२०) गारदी (२१) गवसाई किंवा गवसे

(१६) डौळे, (१७) धेड (१८) धार्मिक

(२२) घडशी (२३) घाट-कांबळे (२४) गोडवन किंवा गोंडवन

(२५) गोपाळ (२६) हेडशी (२७) हुबळ

(२८) झाडे (२९) जोगती (३०) जुन्नरे

(३१) कुबले (३२) कडवन, कुडवन किंवा कडू (३३) कांबळे

(३४) कासारे (३५) खर्से (३६) कोचरे, खोसरे किंवा कोसरे

(३७) लादवन किंवा लाधावन (३८) मठ कांबळे

(३९) मुरळी (४०) निराळे (४१) पाण किंवा पाण्य

(४२) प्रधान (४३) पुलार (४४) रती

(४५) सालादी किंवा सालादे (४६) सिलवन्

(४७) सिरसाळकर (४८) सोम किंवा सोमवंशी ४९) सोमकांबळे,

(५०) सोनकांबळे (५१) सोनाइबल कांबळे (५२) सुताड

(५३) तिळवण.

महारांच्या वरील पोटजातीची नावे लक्षात घेतली असता काही नावे त्यांच्या प्रादेशिकतेवरून तर काही नावे त्यांच्या व्यवसायीकतेवरून पडलेली आहेत. या पोटजाती मध्ये श्रेष्ठ कनिष्ठत्वाची भावना मुळात नव्हती. परंतु वरिष्ठांचे कनिष्ठ अनुकरण करतात त्याप्रमाणे ब्राह्मणी विचार धारेतील दुष्ट प्रवृत्ती महार लोकांमध्ये ही झिरपलेली दिसून येते. वास्तविक पाहता संपुर्ण भारतामध्ये मंदिर प्रवेश किंवा स्पर्शाचा विटाळ ह्या दोन बाबी राष्ट्रीय स्तरावर पाळल्या जाणाऱ्या आहेत. भारताच्या प्रत्येक प्रांतामध्ये अशा प्रकारचा बहिष्कृत वर्ग होता. या बहिष्कृत घटकाला विठ्ठल रामजी शिंदे 'डिप्रेस्ड क्लास' म्हणतात तर डॉ. बाबासोहब आंबेडकर "एक्स टेरीयर कास्ट (बहिस्थ जाती) असे म्हणतात."[५१] प्रत्येक प्रांतामध्ये या बहिस्थ जातींना वेगवेगळ्या नावाने ओळखले जाते. या जातींनां नावे वेगवेगळी असली तरी त्यांचा सामाजिक दर्जा, त्यांची कामे, त्यांची स्थिती सारखीच होती. यामध्ये कोणतीही शंका नाही. महाराष्ट्रामध्ये ज्या ज्या प्रांतातून हा बहिस्थ जातींचा समुह आला त्यांना त्यांच्या मूळ प्रांतावरून नावे देण्यात आली. उदा. -" प्राचीन व मध्ययुगीन कालखंडामध्ये गुजरात या प्रदेशाला लाट असे संबोधले जात असे." [५२] लाट प्रांतातून महाराष्ट्रात आलेल्या महारांना लाडवन महार असे नाव पडले आणि याच नावावरून एक पोटजात निर्माण झाली तसेच "लाडवन हे नाव विवाह कायदा मोडणाऱ्याचे आहे." [५३] या बरोबरच "गोंडवन महार, खानदेशातील महारांना खानदेशी महार, कोकण प्रांतात राहणाऱ्या महारांना कोकण्या महार, आंध्र प्रांतात राहणाऱ्या महारांना आंधन महार तसेच सुरती, लाडवन ही सर्व प्रादेशिक नावे दिसातत."[५४]

''धेड व डोंब हे नाव गुजरात मधील महारांना होते. हा शब्द मुस्लिम काळात महारांना वापरण्यात आला. मुस्लिमाकडूनच हा शब्द प्रथम उत्तरेत नंतर खाली महाराष्ट्र व दक्षिणेत आला.''[५५]

''खानदेश जिल्ह्यातील एका महार जातीचे नाव 'होलार' अथवा 'हुलवे' असे आहे. परंतु ह्याच पोटजातीचे नाव कर्नाटकातील सर्व महारांचे नाव आहे.'' [५६] '' कर्नाटक प्रांतामध्ये महारांना माळ व हुलवस (हुळवस) म्हणून ओळखतात'' [५७] ज्या प्रमाणे प्रांतावरून महारांच्या पोटजाती निर्माण झाल्या त्या बरोबरच महारांच्या धंद्यावरून देखील काही पोटजाती निर्माण झाल्या आहेत. त्यापुढील प्रमाणे सांगात येतील. ''रेशीम किंवा कोश यापासून कपडे किंवा चादरी तयार करणाऱ्या व्यवसायीकांना 'कोसारे' म्हटले जाते. यावरूनच कोसारे ही पोटजात पुढे आली.'' [५८] तसेच ''तागाला व्यवस्थित आकार देणाऱ्या महार लोकांना पाजिनी म्हटले जायचे. यावरूनच पाजिनी ही एक पोटजात निर्माण झाली.'' [५९] काहींच्या मते ''रावणाच्या सेनेत पाणी भरणाऱ्या लोकांना ही पाजिनी म्हणत असत.'' [६०] विणकर ही पोटजात देखील व्यवसायारूनच पडली असावी. कारण काही महार आपला उदरनिर्वाह करण्यासाठी धागे तयार करून त्यापासून पांढरे कापड विणत असत यासाठी पुढील संदर्भ सांगता येईल. ''नागपूरचे धोतर जोडे उत्तम धाग्यासाठी प्रसिद्ध होते. ते धागे तयार करणारी महार कुटुंबे ४०० पेक्षा जास्त होती. भैरो नावाचे पांढरे कापड महार जातीचे लोक विणत'' (६०-ए) 'इंदौर संस्थानात जे लोक महारांची कामे करतात व महारांचे हक्क (इतर भागात) बजावतात त्याचे नाव बुलई असे आहे.'' [६१] प्रांत व धंद्यावरून ज्याप्रमाणे अनेक पोटजाती निर्माण झाल्या त्याप्रमाणेच इतरही वेगवेगळ्या कारणामुळे काही पोटजाती निर्माण झाल्या आहेत. त्याचा परामर्श खालीलप्रमाणे घेता येईल.

''सोमवंशी हे आपली उत्पत्ती चंद्रापासून झाल्याचे मानतात व यांची संख्या इतर पोटजातीच्या तुलनेत सर्वात जास्त आहे.''[६२] तसेच ''सोमवंशी स्वतःस पांडवाच्या वंशातले

असल्याचे मानतात''[६३] सोमवंशीची संख्या (महारांची) सगळ्यात जास्त आहे. ''जुन्या काव्यात व सनदेत १८ लक्ष सोमवंशी असा उल्लेख आहे.''[६४] घुंघराची काठी हे महारांचे ओळख चिन्ह होते. तराळ व वेसकर ह्या पोटजातितील लोक नेहमी हातात काठी बाळगत असे. या लोकांव्यतिरिक्त इतरही महार लोक काठी बाळगत असावेत. यावरून काठीवाले ही पोटजात निर्माण झाली असावी. तसेच ''न्याय मंदिरात किंवा नोंदणी खात्यात काठी ही या जातीची खूण मानली जाई.''[६५] मध्ययुगीन काळात प्रत्येक जातितील लोकांना न्याय मंदिरात साक्ष देत असताना वेगवेगळ्या आयुधांची किंवा वस्तूंची शपथ घ्यावी लागत असे. त्यात ''महाराला काठीची शपथ घ्यावी लागे.''[६६]

''जो गावाच्या शेवटी राहात असे त्यास 'अंत्यज' असे म्हटले जायचे यावरून त्यांची अत्यंज ही पोटजात निर्माण झाली.'' [६७] ''भूमिपुत्र, धड़णीचे पुत्र व थोरल्या घरचे हे शब्दप्रयोग महारांच्या प्राचीनतेचे द्योतक आहेत. म्हणजेच महार हे महाराष्ट्रातील मूळ रहिवाशी होते. हा अर्थबोध होतो.''[६८] ''महारांमध्ये ज्यांच्याकडे जास्त जमीन होती आशा जमीनदार महारांना 'मिराशी' असे म्हटले जायचे त्यामुळे त्यांची एक वेगळी पोटजात निर्माण झाली.''[६९] तसेच ''युरोपीयन, लोक महारांना 'परवारी' म्हणून ओळखत''[७०] ''टॉलमी या युरोपीयन विद्वानाने महारांना 'परवारी' असे म्हटले आहे.'' [७१] महारांमध्ये जे गायक होते त्यांना 'परवरी' (परवारी) हा शब्दप्रयोग लागू होता. म्हणून ''महारामधील गायनाचे काम करणाऱ्यांना 'परवरी' म्हटले जायचे या गायकांची एक पोटजात महारात निर्माण झाली.'' [७२] ''वेशीवरील पहारेकऱ्यास वेसकर म्हटले जायचे या पहारेकऱ्यांच्या सर्व समुहास वेसकर म्हणत यावरून वेसकर ही पोटजात निर्माण झाली.''[७३] ''महारांमध्ये या काळात काही लोक 'साधू' म्हणून वावरत होते. या साधू लोकांना गोपाळ हा शब्द प्रयोग वापरला जात होता.'' [७४] मध्ययुगीन काळात लोक आपल्यावरील संकट टाळण्यासाठी किंवा एखादी गोष्ट प्राप्त व्हावी म्हणून देवाला नवस बोलत असत व ह्या नवसापोटी त्यांची इच्छा पूर्ण होण्यासाठी किंवा पूर्ण झाली तर देवाला काही तरी अर्पण करण्याचे

वचन देत असत. (यालाच ग्रामीण भाषेत नवस म्हणतात). अशा प्रकारे "या काळात खंडोबा हे एक दैवत होते या देवतेस इच्छा प्राप्ती साठी मुली वाहिल्याजात असत. ह्या मुलीपासून पुढे जी संतती निर्माण होत असे त्या संततीस 'मुरळी' असे नामाभिधान वापरले जात असे व अशा संततीच्या समुहाची एक पोट जात निर्माण झाली त्यांना 'मुरळी' हे नाव प्राप्त झाले." [७५] मध्ययुगीन काळापासून महाराष्ट्रारात वारकरी पंथ आहे. या "वारकरी पंथाचे अनुयायी असलेले महार 'चोखामेळा' या संताच्या नावाने ओळखले जातात." [७६]

पोटजाती निर्मितीच्या वरील वेगवेगळ्या कारणाबरोबरच काहींच्या मते अडनावावरून देखील पोटजाती पडल्याचे सांगीतले जाते. उदा. अहमदनगर जिल्ह्यातील एका खेड्यात सूर्यवंशी नावाचे लोक आहेत. पण हे एखाद्या कुटुंबातील आडनाव दिसते. "सातारा जिल्ह्यात मुरळी, गवई व जोगती महार आहेत. ही देखील आडनावे आहेत." [७७] या व्यतिरिक्त आज इतर ही काही आडनावे आहेत. ज्या आडनावांच्या वरील विश्लेषणात पोटजाती दिसतात. त्यात कांबळे, कासारे, खर्से (खडसे), कोचरे (कचरे), प्रधान, सिलवन, सोमकांबळे, म्हेत्रे, मिराशी (मिरासे), हटकर, झाडे, डोले (ढोले, ढाले), बेले, डोलार (डोलारे), विणकर (विनकरे) इ.

वरील पोटजाती पहाता वेगवेगळ्या विद्वानांनी पोटजातीची संख्या ही वेगवेगळी सांगितली आहे. वरील विद्वांना व्यतिरिक्त "संयुक्त महाराष्ट्राचा ज्ञानकोष यात महारांच्या पोटजातीची संख्या ५३ सांगीतली आहे." [७८]

महार जातीतील वरील पोटजातींचा चिकित्सक पद्धतीने विचार केला असता काही जाती प्रादेशीकतेवरून पडलेल्या आहेत तर काही जाती त्यांच्या उद्योग धंद्यावरून पडलेल्या आहेत. यामुळे संपुर्ण महार जातीमध्ये कसलाही वांशीक भेद नाही. महार जातीतील पोटजातीमध्ये जी कांही उच्चनिचतेची भावना जोपासली जाते ती ब्राह्मणी मानसिकतेच्या प्रभावाचा एक प्रकार आहे.

## २.५ महारांची कामे :

मध्ययुगीन कालखंडामध्ये महाराष्ट्रातील सर्व जाती धर्मीयांची कामे परंपरेने निश्चित केलेले होते. एक जात आपले पारंपारिक काम सोडून दुसऱ्या जातीचे काम करू शकत नसे किंवा आपला पारंपारिक व्यवसाय सोडण्याचे धाडस कुणामध्येच नव्हते. अस्पृश्य वर्गामध्ये मोडणाऱ्या किंवा भारतीय समाज व्यवस्थेमध्ये हिन लेखल्या गेलेल्या अतिशुद्रातील असंख्य जातीची कामे ही परंपरागत किंवा पारंपारिक पद्धतीचेच होते. त्यात महार जातीच्या लोकांना परंपरेने निश्चित केलेलेच कामे करावे लागत असे. शुद्रातिशुद्रातील वेगवेगळ्या जातींची ठरवून दिलेली एकच कामे असत. उदा. कुंभार यांचे काम मातीची भांडी तयार करणे, लोहाराचे काम लोखंडी अवजारे तयार करणे, सुताराचे काम लाकडी सामान तयार करणे, तेल्याचे काम तेल गाळणे, चांभाराचे काम पादत्राणे तयार करणे, इ. परंतु महारांना मात्र एकच काम नव्हते त्यांना विविध प्रकारचे प्रशासनातील कामे, गावातील कामे व शेतातील कामे करावे लागत असत. महारांच्या कामाच्या स्वरुपावरून त्याला मराठे कालीन कागदपत्रात 'हरकाऱ्या' असे संबोधलेले दिसून येते.

महारांच्या कामाचे वर्गीकरण पुढील मुद्यांमध्ये करण्यात आलेले आहे.

अ) सरकारी कामे

ब) गावातील कामे

क) वेठबिगारी

ड) इतर कामे (अन्य कामे)

### २.५.१ सरकारी कामे :

**१) प्रशासकीय अधिकाऱ्यांची सेवा करणे :**

महार हा गावचा हरकाम्या होता. म्हणून त्याच्या कामाचे क्षेत्र आणि वेळ निश्चित नव्हती. त्याला प्रशासनातील अधिकारी व गावकामगार यांनी सांगीतलेली सर्व कामे करणे आवश्यक

होते. सरकारी अंमलदार गावात आला तर त्याचा सर्व बंदोबस्त करणे तो सांगेल ते काम करणे हे महारांचे कर्तव्य होते. ''गावात प्रशासकीय अधिकारी आल्यास त्याच्या साठी तंबू उभारणे, लाकडे आणणे (सरपण), त्याच्या घोड्याचा खरारा करणे, त्याला चारा-पाणी करणे, त्याची लीद काढणे आणि बशा म्हणून त्याच्या जवळ बसून राहणे ही महारांची कामे होती.''[७९] अशारितीने सरकारी अधिकारी गावात आल्याची वर्दी पाटलाला देऊन त्याची सर्व देखभाल महार करीत असे. प्रशासकीय अधिकारी निवासस्थानात विश्रांती करत असे व महार घोड्याची सेवा करत त्या घोड्याजवळ बसून राहत असे.

**२) प्रशासकीय निरोप देणे :**

''प्रशासकीय कागदपत्रे एका गावावरून दुसऱ्या गावी नेण्याचे काम देखील महारालाच करावे लागे. म्हणजे आजचा पोस्टमन त्या काळी महार होता. ''[८०] ''प्रशासनासंबंधी निरोप पोहोंचाविणे, तसेच सरकारी अधिकाऱ्याचे दप्तर तालुक्याला पोहोंचविणे, आणि तालुक्यावरून गावची सरकारी पत्रे आणणे''[८१] हे सुद्धा महारांचे काम होते.

''पंढरपूरापासून पुण्या पावितो डाक बसवावी सत कोसी आठ कोसी गावात जासूद येक असावा म्हणजे तो गावचा महार बरोबर घेऊन डाक चालवितो.''[८२]

''सरदेशमुखी ब ॥ बाकीचे कागद व खते सातरियास संकराबाकडे कोणाबरोबर रवाना केले ते लिहिणे म्हणून लिहिले त्यास ते कागद लाखोटा करून लिंगनाक माहार याजवली देऊन रवाना केले ऐसे स्मरण आहे.''[८३]

''शक्राजीपंत यांना शिवाजींनी चाबळी व सुपाची पाटीलकी देविली बाकी वतने दिली नाहीत सरनाईकी आदि करून शिवाजीने सरकारात ठेवीली शक्राजीपंत दोन्ही वतने चाबलीस आनभाऊन होते. शक्राजीपंतास वडिल मानाजीपंत व धाकटे गणेशपंत अशी दोन मुले होती. मनाजीपंताचे वडिलासी जमत नसल्याने ते वाईस सिरवली येथे रोजगार करून होते पण त्यांची स्त्री गणेशपंताजवळ होती याचवेळी शाहादीखान याची धामधुम जाली घर लुटून नेले

मुले लेकरे संभाळून पळून जावयास आवसर बनला नाही. मोगलाने गणेशपंत व मनाजीपंताची स्त्री लाहानच होते ती व दुसरी दोघी धाकटी मुले ऐसि च्यार मुले नेली त्यात लेक व धाकटी मुल या दोघीची गत काय जाली ही कलली नाही गणेशपंत मनाजीपंताची स्त्री एका शिपायास सापडली ते रात्रीचे राहटीचे खांबापाशी बांधोन ठेविली त्यानी रात्री येकमेकाचे हात सोडून पलून गेली ती खाबगावास उजाडावयास गेली तेथील पाटलास भेटली त्यांनी पुरसीस करिता आमक्याची कलली तेव्हा मा(हा)र चाबलीस पाठविला शक्राजीपंत बायकोसुधा अगोधर घरास आले होते शंक्राजीपंतास महाराने वर्तमान सांगितल्यावर खामगावास जाऊन मुले आणिली''[८४] हे निरोप देण्याचे काम महाराने पायी चालत जाऊन केले. महार रोज हे काम करण्यासाठी आठ ते दहा कोस पायी जात असे. या कामासाठी त्याने कधीही भूक, तहान, थंडी, पाऊस, ऊन, वारा याचा विचार केला नाही. कारण त्याला तशी संधीच दिली जात नव्हती.

**३) शिवतंटा सोडविणे व साक्ष देणे :**

महारांची महसूल व्यवस्थेतील सर्वात महत्वाची कामगीरी म्हणजे दोन्ही गावच्या सिमांचे रक्षण करणे हे होय. ''गावची शीव व शेताचे बांध उरूळ्या लक्षात ठेवणे व ते मोडणार नाहीत याची काळजी घेणे. हे महारांचे महत्त्वाचे काम होते आणि समजा समाजातील दोन गटात शीवतंटा व शेता बद्दलचा सीमावाद निर्माण झाला तर अशा प्रसंगी या प्रकरणात महाराला साक्षपुरावा द्यावा लागत असे.''[८५] अशी प्रकरणे महाराच्या साक्षिने सोडविण्यात आल्याची भरपूर उदाहरणे मराठेशाहीतील कागदपत्रात सापडतात. जमीनीच्या व वतनाच्या सर्व तंट्यात महाराची साक्ष सत्य मानली जात असे. महारांच्या साक्षीशिवाय कोणताही तंटा सुटत नसे. शिवतंटा सोडविण्यासाठी महाराने ऐरण व रवा दिव्य केल्याचे उल्लेख मराठेशाहीतील कागदपत्रात भरपूर प्रमाणात आढळून येतात. ''दोन्ही गावात निर्माण झालेला शिवतंटा सोडविण्याचा अधिकार महाराचा होता व त्याला तो प्राचीन काळापासूनच मिळालेला होता.''[८६] कारण काळी पांढरीची

माहिती जागल्याशिवाय इतरांना असणे शक्य नव्हते. ''मौजे धारण तपे करकंड व मौजे भोसर तपे उंदरगाव या दोन गावातील शीवतंटा सोडविण्यासाठी कान्ह्या बिन खेळी व यादुबीन उका या महारांनी ऐरण दिव्य केले. कान्ह्या बिन खेळी याची हाताची बोटे पार जळाली''[८७]

''पेशवेकाळात येकनाक महाराने जलदिव्य केले होते.'' [८८] ''मेगसेटीस मौजे पिंपले खुर्द व मौजे सुरतगाव या दोन्ही गावात शिवेचा तंटा होता. त्यासाठी सुरतगावकर पाडेवारास नाईकास अरणी दिली. नागनाईक पाडेवार मौजे पिपले खुर्द याने साऊली केली. ऐरण दिव्यात सुरतगावकरांच्या महाराच्या हाताची बोटे जळाली व निवाडा पिपले खुर्द गावच्या बाजूने झाला''[८९]

''मौजे माडरदेवी प्रांतवाई व मौजे अबडे व बललू व ने ता. उजीली या दोन गावात शिवेचा गरगशा होता. त्यासाठी खोपडे देशमुख व माडरे मोकदम यांनी हा गरगशा गोदनाक बिन भाननाक माहार मौजे माडरदेव यांच्याकडून ऐरण दिव्य करून सोडविला. महाराच्या हातास फोड आल्यामुळे दिव्य खोटे झाले.''[९०]

''मौजे केडगाऊ व मौजे पारगाऊ मामे या दोन गावात शिवेचा तंटा निर्माण झाला त्यावेळी बब्रटा बिन जनका विर्तीकार मौजे पारगाऊ व बिन दादू विर्तीकार मौजे कडेगाऊ या दोन महारांनी ऐरण दिव्य केले. बब्रटा बीन जनका विर्तीकार मौजे पारगाऊ याच्या हातास फोड आले. तो खोटा झाला व कडेगावकर खरे झाले'' [९१]

**४) महसूल व्यवस्थेत काम :**

महसूल व्यवस्थेत देखील महाराची भूमिका महत्त्वाची होती. ''पाटील हा गावचा प्रमुख सरकारी अधिकारी होता. तसेच तोच महसूल अधिकारी सुद्धा होता. गावचा महसूल गोळा करून सरकार दरबारी सादर करण्याची जबाबदारी पाटलाचीच होती.'' [९२] परंतु महारांच्या मदतीशिवाय पाटील काम करू शकत नसे. प्रत्येक गावात महार चावडी व गावची चावडी असे. गावच्या चावडीतच सर्व सरकारी कामकाज चालत असे. ''पट्टीसाठी असाम्यांना चावडीवर

बोलावणे व तगादा करणे, तसेच गावचा वसूल तालुक्याच्या ठिकाणी पोहोचविणे ही महारांची कामे होती"[१३] "गोळा झालेला महसूल पाटील महारांकडे देत असे आणि महार तो महसूल डोक्यावर घेऊन तालुक्याच्या ठिकाणी घेऊन जात असे व त्याचा भरणा सरकार दरबारी करून त्याची पावती पाटील कुलकर्ण्याला आणून देत असे"[१४] गावचा गोळा झालेला सर्व महसूल तालुक्याच्या ठिकाणी पोहोचविण्यासाठी पाटील जागल्या महाराकडे सुपूर्द करीत असे. महार ही रक्कम घेऊन एकटा तालुक्याला जात असे, परंतु या रक्कमेतला पै पाव आणा उणा करावा अशी हारामखोरी महार जागल्याच्या मनी स्वप्नात सुद्धा कधीच आली नाही. प्रामाणिकपणाची जणू जागल्याला बाळघुटीच पाजलेली असायची. परंतु त्याच्या प्रामाणिक पणाचे चीज किंवा कौतुक रयतेने व सरकारने कधीच केले नाही. महारांची कामे सांगतांना एलफिन्स्टन म्हणतात, 'The most important revenue of the Mahar is to watch over the boundaries, both of the village Lands and of each individual's field; to see that they are not encroached on; to give evidence in cases where they are disputed; he watches over crops, whether cut of growing as long as they are in the fields. He also the public messenger, guiede; and will be mentioned again as a most important actor in the police.'[१५] डॉ. पी.ए.गवळी या संदर्भातच असे म्हणतात की, "महार हा गावची राखण आणि रखवालदारी करणारा अत्यंत महत्त्वाचा बलुतेदार, ज्याची साक्ष गावातील सर्व महत्वाच्या तंट्यात असे व त्याचा निर्णय ग्राह्य मानला जात असे. शेतसारा वसूल करणे व इतर तत्सम गावकीची महत्त्वाची व हालकी कामे त्याला कारवी लागत. या कामापायी त्याला दिवसाचे चोवीस तास राबावे लागत असे आणि बदल्यात शिळे भाकरीचे तुकडे कधी मिळत तर कधी मिळत नसत."[१६]

एलफिन्स्टन महसूल व्यवस्थेतील महारांच्या कामगिरीबद्दल म्हणतात, 'The Mahar

summoned the ryoth, who paid their rent to the patail, in the presence of the potdar, who assayed and stamped the money and of the coolkurnee, who granted a receipt, when all was collected, the patail sent it by the mahar, with a letter to the Daismook and another to the Kamavisdar, under charge of the chaugulla and received a receipt from the mamlatdar.' [१७]

याच संदर्भात डॉ. एस. एन. सेन म्हणतात,

'The patil as know, was responsible for revenue collection. When the time for collection, the called the rent payers, to the village chawdi where patil held his office the kulkarni or the village accountkeeper was present them with his records to assist the patil in his work and so were the potdars. The letter assayed and stamped the money when paid, for which the rent payer got a receipt from the kulkarni. When the collection was over, the money was went to the Deshmookh under the charge of the mahar.'[१८]

गावच्या चावडीत शेतसारा जमा झाल्यानंतर तो तालुक्याच्या ठिकाणी महारामार्फत पाठवीला जाई. परंतु महसूल तालुक्याच्या ठिकाणी घेऊन जाईपर्यंत तो गावच्या चावडीतच ठेवला जात असे. अशा वेळी "चावडीत सरकारी वसूल गोळा झाल्यावर त्याची दिवसरात्र देखरेख महारालाच करावी लागे."[१९] वसूलामध्ये कमी जास्त झाले तर त्याची सर्व जबाबदारी महारावरच येत असे.

### ५) चोरीचा तपास लावणे :

चोरीचा तपास लावण्याचे काम गावातील महार जागल्यास करावे लागत होते. पाटलास त्याच्या मुलकी व फौजदारी कामात मुख्य मदत जागल्याची होत असे. जागल्या हा गावचा बंदोबस्त ठेवी आणि कुलकर्णी हा दप्तराचे काम करीत असे. जागल्या गावात सतत चौकी पहारा करत असल्याने त्याला गावातील सर्व बारकावे व बदमाश माहीत असत. ''जागल्या हा खेडेगावचा पोलीस शिपाई होता. पाटील हा महार जागल्याच्या मदतीने गावात झालेल्या चोरीचा तपास करतो आणि गुन्हेगारांना शिक्षा देतो.''[१००] ''गावात झालेल्या चोरीचा तपास लावण्याची जबाबदारी जागल्याची होती. तो चोराच्या पाऊल खुणांवरून त्याचा माघ काढत असे. आपल्या गावाबाहेर चोरीचा माघ काढून दिल्यावर चोरीची जबाबदारी पुढील गावातील जागल्यावर येऊन पडत असे. चोरीचा माघ गावा बाहेर गेला नाही तर त्याची जबाबदारी जागल्यावर येत असे आणि चोरीचा ऐवज जागल्यालाच भरून द्यावा लागे. जागल्याच्या ऐपर्ती बाहेर चोरीचा ऐवज असेल तर संपूर्ण गावाला चोरीचा ऐवज भरून द्यावा लागे. एवढेच नाही तर जागल्या व पाटलाला शिक्षा म्हणून त्यांचे इनाम काढून घेतले जात असे व ते त्यांच्या जवळच्या नातेवाईकांना देण्यात येत असे. एवढेच नाही तर त्यांना दंड सुद्धा केला जाई.''[१०१]

गावात चोरी होणार नाही याची खबरदारी जागल्याला घ्यावी लागे. जर जागल्याने चोराचा माघ गावाबाहेर काढला नाही तर चोरी झालेल्या मालाची भरपाई त्यास करून द्यावी लागे. या बरोबरच त्याला दंड सुद्धा आकारला जात असे. 'बाप दाखव नाही तर श्राद्ध कर' अशी स्थिती जागल्या महाराची होती.

''मौजे खांबगाव येथील बैल दोन चोरीस गेले आहेत. त्याचा माग मौजे मजकूरचे गावकरी व बेरड यांनी मौजे येवत वेसीआत नेऊन घातला. त्यास येवतकरांनी आपले रामोसी आणून माग पुढे काढून अथवा बैलाचा पत्ता लावावा असी रीत सर्व ठिकाणी चालत आहे त्या प्र ॥ येवतकराच्या सोईस पडेना रेटाई करितात त्याज वरून आपाजी पत नागवडे याज समागमे पत्र

पाठविले. त्यास आपले पत्र आले तेथे आज्ञा की, येवतकरास सरकारातून ही समक्षा सांगितले आहे आणि तुम्ही आपला प्यादा येक व रामोसी एक येवतात बसऊन माग त्यांनी आपला रामोसी आणून पुढे काढून दिल्हा तरी उत्तम नाही तरी आपला बैलाचा निकाल येवतकरा पासोन करून घेणे।''[१०२](सरकारी प्यादा म्हणजे महार)

''विठोजी वाबळा वस्ती मौजे पिंपरी तर्फ आळ प्रांत जुन्नर याने चोरीची घोडी विकत घेतली होती ते शेटी राऊत मांग चाकर सरकार यास ठाऊक होते, त्यास विठोजी मजकूराकडे सरकारचे प्यादे घेऊन मांग मजकूर गेला. घोडी कोणापासून विकत घेतलीस तो धनी दाखवून देणे म्हणोन पुसले त्यास विठोजी मजकूर यास घोडी ज्या पासून घेतली तो धनी न सापडे ; सबब सरकारची गुन्हेगारी करार केली असे.''[१०३]

एखाद्या गावच्या रखवालदारीची आणि तेथील चोरीच्या बंदोबस्ताची ही हमी महार घेत असत त्यासाठी तसे करार ही केले जात असत.

''माणके राघोजी व बालाजी व बालाजी वलद म्हालाजी व माणकोजी वलद दादजी व बापू वलद कालोजी व दवलता व ॥ कुसाजी नाईक रामोसी वतनदार मौजे गराडे त ॥ करेपठार तालुके पुरधर सुभा पुणे सन १२२८ फसली करणे कतबा लेहून दिल्हा ऐसीजे आम्ही मौजेची रखवाली करून आपला मामूल सिरस्ता प्र ॥ घेऊन मौजे मारी सरहद्दत चोरी छेपी काही येक वगैरे जालीयास आम्ही भरून देऊ यात काही चुकल्यास आपल वतन सरकारास सोडून देऊन सरकारास गुन्हेगारी देऊन सरकारास सिक्षेस हजर राहून म्हणौन खुद राजीने कतबा लेहून दिल्हा.''[१०४]

''ब ॥ द ॥ सयाजी न ॥ बिन दादजी नाईक खोमणे रामोवसो किले पुरधर व दादजी बिन कोडाजी न ॥ चव्हाण रामोसी व ॥ किले पुरधर रामराम विनंती उपरी कारणे कागद लेहून दिल्हा यैसीजे तुमचे गावची रखवाली चाकरी पत्करिली आहे त्यास गावात चोरीमारी होईल त्याचा थाक माग लावून देऊ चोरी भरू (न) (दे) ऊ येणे प्रमाणे करारनामा लेहून दिल्हा आसे

तुम्ही आम्हास पोटास गलाकैली बारूले मापे दोन खंडी व नख्त रू ।। ५० पनास तुम्ही आम्हास द्यावे आम्ही चाकरी करावी रखवालीस अंतर पडले तर तुम्ही आम्हास पोटास देऊ नये.''[१०५]

**६) गावचे रक्षण करणे :**

ग्रामरक्षकासच कोतवाल म्हटले जात असे. ग्रामरक्षक या दृष्टीने जागल्या महार हा खेडेगावचा कोतवाल आहे. 'तराळ' हा मोठ्या खेड्या मध्ये कोतवालाच्या मदतीस असे. तो सुद्धा महार जातीचाच असे. गावाच्या संरक्षणासाठी गावा भोवती कच्चा विटांची मोठी भिंत उभारलेली असे. या भिंतीस दोन वेशी व त्यास लाकडी दरवाजे असत. हे वेसीचे दरवाजे रोज रात्री बंद केले जात असत. गावावर दरोडा किंवा परचक्र पडले तर ताबडतोब वेशीचे दरवाजे बंद करून घेतले जात हे काम वेसकर महार करीत असे. गावाभोवतीच्या संरक्षक भिंतीस गावकुस म्हणत. ''मराठे काळात प्रत्येक गावाला गावकूस असे.''[१०६] ''गावकुस बांधण्याची प्रथा प्राचिन काळापासून होती.''[१०७] गावकीच्या कामात महाराचा मोठा वाटा असे. तो गावचा रक्षक असे. वेशीत चोवीस तास बसणाऱ्या वेसकर महाराला गावात येणाऱ्या जाणाऱ्या नव्या लोकांवर नजर ठेवावी लागे. महार अस्पृश्य असल्यामुळे त्यांची वस्ती गावकुसा बाहेर पूर्वेला ठेवण्यात आली. त्यामुळे ग्रामरक्षणाची जबाबदारी महारवाड्याकडे आली आणि वेस राखणाऱ्या वेसकराचे काम जागला म्हणून महारांकडे दिले गेले. त्यामुळे गावावर आलेल्या संकटाला अगोदर महाराला सामोरे जावे लागे. या वरून महार किती शौर्यवान होते याची कल्पना येते. महार कर्तबगार असल्यानेच ''गावची रखवालदारी करण्याचे काम त्यांच्याकडे आले.''[१०८]

''मासू या गावचा रखवालदार धर्मा महार कवटेकर हा होता.''[१०९] ''गावच्या रक्षणासाठी वेसकर व जागल्याला रात्री गावात पाटला सोबत गस्त घालावी लागे. त्यासाठी त्यांना रात्री पहारा ठेवावा लागे.''[११०] आजही खेडे गावात महालक्ष्मीच्या व दीपावलीच्या सणादिवशी वेसकर व कोतवाल महार रात्री गावात गस्त घालतात.

पाटील व कुलकर्ण्यानंतर महार हा महत्त्वाचा गाववतनदार व गावनोकर होता. पण तोच

गावगाड्याचा खरा वेठबिगारी होता. महारच पाटील, कुलकर्णी व गाववाड्याचा हरकाम्या शिपाई होता. महारास चोवीस तास पाटील व कुलकर्ण्याच्या चाकरीत राहावे लागे. काळी व पांढरी या दोन्हीचाही चौकी पहारा महार जागल्यास ठेवावा लागत असे. गावचा रक्षक म्हणून महार जागल्याची कामगिरी सांगताना गो. नी. दांडेकर [१११] म्हणतात, ''रात्री गावची राखन जागल्याने करायची, दरोडेखोर आले तर त्यांच्याशी सामाना जागल्याने द्यायचा. थंडीचा कडाका असो, पावसाची मुसळधार सुरू असो की उन्हाने जीव जात असो गावकऱ्यांनी जागल्याच्या विश्वासावर निश्चिंत असावे, धनावरच्या नागासारखी जागल्या गावाची राखन करीत असायचा. जागल्या जागत आहे, आपल्या राखणीची पाखर साऱ्या गावावर घालून, तेव्हा आता आवघ्यानी निश्चित असावे. आई तरी याहून वेगळे काय करते ? जागल्या महार हा मातेची भूमिका पार पाडायचा. परंतु त्याला मिळणारा मोबदला फार कमी असे. पोट अर्धवट भरेल इतका इनाम, दहा वीस रूपये पगार व रोज संध्याकाळी कुणब्याच्या घरी भाकरी मागण्याचा अधिकार त्याला मिळालेला असे. जागल्या महार, येसकर हे कुणब्याच्या घरी भाकरी मागण्यासाठी गेल्यावर त्याला वेग वेगळी उत्तरे मिळत असत. कोणी शिळी भाकरी द्यायचे, कोणी उरले नाही म्हणायचे, कोणी स्वयंपाकास वेळ आहे म्हणायचे तर कोणी काहीच द्यायचे नाही. वेसकर व जागले उपाशी पोटी राहिले, अर्धवस्त्रावर राहिले, त्यांना सर्व गावानी टोचून बोलले, त्यांचा छळ केला परंतु वेसकर व जागले गावाशी प्रामाणिक राहिले. कारण लहानपणापासूनच त्यांना प्रामाणिकतेचे घोट पाजले होते.''

गाव रक्षणाबरोबरच गावातील मंदिराच्या संरक्षणाची जबाबदारी देखील महार व मांगावर होती. खेडेगाव व शहरातील धार्मिक ठिकाणे आणि शहराचे संरक्षण करण्यासाठी सरकार अतिशुद्राशी करार करीत असे.

''श्री सिद्धेश्वर महादेव वास्तव्य कसबे पैठण येथे देवालयात श्रीचे पुजेची उपकर्णे व वस्त्रे व पूजेचे साहित्य नेहमी असते व देवालयात रात्री गरीब वाटसरू वगैरे राहातात. याजकरिता

देवालयाजवळ रात्रीस चौकीत पहारा नेहमी ठेवावयाचा करार करून हे सनद तुम्हास सादर केली असे, तरी परगणे मजकूरचे नेमणुकीचे प्यादा पैकी दोन मराठे व दोन महार एकूण चार असामी श्रीचे देवालयाजवळ चौकीस रात्री दररोज देऊन चौकी पहारा करवित जाणे म्हणोन.''[११२]

''सातारा शहराच्या संरक्षणासाठी कृष्णराव अवंत यांनी इ.स. १७७८-७९ साली ३३ मांगाची नेमणूक केलेली होती. त्यासाठी त्यांना प्रत्येक महिण्यास २६३ रूपये देण्याचा करार केला होता.''[११३]

**७) सरकारी कामगार व गावची वेठबिगारी वाहणे :**

महार हा सरकाराबरोबरच तो रयतेचा चाकर होता. यामुळे यास दोघांची ही वेठबिगारीची कामे करावी लागत असत. ''गावकामगार परगावी निघाला तर महाराला त्याच्या सोबत त्याच्या सामानाचे ओझे घेऊन पायी चालत जावे लागे.''[११४] गावकामगार परगावी जात असताना मोठ्या थाटात घोड्यावर बसलेला असे आणि महार मात्र त्याचे ओझे घेऊन त्याच्या पुढे चालत असे. ''सरकारी खजिना व कागदपत्रे एका ठिकाणावरून दुसऱ्या ठिकाणी नेण्याचेही काम महाराने केले आहे.''[११५]

**८) साफसफाई करणे :**

गावकीच्या महारांचे मुख्य कर्तव्य गावची साफसफाई करणे हे होते. गाव महारास गावची सर्व गलिच्छ कामे करावी लागत. महार अस्पृश्य असल्यामुळे त्याच्याकडे सर्व गावची गलिच्छ कामे देण्यात आली होती. ''गावकीच्या कसबी कामाची जातवार वाटणी झाल्यावर बेकार काम उरले ते कोणतीही हुन्नरी जात पत्करीना. असे हे पडून राहिलेले काम महाराच्या वाट्याला आले, म्हणून महार म्हणत असतात की, 'आम्ही काय पडल्या कामाचे चाकर' जे काम करण्याला अभ्यास, कला किंवा विशेषसे ज्ञान नको त्याला बेकार (बेगार) काम म्हणतात.''[११६] गावातील सर्व रस्ते दररोज झाडणे, तसेच गावातील चावडीची साफसफाई करणे हे गाव महाराचे

काम होते. त्यामुळेच सरकारने पुढील आदेश दिला होता. ''महाराने सरकारी दरबारी झाडलोट करावी तसेच खाजगीकडेही झाडलोट करावी.''[११७]

या व्यतिरिक्त गावच्या स्वच्छतेचा एक भाग म्हणून गावात मेलेली जनावरे ओढून गावाबाहेर नेऊन टाकण्याचे काम ही गाव महाराला करावे लागे. ''पंताजी सिंवदेव मुतालीक यांच्या कारकिर्दीस कलदरीच्या बहिरावापासी गुरे मेली ते बेगल्या महारानी नेली.''[११८]

गावकीची कामे महारा बरोबरच मांग देखील करत असत. परंतु इ.स. १७७३ रोजी सासवडच्या मांग आणि महार यांच्यात गावकीच्या कामावरून संघर्ष झाला होता. कारण मांग बरेच दिवसापासून गावकीचे काम करीत असल्याने ते बेगारीस कंटाळले होते.

''सेवीसी विज्ञापना सासवडच्या महाराचा कज्या आहे. मांग गाव चालवित होते ते बेगारिस कंटाळले काल सिद्यांचा बैल मेला वढीनात तेव्हा संध्याकाळ पर्यंत उपासी त्याचे घरची तेव्हा संध्याकाली बले टाकविला. ''[११९] महार मेलेली जनावरे ओढून नेण्याचे काम करीत असे, म्हणून सासवडच्या मांगांनी सिद्यांचा मेलेला बैल ओढून टाकण्यास नकार दिला. महार मेलेली जनावरे ओढून नेत असत परंतु ''मृत कुत्र्याचे व डुकराचे शरिर ते ओढत नाहीत. हे काम मांग करतात.'' [१२०] ''नागपूर जिल्ह्यातील काही खेड्यात मांग नसेल तर कुणब्याला ती ओढावी लागतात.''[१२१] महाराला महारकीचे वतन असे. त्याला सरकार कडून जमीन 'इनाम' मिळत असे. त्यास 'हाडकी हाडोळ' म्हणत असत. ही जमीन सारामुक्त असे. मृत जनावरांची कातडी काढण्याचे काम महार याच जमिनीत करीत असत. मृत जनावरांची कातडी काढून ती त्याच्या मालकाला द्यावी असा सरकारचा हुकूम होता.

*''त्रिगुलाची बैल मेला तरी कातडे महाराने*

*द्यावे माघारी - कलम १''*[१२२]

''पाटील, कुलकर्णी व चौगुले यांच्या घरच्या ढोरांचे चामडे महाराने ज्यांची त्यास द्यावी या खेरीज पांढरीची खोत मत्खसर कुलवाड्याचे धुरेचे बैलाचे चामडे ज्यांचे ढोर त्यास चामडे

द्यावे. कलम १''[१२३] गावातील बेवारस प्रेतांची विल्हेवाट लावण्यासाठी महार पाटलाला मदत करीत असे. ''जमातदार मेल्यावर महारास सांगोन ओढून टाकीला आहे.''[१२४]

**९) दवंडी देणे :**

''एखाद्या महत्त्वाच्या सरकारी आदेशाची माहिती गावातील लोकांना व्हावी यासाठी महार ती माहिती तोंडाने ओरडून सांगत असे, त्याला दंवडी देणे म्हणतात. दवंडी देण्याचे काम महाराला करावे लागे. गावातील प्रत्येक चौकात उभा राहून महार दवंडी देत असे. याच वेळी महारा बरोबर मांग ही असतो. महार दवंडी देतो व त्याच वेळी मांग आपले डफ वाजवितो. महार संबळ व सनई वाजविण्याचेही काम करतो.''[१२५]

**१०) मार्गदर्शक व वाटाडे :**

''महार हा जनतेचा आणि सरकारी अधिकाऱ्यांचा मार्गदर्शक आणि वाटाड्या म्हणूनही काम करीत असे. तो खेडेगावचा डोळा होता. ''[१२६]

वाटसरूंना जंगलातून नेऊन पोहोचविण्याचे व मार्गदर्शन करण्याचे काम महार करीत असे. कारण नवीन वाटसरूंना रस्ता माहित नसे. शिवाय दाट जंगले असल्याने त्यांना जंगली प्राण्यांची भिती वाटे. महार सोबत दिल्यास जंगली प्राण्याची भिती राहत नसे. ''जर एखाद्या प्रवाशाला पुढच्या खेड्यात जाण्याचा मार्ग ठाऊक नसला तर पाटला करवी महाराला बोलावून त्याचेकडून तो वाटाड्याचे काम करवून घेऊ शकतो. त्या खेड्यात पोहोचल्यावर दुसऱ्या महाराकडून सेवा मिळवीली जाऊ शकते. असे झाले म्हणजे प्रवाशाला मार्गदर्शना बरोबरच संरक्षण ही प्राप्त होते. प्रवाशांचे सामान सुद्धा एका खेड्यातून दुसऱ्या ठिकाणी पोहोचविण्याचे काम महाराने केले.''[१२७] वरील काम मात्र महाराला विना मोबदला करावे लागे. परंतु हे काम करण्यास महाराने टाळाटाळ केली. तर त्याला कडक शिक्षा केली जाई.

''मोकादम मौजे पिंपळे त ॥ करेपठार बे ॥ कासम वलय बालाभाई साडणीस्वार दि ॥ र ॥ माणकोजी शिंदे मौजे कोपर्डे सु ॥ तिसा मया तैन व अलफ करणे, ऐसाजे आम्ही

कोपर्ड्याहून रात्री जागलीस महारास बोलविले महार तिघेजण आले त्यास मी म्हणू लागलो की वाटाड्या हे वेळेस आणून देणे. त्यावरून महार बोलिला की तुम्ही जावयास निघाल ते वेळेस आणून देईन असे म्हणाला म्हणून मजला राग आला आणि मी महारास काट्या मजवली सोडगे होते त्याने दोन चार मारिल्या तेव्हा तव येऊन महार पडिला मग चौघेजण मिळून तोंडात पाणी घातले उपरांतीक महार सावध जाहाला परंतु उठू न बसवना त्या उपरी दुसरी दिवसीस काले महारास बाजेवर घालून किल्यास माहार मजला घेऊन जात होते. तेव्हा मी तुम्हाकडे येऊन गावास सर्व अर्ज करून महारास समजावून मागून घेतले की माझी फिर्याद माझ्या धन्याजवळ अथवा सरकारान गेली असता माझे पारपत्य होईल येसे समजोन तुम्हापासी मागून घेतले की एवढा अन्याये मजला आवा सरकारचा सिपाई किल्याकडील वसुलास मौजे मारी होते त्याज पासून व तुम्हापासून अन्यायी मागून घेतला असे माझा बोभाट तुम्ही कोणाजवळ सांगू नये व मीही आपल्याकडून धनियाजवळ सांगणार नाही हे कागद लेहून दिल्हा.''[१२८]

**११) पिकाचे रक्षण करणे :**

काळी व पांढरीचा चौकी पहारा महाराला ठेवावा लागत असे. ''शेतात लावणी पासून ते कापणी पर्यंत पिकांचे रक्षण जागल्या महाराला करावे लागे. कोणाच्या शेतात काय पेरले आहे आणि कोणाचे शेत पडिक आहे हे जागल्याला पाहावे लागे.''[१२९]

''गावचे पाटील कुलकर्णी शेतीच्या हद्दी व पिकांच्या पाहणीसाठी निघाले असता त्या बाबतीत महार त्यांच्या बरोबर जाऊन त्यांना मदत करीत असे.''[१३०] कारण काळीमध्ये महार सतत पायपीट करीत असल्याने त्यालाच शेतीच्या हद्दीत व पिकांची माहिती असे.

''पिकांच्या रक्षणासाठी जंगली जनावरांचा नायनाट करणे, काळी पांढरीचा चौकी पहारा करणे, जंगले व झाडे जतन करण्याचे काम महार करीत असे. या शिवाय खळ्याचे रक्षण करणे, चोर वाटा व माऱ्याच्या जागांची माहिती घेणे व त्या बंद करणे, घाटात रात्रंदिवस पहारा करणे, आल्यागेल्याची खबर ठेवणे, प्रत्येक माणसाची चाल लक्षात ठेवणे, नव्या माणसाची

पाटलास माहिती देणे. "[१३१] तसेच "मोकाट जनावरे कोंडवाड्यात घालणे."[१३२] ही सुध्दा कामे महारांचीच होती.

**१२) जन्म मृत्यूची नोंद ठेवणे :**

"गावातील जन्म मृत्यूची नोंद करून ती बातमी पाटलाला देणे आणि मृत्यूची बातमी परगावच्या संबंधित नातलगापर्यंत पोहोचविण्याचे काम महाराला करावे लागे. तसेच गावातील बेवारशी प्रेताची विल्हेवाट लावण्यात पाटलाला मदत करावी लागे."[१३३]

**१३) इतर सरकारी कामे :**

वरील कामा व्यतिरिक्त पुढील सरकारी कामे गावमहारास करावी लागत होती. "गावात फिरस्ती आल्यास त्याची चौकशी करणे व त्याची वर्दी पाटलास देणे व रात्रपाळीच्या महारास त्याच्यावर पाळत ठेवण्यास सांगणे, गावात जाळपोळ झाल्यास पाटलाला कळविणे, रयत आणि सरकारच्या मालमत्तेची देखरेख करणे व चोरी दरोड्याची वर्दी पाटलाला देणे व टपाल ने आण करणे."[१३४] या बरोबरच "नगराच्या कारकुनाने तयार केलेल्या हिशोबात निगरानी ठेवणे, कर न्यायाने लादणे, बरोबर बातमी पोहोचविणे, तसेच खेड्यातील सरकारी कागदपत्र व खेड्यातील राज्यकर्त्यांनी दिलेल्या कर्जाची नोंद ही महारांना करावी लागत असे."[१३५]

पाटील, कुलकर्णी, महार व जागल्या हे सरकारचे वतनी गावनोकर होते. पाटील व कुलकर्ण्यांची सरकारी कामे निश्चित केलेली होती. परंतु महार व जागल्याची सरकारी कामे निश्चित नव्हती. एवढेच नव्हे तर सरकारात असलेल्या अनेक खात्यांपैकी कोणत्या खात्याची कामे महाराने करावयाची हे सुद्धा निश्चित नव्हते. त्यामुळे एकाच वेळी महाराला अनेक खात्याची कामे करावी लागत होती.

उदा. महसूल खात्यात तो वसूल गोळा करण्यासाठी पाटलाला मदत करतो, आरोग्य खात्यात जन्म मृत्यूची नोंद पाटलाला देण्याचे काम त्याला करावे लागे, तर वनखात्यात तो जंगले व वृक्षांची जपणूक करताना दिसतो. त्यामुळेच कोणत्याही खात्यातील सरकारी अधिकारी गावात

आल्यास त्याच्या सेवेसाठी महाराला हजर राहावे लागे. महाराच्या कामाची वेळ सुद्धा निश्चित नव्हती. पाटील, कुलकर्णी व सरकारी अमलदार बोलावतील तेव्हा महाराला हजर राहावे लागे. व त्याच्या आदेशाचे पालन करावे लागे. महार चोवीस तास राबत राहिला, परंतु त्याचा मोबदला मात्र रयतेकडून मिळणारे पसाभरे बलुते व सरकार कडून दहा वीस रूपये पगार मिळत असे. या मोबदल्यात त्याच्या कोणत्याच गरजा भागत नव्हत्या. एकंदरीत विचार करता महार हा महारकीच्या वतनामुळे सरकारे व रयतेचा वेठबिगार व गुलाम झाला होता.

**२.५.२ गावातील कामे :**

रयतेच्या घरची कामे करणाऱ्या महाराला घर महार किंवा राबता महार म्हणतात. तर गावकीवर नेमून दिलेल्या महाराला 'पाडेवार महार' म्हणतात. बलुतेदार म्हणून महाराला रयतेची अनेक प्रकारची कामे करावी लागत होती. 'घर महार' एखाद्या असामीकडे किंवा रयतेकडे वर्षभर काम करतो. ज्या असामीच्या घरी महार काम करतो त्या असामीला 'कुलवाडी' म्हणतात. विशिष्ट महार विशिष्ट आसामीच्या घरी काम करत असतो. अशा असामीच्या घरी सर्व महार जात काम करण्यामध्ये अडकलेली दिसते. ह्या महारास आसामीच्या घरची सर्व प्रकारची कामे करावी लागत. ते काम घरमहारास टाळता येत नव्हते. तरी घर महार ते आपले कर्तव्य समजत असे. घरमहारास रयतेची, बलुतेदारीची बरीच कामे करावी लागे म्हणून त्यास 'राबता महार' म्हणत. राबत्या महारास गावातील पुढील कामे करावी लागत होती.

**१) सण व उत्सवा वेळीची कामे :**

हिंदुच्या सण उत्सव प्रसंगी अतिशुद्र लोकांना सवर्णाच्या घरी काही विशिष्ट प्रकारची कामे करावी लागत असत. ''पोळा हा महत्त्वाचा सण आहे. या सणा दिवशी पाटील व प्रत्येक सवर्णांच्या घरी लाल रंगाचा गेरू व त्यांच्या दरवाजाला तोरण बांधण्यासाठी आंब्याची पाने व दोरी टाकण्याचे काम महार व मांगाना करावे लागे. त्यांना सवर्णांच्या घराला लाल रंग द्यावा लागे. तोरणासाठी आंब्याची पाने महार आणत तर दोरी पुरविण्याचे काम मांग करीत असे.

गावच्या वेशीला, चावडीला व मंदिरांना लाल रंग देण्याचे व तोरण बांधण्याचे कामगाव महार करीत असे. दसरा, दिवाळी, संक्रांत व नागपंचीमी या सणाच्या दिवशी महार मांगांना सवर्णांच्या घरी अनेक कामे करावी लागत होती. "[१३६] महाराला सणाच्या दिवशी पाटील, कुलकर्णी, देशमुख, देशपांडे व आसामीकडे लाकडाची मोळी टाकावी लागत असे. "सणाची मोळी महाराने आधी तुमचे घरी टाकावी." [१३७] "माहाराने सरपणाची मोळी दररोज पाटलाच्या घरी टाकावी."[१३८] "कुलकर्णीस महाराने दर सणास एक भारा सरपण देणे, देशपांडे यास दर सणास सरपणाच्या मोळ्या देणे, देशमुखास महाराने दर सणास लाकडाची एक मोळी द्यावी."[१३९]

महार व मांगांना सार्वजनिक उत्सवाच्या प्रसंगीसुद्धा गावची व सवर्णाच्या घरची ही कांमे करावी लागत असत. गणेशोत्सव हा मराठे काळात मोठ्या प्रमाणात साजरा केला जाणारा उत्सव होता. "गणपती हे पेशव्यांचे कुलदैवत असल्याने पेशवे काळात गणेश उत्सव मोठ्या प्रमाणात साजरा केला जाई."[१४०] "राजमाता जिजाबाईंनी पुण्यातील कसब्यात गणपतीची स्थापना केली, तर पेशवा नानासाहेबांनी बुधवार पेठेत जोगेश्वरीची स्थापना केली. या देवदेवतांचा अक्षय समारंभ होत असे."[१४१] अशा प्रकारच्या उत्सव प्रसंगी अतिशुद्रांना अनेक प्रकारची कामे करावी लागत असत.

**२) सरपण फोडणे व आणणे :**

सणाच्या दिवशी व इतर वेळी सुद्धा घर महाराला असामीच्या घरी सरपणाचा भारा टाकावा लागत असे, त्या बरोबरच लाकडे पण फोडावी लागत असत. "रानातून सरपणाच्या मोळ्या शेतकऱ्यांना आणून देणे व त्याची लाकडे फोडून देणे."[१४२] तसेच "आसामीच्या घरी मृत्यू झाल्यास, मृत्यूच्या तिसऱ्या दिवशी भात व कण्या करत, त्यासाठी महाराला सरपण फोडून द्यावे लागे. तसेच मृत्यूच्या तेराव्या दिवशी सुद्धा महाराला सरपण फोडावे लागे. आमंत्रण देण्याचेही काम महारांचेच असे. या कामाच्या मोबदल्यात त्याला शिल्लक राहिलेले अन्न मिळत असे व ते घेणे महार आपला हक्क समजत असत. "[१४३] लाकडे फोडणे व रयतेस आणून देणे हे

महाराचे काम असल्यामुळे सरकारने पुढील आदेश जारी केला होता. ''महारास ताकीद करून लाकडे आणवणे.''[१४४] ''महाराने मोळी आधी बंगोजी पाटील याचे घरी द्यावी, मागून गोरखोजी पाटील याचे घरी द्यावी.''[१४५] ''कुणब्याचे गुऱ्हाळ चालू झाल्यास चुल वणासाठी सरपणाचे भारे महार आणित असे मोबदल्यात त्याला गुळाच्या दोन ढेपा व शेवटचे आधण मिळत असे.''[१४६]

**३) प्रेतासाठी खड्डा करणे :**

गावातील एखादी व्यक्ती मृत्यू पावल्यास प्रेताचे दहन करण्यासाठी लाकडे आणून ती स्मशानभूमीकडे वाहून नेण्याचे काम महाराला करावे लागे. तसेच प्रेताचे दफन करण्यासाठी 'खड्डा' खोदण्याचे काम देखील महारालाच करावे लागे. '' कुणबी, मुस्लिम व सर्व नीच जातीचे प्रेते खड्डा करून पुरत असत. प्रेतास पुरण्यासाठी जो खड्डा खणत असत तो प्रामुख्याने महार ही जात खणत असे. याचा त्यास मोबदला मिळत असे.''[१४७] ''मृताचे सरण रचण्यासाठी लाकडे व गोवऱ्या वाहून स्मशान भूमीकडे नेणे हे महाराचे कर्तव्य होते. ''[१४८] ''माणसे मरतील त्याचे कफन व पदरी द्रव्य बांधतील ते महाराचे असे.''[१४९]

**४) मुऱ्हाळी म्हणून जाणे :**

''गावच्या पाटलाची, आसामीची व जमीनदाराची मुलगी किंवा सून परगावी जाणार असेल तर तिच्या संरक्षणासाठी तिच्या सोबत मुऱ्हाळी म्हणून महार जात असे. आशा वेळी त्या स्त्रिवर चोर दरोडेखोराने हल्ला केला तर जीवाची पर्वा न करता त्या स्त्रिच्या संरक्षणासाठी तो चोराशी सामना देत असे. जो पर्यंत स्वत:चा जीव आहे तोपर्यंत महार त्या स्त्रिला धोका होऊ देत नसे. ही अवघड कामगिरी महार यशस्वीपणे पार पाडत असे.''[१५०] ''छत्रपती शिवाजी महाराजाची मुलगी सखुबाई ही बाबाजी निंबाळकराच्या मुलाला दिली होती. तिच्यावर एकदा संकट गुदरले. त्या प्रसंगी वाल्हे येथील महार तिच्या उपयोगी पडले.''[१५१]

**५) निरोप पोहोचविणे :**

गावातील सवर्णांचे निरोप व त्यांच्या निरोपाच्या चिट्टया पोहोचविण्याचे काम घर महार करत असे. या बरोबरच गावकऱ्यांच्या वस्तू व धान्य एका ठिकाणा वरून दुसऱ्या ठिकाणी पोहोचविण्याचे काम देखील घर महारच करीत असे.'' चाबळीच्या गणेशपंत मनाजीपंताची बायको मौजे खांबगावास उजडावयास तेथील पाटलास सापडली, तेव्हा त्या पाटलाने तेथील महारास हा निरोप देण्यासाठी चाबळीस तिचा सासरा शक्राजीपंत यांच्याकडे पाठवीला.''[१५२]

''लिंगनाक महार याच्या जवळ काही महत्त्वाची कागदपत्रे देऊन व त्याला लखोटा करून सातारियास पाठविल होते. याच महाराबरोबर हरबरे पावने तीन पाईली, बाजरी सवाचार पाईली, जोरी साडेपाच पावणे सा पाईली रवाना केली होती.''[१५३]

''आपाजी नाईक जेथे देशमुख याजपासी सेवेसी सोन माहाला तावरे न्हावी बेदरी पातशहा होते ते समई हे तेथे गेले होते सबब जे पेशजी देशमुखी त ॥ म ॥ ची दगडे याची होती त्यांच हे कारभारी होते नंतर कितेक दिवसानी दगड्यांचे निर्मुलन झाले तेव्हा आपाजी न ॥ चा लेक बाजी न ॥ हा मागे घरी होता असे वर्तमान होताच कान्होजी राऊत व भाननाक माहार यांना खबर द्यावयास बेदरास पाठविले.''[१५४]

''रामाजी आपाजी हवालदार त ।। तुडील व आफियेत बासेद यांना लिहिलेल्या पत्रात लिहिले की पैसे जलदीने शेख हमजाचे व इभरम अलीचे सोबत रवाना करणे आपले घरी शादी आहे व मुर्गीया वगैरा सामान शादीबद्दल रवाना केले पाहिजे येक बेगारी (माहार) देऊन रवाना करणे.''[१५५]

**६) होळीसाठी गोवऱ्या व लाकडे पुरविणे :**

या सणासाठी गोवऱ्या व लाकडाचीच गरज असते. लाकडे व गोवऱ्या पाटील व आसामीच्या घरी पोहोचविण्याचे काम देखील महाराचेच होते. गावात सार्वजनिक ठिकाणी होळी पेटविली जात होती. या साठीच्या गोवऱ्या देखील महारच आणित असे. सार्वजनिक

होळीप्रमाणेच महारवाड्यात देखील होळी पेटविली जात होती. प्रथम महारवाड्यातील होळी पेटविली जाई व नंतर ह्या होळीतील विस्तव महार गावातील सार्वजनिक होळी पेटविण्यासाठी घेऊन जाई. हा विस्तव घेऊन जाणे हा महाराचा हक्क होता. याचा मोबदला म्हणून महारास गावकऱ्याकडून अन्न, होळीचा नैवद्य, खोबरवाटी व पानसुपारी मिळत असे.

''गावीचे होलीस महाराचे होलीचा विस्तो आणावयासी महारास द्यावे खोबरेची वाटी१ पानसुपारी विडा कलम १ गावीचे होलीचा नैवद्य कोलीयाने व घडसियाने घ्यावा उचलिलेह हाते कोली महारास देईल ते घ्यावे कलम १''[१५६] ''सणास मोलिया दर सणास मोली १''[१५७]

**७) मृत्यूची बातमी देणे :**

घर महाराला गावात एखाद्या व्यक्तिचा मृत्यू झाल्यास मृताच्या नातेवाईकास त्याची बातमी देण्याचे काम करावे लागे. या वेळी महाराला काम चुकवता येत नसे किंवा कोणती अडचण सांगून कामास नकार देता येत नसे. त्याला तहान, भूक, ऊन, वारा, पाऊस, थंडी याची पर्वा न करता ती बातमी देण्यासाठी वेळी अवेळी जावे लागे.

''शुध्द शुक्रवारी वढूकर महार गावीहून आलाकी, बाल्हाजी पाटील भोवडा पेशवियाच्या लष्करात चाकरीस गेला होता, तो वारलियाची खबर आली, म्हणून सांगावयास आला होता.''[१५८]

**८) शेतकऱ्याचे ओझे वाहून नेणे :**

''कुणब्याचे बी-बियाणे, नांगर, औत आणि इतर सामान दररोज शेतवर नेणे व आणणे, त्यांच्या गुरांचे गोठे बनविणे व त्यांची दररोज साफसफाई करणे, आसामीच्या दारापुढील आंगण झाडणे, त्यांना सरपण आणून देणे व फोडणे, मिरासदार, जमिनदार व कुणबी यांच्या बरोबर प्रवासात त्यांच्या सूरक्षिततेची काळजी घेणे व त्यांचे निरोप बाहेरगावी पाठविणे. ''[१५९] वरील कामे महारा बरोबरच त्याची बायको व घरातील इतर सदस्यांना करावी लागत असत.

९) इतर कामे :

वरील कामा बरोबरच घर महाराला इतरही काही कामे पाटील व शेतकऱ्यांची करावी लागत होती. ''पाटील किंवा कुणबी शेतकऱ्याच्या घरी त्यांच्या लेकीला किंवा सुनेला मुलगा किंवा मुलगी झाली तर त्याची बातमी त्यांच्या नातेवाईकांना देण्याचे काम महाराला करावे लागे. या मोबदल्यात महाराला शेला पागोटा देण्यात येई. पाटलाला किंवा आसामीला लग्नासंबंधासाठी परगावी जावयाचे असेल तर त्याच्या सोबत महाराला जावे लागे. आशा प्रसंगी महार सोबत असणे म्हणजे पाटील व आसामीची प्रतिष्ठा समजली जाई. त्यामुळे पाटील व आसामी अशा प्रसंगी महाराला सोबत घेऊनच जात असत. महार असामीकडून मिळालेली चटणी भाकर खाऊन त्यांच्या गाडीची देखरेख व बैलाला वैरणपाणी करण्याचे काम करीत असे.''[१६०]

पेरणीच्या वेळी शेतकऱ्यांचे बी-बियाणे शेतात घेऊन जाण्याचे काम घरमहाराला करावे लागे. यात कुळवाडी आपली प्रतिष्ठा समजत असे. या मोबदल्यात महाराला काही पैसे व ओटीभर धान्य मिळत असे. कुळवाडीच्या घरी खळ्यामध्ये महारणीस दररोज बटीक म्हणून हलकी कामे करावी लागत, तर महार खळे राखण्याचे काम करी. पाटलाच्या व आसामीच्या घरी लग्न व इतर कार्यक्रम असेल तर महाराला त्या दिवशी सरपण फोडावे लागे व महारणीला रात्रीच्या वेळी टेंभा धरावा लागे. या कामाच्या बदल्यात महाराला शेला पागोटा व महारणीस साडीचोळी मिळत असे. आसामीच्या घरी मेलेले जनावर ही ओढून हाडकी हाडोळ्यात महाराला न्यावे लागे. मृत जनावराची कातडी काढून ती मालकास परत द्यावी लागे. मृत जनावराची कातडी महाराने की मालकानी घ्यावी या विषयी इ.स. १८९० साली परभणीला रयत व महार यांच्यात वाद सुरु झाला, तेव्हा महारांनी ही तक्रार परभणीच्या प्रथम दर्जाच्या तालुकादाराकडे केली. परंतु मृत जनावराची कातडी कोणी घ्यावी याविषयी तालुकेदारकडे नोंद व पुरावा नसल्याने परभणीच्या तालुकादाराने हे प्रकरण सरकारकडे महसूल खात्याला सादर केले. सरकारणे

यावर निर्णय दिला की, "महाराने मेलेल्या जनावराचे मांस घ्यावे व कातडी मालकास द्यावी नसता कातडी महाराने घेतल्यास मालकाला चपलाचा एक जोड द्यावा."[१६१]

वरील प्रकारची गावातील सर्व कामे महाराला कोणतेही कारण न सांगता निमूटपणे करावी लागत. गावातील सवर्ण काम पडल्यास महाराला बोलावण्यासाठी त्याच्या घरी जात. महार घरी नसेल तर त्याच्या बायकोस, मुलास किंवा इतर नातेवाईकास जावे लागे. महारांनी सवर्णांची पडेल ती कामे काळ वेळ न पहाता केली परंतु त्याच्या कामाचा मोबदला मात्र त्याला फारच कमी मिळत असे. म्हणून महाराचे दारिद्र्य त्याच्या पाचवीलाच पुंजल्याचे दिसून येते.

**२.५.३ वेठबिगारी कामे :**

**व्याख्या :** "वेठबिगारी म्हणजे एखाद्या व्यक्तीकडून सक्तिने विनामूल्ये काम करून घेणे होय. ज्या व्यक्तीकडून सक्तीने काम करवून घेतले जाते, त्या व्यक्तीस 'बिगारी' असे म्हटले जाते." मोल्सवर्थ[१६२] यांच्या मते वेठबिगारी म्हणजे 'Person pressed (to carry a load or to render other service, or to do work.)' पुढे ते म्हणतात की, 'Labour or service exacted by a government or a person in power without giving remuneration for it or press service'[१६३] साधारणपणे असे म्हणता येईल की, 'प्रजेकडून किंवा व्यक्तीकडून सक्तीने विनामुल्ये काम करून घेणे म्हणजे वेठबिगार होय.'

या पद्धतीचा उगम प्राचीन काळापासून झाला असून ही प्रथा मध्ययुगीन काळात ही प्रचलीत होती. स्वातंत्र्याच्या दशकानंतर ही प्रथा कायद्याने नष्ट झाली. परंतु केव्हा तरी कुठे तरी या प्रथेची पुनरावृत्ती झाल्याचे प्रकार वृत्तपत्रामधून पहावयास मिळतात. "वेठबिगार पद्धती प्राचीन भारतात सार्वत्रिक प्रथा होती. समाजात ज्या वेळी राजेशाही होती किंवा राजेशाही प्रणीत समाज अस्तित्वात होता. त्यावेळेस प्रजेच्या संरक्षणाच्या बदल्यात कर वसुली केली जात असे. ज्या समाज घटकांना हा कर देण्याची ऐपत नसे त्यांना त्या बदल्यात करा ऐवजी

काही काळापूरते विनावेतन काम करावे लागत असे. अस्पृश्यता व सती या प्रथांना जशी धर्म मान्यता होती तशीच धर्म मान्यता वेठबिगारी या पद्धतीस होती. गौतम, मनू व विष्णू या धर्मशास्त्रकारांनी कारागीर वर्ग व शुद्र वर्ग याजकडून महिण्यातून एक दिवस विनावेतन सेवा करून घेण्याचा अधिकार राजाला दिला. शुक्रानेही विनावेतन सेवा महिण्यातून दोन दिवस घ्यावी असे म्हटले आहे. गौतमाने सांगितले की ज्या दिवशी विना वेतन काम घ्याल त्या दिवशीचे जेवण त्या कारागिरांना देत जा.''[१६४] मुसलमानी राजवटीत देखील वेढबिगारी पद्धत अस्तित्वात होती हे पुढील संदर्भावरून लक्षात येईल.''वेटी बेगारी करीता आगराची नाकिर्दीजाली आहे. तरी वेठीबेगारीची तसवीस माफ करणे व आगरीहून, भाजीपाला व केळे, आंबे बाजारामध्ये विकावयास नेतो त्यासी वानगी म्हणौनु हर कोण्ही तसवीस देऊन लुटिताती म्हणौनु तरी आगर मजकुरीचे प्रजांसी वेठी बेगारीची तसवीज न दीजे.''[१६५]

''सैद सादत सैद बाबा पोदखदी बिन सैद महामद बोधला परिजादे इनामदार मौजे चिचवली तपे परहून मामले मुर्तजाबाद उरुफ चेऊल ताहा पदाजी बाबजी खेत्री सो । कसबे मजकुरु सु ॥ सन समान समानीन व तिसा मैया कारणे कौलदादे यैसाजे तुम्हास खारी फांगार देखील लागवट मौजे मजकुरु आपली मिरास विकत दिधली तीस रकम महसूल देखील कारून सीगौटी बोरवारटका व वेठीबिगार व जाबीत फर्मास व पिटीया सारे कदीम व जदीद व हरयेक बाब.''[१६६]

निजामशाहीचा वजीर मलिक अंबर याने चौल प्रांतातील वेठबिगारीची प्रथा बंद केली होती, परंतु हाच प्रदेश जेव्हा शिवाजी महाराजांच्या ताब्यात आला तेव्हा त्यांनी त्या ठिकाणी पुन्हा वेठबिगारीची प्रथा सुरु केली. छत्रपती संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत येथील रयतेने वेठबिगारीचा त्रास होत असल्याची तक्रार सरकारकडे केली. तेव्हा संभाजी राजांनी त्या प्रदेशात वेठबिगारीची प्रथा पुन्हा बंद केली. त्यासाठी पुढील संदर्भ पाहा.

''मामले मजकुरीची खेस कानुकमाविस बर... कदीम कारकिर्दी निजामशाह दर जमाने

मलिक अंबर अजाजीत पटिया मिरासदार पटिका व सादिलवार पटिया व गैर मसूल व निपुत्रिक जुलूम ज्याजती व वेठबिगारी व जाबती फर्मासी येक जरा सदरहू तसविजा लागलिया नाही या करिता मामले मजकुरीची मामुरी जाली होती. येव्हेकरी (ता) मलिक अंबरचा अैसाफ चौपातशाहीमध्ये जाला सदरहू तसवीस लागो दिधली नाही.'[१६७]

''मामले मजकुरी किले याची वेठेबेगार हमेश्या पडते तेणे करून कुणबी खलकाचा राह राबत होत नाही कितेक गाव वैराण पडतात महणून मीर सैद महमद दिवाण येही किले याची वेठेबेगार कूल माफ केली आहे हमी साहेबाची काबिजात आलियापरी वेठबेगार घेऊन किले यास नेतात.''[१६८]

''जिरायेती व बागाइतीचे वाडवल व अनाडी याचे पाठीसी हमेशा वेठबिगारी लागली आहे ते दुरी केली पाहिजे वेठीकरिता सेताचा राबकस्ट राहाताती व वाडीचे कुंपकुडण व झाडास सेण पाणी होत नाही खराब पडते तरी वेठी बेगारीची तसवीस दूर केली पाहिजे म्हणौनु तरी साल मारी भाडे राजकोटास ठिकाणी पाविलीयावरी आणिक वेठीची तसवीस लागणार नाही कलम १॥''।[१६९]

**मराठाकाळ : वेठबिगारीची हक्कदार व वेठबिगार करणारे लोक :**

वेठ बिगारीचा हक्क हा प्राचीनकाळी फक्त राजालाच होता. तसेच वेठबिगार आशाच लोकांकडून घेतलाजाई की, जो कर भरू शकत नसे. पण हे तत्त्व मराठे काळात बदललेले दिसते. मराठे काळात वेठबिगार घेण्याचा हक्क ''सरकार' (छत्रपती व पेशवे), संरजामदार, सरदार, जमीनदार, पाटील, कुलकर्णी, देशमुख, देशपांडे, इनामदार, पेठांचे अधिकारी, सर्व वतनदार, जहागीरदार व देवस्थानचे प्रमुख यांना होता.

पुढील जातीतील लोकांकडून वेठबिगार घेतली जात असे.

१. शुद्र बलुतेदार व आलुतेदार वर्ग : साळी, कोळी, माळी, तेली, तांबोळी, सुतार, न्हावी, परिट, लोहार, कुंभार, गुरव, जंगम, गोंधळी, मुलाना भट, वाजंत्री, बुरुड, ठाकूर, घडसी,

गवंडी, भोई, गोसावी, शिंपी, धनगर.

२. अतिशुद्र बलुतेदार वर्ग : महार, मांग, चांभार.

३. इतर लोक : खलब ठाकुरी, शंताचे अर्धले, बकाळ, अनाडी व वाडवळ''[१७०] ब्राह्मण [१७१] आणि ''शुद्र जातीमधील 'कासार' यांना मात्र वेठबिगार माफ होती.''[१७२]

वरील वेठबिगाराकडून पुढील कामे विनामुल्य करवून घेतली जात असत. ''सरकारी चौकीवरील वेठबिगार, सरकारी अधिकाऱ्यांची घर बांधणे, खाजगी व सरकारी किरकोळ कामे व ओझे वाहण्यासाठी, वतनदार व इनामदार यांची निघतील ती सर्व कामे व त्यांची घरे बांधण्यासाठी, सरकारी बांधकामे, पाणी पुरवठा करणे, किल्याची बांधकामे व दुरुस्ती, पीके व लाकडे तोडण्यासाठी, हुजुर पागातील निघतील ती सरकारी वेठबिगार, गवत कापणे, शेतीची मशागत, सणाच्या दिवशी वतनदाराच्या घरी राबणे व लावणी पेरणी करणे.'' [१७३] ही सर्व वेठबिगारीची कामे होती. यानंतर महारांना करावी लागलेली वेठबिगारीची कामे पुढीलप्रमाणे सांगता येतील.

**महारांची वेठबिगारी कामे :**

गावगाड्याचा महार हा हरकाम्या शिपाई व वेठबिगार होता. तो सरकार व रयतेचा राबता होता. राबता म्हणजे, 'The practice of exacting work, on the public service, from the mahar, किंवा The Mahar upon whom certain work or service is imposed on the public account.'[१७४] महारास राबता म्हणण्याचे कारण असे की तो रयतेसाठी रात्रंदिवस राबत असे. वेढबिगारीची सक्ती शिवकाळात शुद्रजातीवर देखील होती. परंतु शिवकाळानंतर जी पेशवाई सुरु झाली यावेळी अतिशुद्र जातीवर व त्यातल्या त्यात प्रामुख्याने महारावर वेठबिगारीची सक्ती होती. म्हणूनच ''माहार बांधले खोलेचा बारमाही अष्टोप्रहर राबता असावा.''[१७५] ''राबते माहार पंधरा दिवस सालीना राबवून पोटास देणे.''[१७६] ''महाराने देशपांड्याच्या घरी पंधरवडा राबावे.''[१७७] ''राबते महार दोन महिने राबवावे जाजली

न घेणे.''[१७८] ''गावगन्ना दर गावास राबते महार एक महिना घ्यावा.''[१७९] असे सरकारने आदेश दिले होते. एवढेच नाही तर ''महाराला सर्व वतनदाराकडे वेठबिगारी म्हणून राबावे लागे.''[१८०]

सरकार विविध कामासाठी अतिशुद्र जाती व महारांना बोलावत असत आणि त्यांनी सांगीतलेली सर्व कामे त्यांना वेठबिगार म्हणून करावी लागत असत.

सरकारने विविध प्रांतामधून इ.स. १७५०-५१ या कालखंडात वेठ्यांच्या सरकारी कामासाठी बोलाविले होते. त्याची माहिती पुढीलप्रमाणे आहे.

''जुन्नर प्रांतातून ९२ महार अंगमेहनतीच्या कामासाठी, १० मांग दोरखंड वळण्यासाठी, १० चांभार चामड्याचे काम करण्यासाठी बोलाविले होते. प्रांत गंगथडी मधून ५० महार, पुणे प्रांतातून ६० महार, करकंब परगण्यातून २५ महार आणि परगणाभोसा मधून २५ महारांना वेठीच्या कामासाठी बोलविले होते.''[१८१]

सरकारने सरकारच्या घोडदळासाठी कामकरण्यासाठी इ.स. १७७५-७६ साली निरनिराळ्या ठिकाणाहून अतिशुद्र वेठबिगारांना बोलविले होते.

| | | |
|---|---|---|
| १. | तालुका हवेली संगमनेर | ३० महार, १० मांग, १० चांभार, ५ जिनगर, एकूण ५५ |
| २. | परगणा पारनेर | ४० महार, १० मांग, १० चांभार, एकूण ६० |
| ३. | तालुका राहुरी | १० महार |
| ४. | तालुका खेड | ९ महार, ३ मांग, ३ चांभार एकूण १५ |
| ५. | प्रांत जुन्नर | २९ महार, ११ मांग, ९ चांभार एकूण ४९ |
| ६. | परगणा नेवासा | ७५ महार, ५ जिनगर एकूण ८० |
| ७. | परगणे करडे | १० महार, ५ मांग, ५ चांभा, एकूण २० |
| ८. | परगणे भांडापूर | ७५ महार, १० मांग, १० चांभार एकूण ९५ |
| ९. | तालुका बेलापूर | १० महार''[१८२] |

वेठबिगारीच्या कामाबरोबरच वेठबिगार ज्या वस्तूची निर्मिती करतात त्या वस्तूही वेठबिगारीच्या मोबदल्यात घेतल्या जात, त्यासाठी पुढील संदर्भ पहा.

''राजश्री मल्हार गोविंद गोसावी यासी सेवक चिमणाजी नारायण सचिव नमस्कार सु ॥ सबा सलासीन मया अलफ राजश्री स्वामीचा मुकाम को फलटणी आहे त्यास मांडवाचे व किरकोळ साहित्य जिल्हे पैकी आणविणे म्हणून आज्ञा केली आहे याज करीता हे पत्र सादर केले असे तरी के ॥ बारामती पैकी येणे प्रमाणे सामान क ॥ मारच्या मुकामास आणविणे असे पत्रदर्शनी रवाना करणे.

| | |
|---|---|
| वेठे | सुमार |
| १५ | ऐनवेठ |
| १० | माहार |
| २५ | |

एकूण राबताची ओझे २५ पाठविणे

गुरव कामास - गुरव सुमार ५

कुंभार काम - कुंभारा बरोबर पाठविणे

| | |
|---|---|
| १० | रांजन |
| २५ | डेरे |
| २५ | घागरी |
| ५० | मडकी |

तसेच कोळंबी, जाकणी, परळ, रांधणी, मोगे, दिवे लावणी इ.

सुतारकाम ''पोळपाट, लाटणी, ठाणक्या, मेखा, मेकसू इ. बुरुडा कडून तट्ये, हऱ्ये, दुरड्या, शिपतरे, पाट्या, सुपे, वरोळ्या, केरसुण्या व चाळणी इ.''[१८३]

सरकार व रयतेचा महार हा खरा वेठबिगार होता. त्याला अनेक बिगारी कामे करणे

भाग होते. आम्हाला पुढील बिगारीसाठी लुबाडण्यात येते अशी तक्रार ढेवळे येथील महारांनी कलेक्टरकडे केली होती. त्याची माहिती पुढीलप्रमाणे.

"जोड्याच्या बिगारी, बुटांच्या बिगारी, म्हशीच्या बिगारी, गाईच्या बिगारी, बकऱ्याच्या बिंगारी, घोड्याच्या बिगारी, बैलाच्या बिगारी, राघु - मैनाच्या पिंजऱ्याच्या बिगारी, पाळीव हरणांच्या बिगारी, कुत्र्यांच्या बिगारी, पलंगाच्या बिगारी, पेट्यांच्या बिगारी, भांड्याच्या बिगारी, मुलींच्या बिगारी, मुलांच्या बिगारी, जात्यांच्या बिगारी, शिपायांच्या गळ्यातल्या पोतड्याच्या बिगारी, बंदुकीच्या बिगारी, तलवारीच्या बिगारी, कांद्याच्या बिगारी. भाजीच्या बिगारी, चाकांच्या बिगारी, आंब्याच्या बिगारी, लाकडांच्या बिगारी, कमरेच्या पट्याच्या बिगारी, जाजमांच्या बिगारी, कपड्यांच्या बिगारी, पार्सलांच्या बिगारी, उसांच्या बिगारी, चाबकाच्या बिगारी, नांगराच्या बिगारी, खुर्च्यांच्या बिगारी, फळांच्या बिगारी, बाजेच्या बिगारी, माचवे बाज यांच्या बिगारी, खोगिरांच्या बिगारी, टेबलांच्या बिगारी, पोत्याच्या बिगारी, गाडीच्या जूंच्या बिगारी, सीवळा जोते यांच्या बिगारी, मडक्यांच्या बिगारी, तिकावांच्या बिगारी, व पावड्याच्या बिगारी, अशा एकूण ४३ प्रकारच्या बिगारीची कामे महाराला करावी लागत होती."[१८४] ह्या बिगारी नेण्याचे ठिकाण जवळ नसे तर हे अंतर दहा दहा मैलाचे असे, हे अंतर महारास पायी चालत जावे लागे. एवढे काम करूनही महाराला पोटाला पुरेशे अन्न मिळत नसे. तसेच पुरेसे वस्त्र ही मिळत नसत. महाराकडून काम करून घेतल्यानंतर त्यास पोटभर जेवण द्यावे अशी रीत असून ही ती पाळली जात नव्हती. एवढ्या वरच महाराचे हाल थांबले नसून स्थानिक सरकारी अधिकारी देखील महारांना वेठबिगारीचा भयंकर त्रास देत. या त्रासाला कंटाळून अनेक महार आपले गाव सोडून पळून जात असत. "गावगन्ना महारास राबणूक पडत्ये, त्यास पहिली चाल, सालात दोन आठवडे राबणूक घेऊन पोटास शेर द्यावा. ऐसीचाल होती. हल्ली राबणूक भारी पडते व पोटास शेरही देत नाही. याजमुळे कितेक गावचे महार परागंदा जाले आहेत."[१८५] असे सरकारला कळविले होते.

वेठबिगारीच्या त्रासाला कंटाळून लोकांचे गाव सोडून जाणे सरकारला फायदेशीर ठरत नव्हते. अशा वेळी लोक गाव सोडणार नाहीत याची सरकारला दक्षता घ्यावी लागे. यामुळे सरकार परस्थितीनुसार आपले धोरण बदलत असत. वेठबिगारांनी त्रासाची तक्रार सरकारकडे केल्यास त्याचा सहानुभूतीपूर्वक विचार केला जाईल. सरकार कधी कधी वेठबिगाराकडून वेठबिगारीच्या मोबदल्यात पैसे घेत असत. परंतु सरकारचे हे धोरण कायम स्वरुपी नव्हते तर ती परिस्थितीनूसार केलेली तडजोड होती.

''राजपूरी प्रांतीचे माहार साल दरसाल हुजूर वेठीस आणितात, त्यास साल मजकुरी वेठी मना करून दर गावास रूपया १ एक करार केला असे, तरी वसूल घेणे, महारास वेठीचा तगादा नकरणे.''[१८६]

''महारास राबणुकेचा एकमाही रूपया एक प्रमाणे सरकारात घ्यावयाचा करार होता तो मागील भक्तीयासी माफ केला असे, त्या प्रमाणे हल्लीचे मक्तीयासी माफ केला असे प्रयोजन लागलीयासी सरकारचे आज्ञेप्रमाणे वेठीस पाठवित जाणे.''[१८७]

अशा प्रकारे महारास सरकार, रयत व सर्व वतनदार मंडळी यांच्याकडे वेठबिगार म्हणून अनेक प्रकारची कामे करावी लागत सर्व सरकारी व गावकीची कामे करून त्रासून गेलेल्या महारावर पुन्हा वेठबिगारीची कामे लादणे हा फार मोठा अन्याय व जुलूम होता.

### २.५.४ महारांची इतर कामे :

**१) वेसकर :**

वेसकर या शब्दाला दुसरे नाव कोतवाल असे आहे. वेसकरकी किंवा येसकरकी हा महारकिच्या वतनाचा एक पोटविभाग आहे. त्यामुळे प्रत्येक खेड्यातील वेसकर हे महार, ध्येड जातीचेच असत.

''येसकर म्हणजे मुकदमाच्या हाताखाली गावाची रात्री गस्त घालणारा आणि गुन्ही, गुन्हेगारी शोधून काढणारा मनुष्य असे.''[१८८] यालाच राखा, वेशीराखा, जागला व तराळ या

नावाने ओळखले जाते. पाटील व कुलकर्ण्यानंतर गावकीच्या कामात त्याचा सिंहाचा वाटा आहे. सर्व वतनदार महार पाळीप्रमाणे वेसकरकी व गावकीचे काम करतात. कामगार महाराच्या हातात मोठी काठी असते. वेसकर हे तेवढ्या पुरते सर्व महारांचे नाईक समजले जातात.

मराठा कालखंडात गावच्या संरक्षणासाठी गावकुस असे. गावकुस म्हणजे कच्चा विटा व मातीपासून बनवलेली मोठी भिंत. गावकुसाची ही प्रथा प्राचीन काळापासून अस्तित्वात असल्याचे दिसून येते. या गावकुसाला एक, दोन किंवा या पेक्षा जास्त ही वेसी असत. ह्या वेसीवर एका महाराची नेमणूक केलेली असे व हा चोवीस तास त्या वेसीत बसलेला असे. म्हणून त्या महारास वेसकर म्हणत. या समुहाच्या लोकांची महारात एक पोट जात निर्माण झाली त्या पोट जातीस 'वेसकर किंवा येसकर' म्हणतात. गावात येणाऱ्या प्रत्येक व्यक्तिस याच वेसीमधून गावात प्रवेश करावा लागे. यामुळे गावातील प्रत्येक व्यक्ती हा वेसकराच्या ओळखीचा असे. या व्यतिरिक्त नवीन व्यक्ती गावात येत असल्याचे दिसताच वेसकर त्याची पूर्णपणे कसून चौकशी करीत असे आणि चौकशी अंतीच त्याला गावात प्रवेश मिळत असे. फक्त चौकशीवरच हा महार थांबत नसे तर त्या नवख्या मानसाची खबर तो पाटलाला देत असे.

''ग्रामीण समाजात वेसकर किंवा कोतवाल यांना विशेष महत्त्व होते. कोतवालास प्रत्येक जमिनीचे भूस्वामीचे नाव माहित असे. तो पाटील व शेतकऱ्याचा सेवक असला तरी काही चूक घडल्यास एकटा पाटील त्यास नोकरीवरून काढू शकतो. निरोप किंवा निरोपाच्या चिठ्ठ्यानेणे, रयतेपासून महसूल वसूल करणे, प्रवाशांना सर्व प्रकारची मदत करणे, त्यांना बेगार पुरविणे, येणाऱ्या जाणाऱ्याची बातमी राखणे, इंधन पुरविणे, गावची राखण करणे, चोराचा माग दुसऱ्या खेड्यापर्यंत काढणे, गुन्हेगाराचा शोध घेणे, रात्री गावात गस्त घालणे व दवंडी देणे ही वेसकर महाराची कामे होते. मोठ्या खेड्यात कोतवालाच्या मदतीला तराळ असे. तोही महार जातीचाच असे. कोतवालास प्रत्येक नांगराखाली असलेल्या जमिनीसाठी मेरकुडी' म्हणून एक कुडव धान्य घेण्याचा हक्क असे. 'खरसूत' म्हणजे पाठ झाडून उरलेले पीठ आणि 'बादल' म्हणजे

मृत जनावराचे कातडे व अस्थिपंजर घेण्याचा हक्क कोतवालाचा होता.''[१८९]

इतर महाराप्रमाणेच वेसकर महाराला देखील मिळणारा मोबदला हा अपूरा होता. रयतेने त्यांना पुरेसे अन्नदेखील दिले नाही. यामुळे त्यांच्या उदरनिर्वाहाचा प्रश्न मोठा कठीण बनला होता. यांना शिळे व टाकावू अन्न दिले जात होते. त्यांना लोक नावे ठेवत त्यांचा छळ करत; परंतु महारांनी आपला प्रमाणिकपणा सोडला नाही किंवा उदरनिर्वाहासाठी इतर वाईट मार्ग अवलंबीला नाही. कारण त्यास लहानपणापासूनच प्रमाणिकतेचे डोस पाजण्यात आले होते. म्हणून तो आपले काम नेकीने व सर्व संकटांना तोंड देत करत असे.

**२) जागला :**

वेसकरकीप्रमाणेच जागलकी हा महारकीच्या वतनाचाच एक पोट विभाग होता. महार जातीचेच जागले जास्तीत जास्त खेड्यात आढळतात. कुठेतरीच इतर जातीच्या व्यक्तीकडे हे काम दिल्याचे दिसते. लहान गावात गावकी व जागलकीचे काम एकाच महाराकडे दिलेले असे. ''गावच्या पहारेकऱ्यालाच कर्नाटकात तराळ, महाराष्ट्रात महार व खानदेशात जागला या नावाने ओळखले जात असे. जागला हा गावचा पोलीस शिपाई असे.''[१९०] पाटील, कुलकर्णी, महार व जागले हे खेड्यातील वतनदार, सरकारी गावनोकर होते. जागल्या हा पाटील, कुलकर्ण्यापेक्षा हलक्या दर्जाचा गाव नोकर होता. त्याची नेमणूक सरकार (पाटील) करीत असे. गावच्या लोकसंख्येच्या प्रमाणात महार व जागल्याची संख्या सरकारने निर्धारित केलेली होती. ती पुढीलप्रमाणे[१९१]

| गावची लोकसंख्या | महार | जागले |
|---|---|---|
| १ ते ५०० | १ | १ |
| ५०० ते १००० | २ | १ |

महार व जागले यांची संख्या गावच्या लोकसंख्येच्याप्रमाणात ठरलेली होती. परंतु सरकार व रयत यांनी हा नियम धाब्यावर बसविलेला दिसून येतो. गावची लोकसंख्या कमी

असताना देखील महार व जागल्याची भरपूर प्रमाणात नेमणूक करून त्यांच्याकडून कष्ट करून घेतल्याचे दिसते.

''अहमदनगर जिल्ह्यातील चार ते पाच हजार वस्तीच्या पारनेर गावाला महार जागल्याचे राजरोष लष्कर ५० आहे, ते असे महार ३२, वेसकर ४, रामोशी ८, सोनार २, मुसलमान जागले उर्फ हवालदार २ आणि एक दोन नायकवाडी. धांदरफळ तालुके संगमनेर जि नगर येथे लोकसंख्या सुमारे १६२५ असून तेथे ३२ महार, वेसकर ४ आणि जागले ३ आहेत. ठाकुर पिंपळगाव, तालुका शेवगाव जि. नगर येथे गावची लोकसंख्या ८०० असून गावाला ८ महार व २,३ जागले आहेत.''[१९२] सरकारकडून महार जागल्यास ५ ते १० रूपये रोख मुशाहिरा व रयतेकडून बलुते मिळत असे. जागल्यास काही ठिकाणी सरकारकडून इनाम जमिनी देण्यात आल्या होत्या.

जागल्यास पाटलाच्या आदेशानुसार काळी पांढरीचा चौकी पहारा करावा लागे. पाटील, कुलकर्णी ही फक्त सही शिक्याची माणसे होती. जागले हे यांच्या हुकूमाचे खरे धनी होते. फौजदारी कामात पाटलाला खरी मदत जागल्याची होत असे. जागल्यास गावातील सर्व बारकावे व बदमाश माहित असत. कारण जागल्या काळी पांढरीत सतत पायपीट करणारा व्यक्ती होता. यास गावची इत्यंभूत माहिती असे. जागला म्हणजे गावची माहिती पुस्तीकाच होता. त्यास गावातील चोरीचा तपास लावावा लागे. चोरीचा माग गावाबाहेर काढून दाखविला नाही; तर चोरीची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडत असे आणि चोरीचा ऐवज त्यास भरून द्यावा लागे. सरकारी अधिकारी गावात आल्यास त्याची सर्व व्यवस्था ह्याला करावी लागे. उदा. त्याची वेठबिगारी वाहने, त्याच्यासाठी तंबू उभारणे, स्वयंपाकासाठी सरपण आणणे, घोड्याला चारापाणी करणे व घोड्याचा खरारा करणे इ. या बरोबरच त्याला पाटील, कुलकर्णी, देशमुख व देशपांडे यांच्याकडे फुकट राबावे लागे.

''जागल्यास गावच्या शिवाराची सर्व माहिती ठेवावी लागे. शेत, बांध, उरूळ्या तसेच

कोणाच्या शेतात काय पेरले व कोणाचे शेत पडीक आहे, यावर ही त्यास निगराणी ठेवावी लागे. शेतजमिनीच्या सर्व तंट्यात जागल्याची साक्ष महत्त्वाची मानली जाई. ''[१९३]

दोन गावातील सीमा तंटा सोडविण्यासाठी महाराने अनेक प्रकारचे दिव्ये केली. जागल्या हा रात्रभर जागत राहून गावचे रक्षण करीत असे. त्याने गाव पोटच्या मुलाप्रमाणे सांभाळला. गावावर चोर दरोडेखोराने हल्ला केल तर एकटा जागल्या त्याच्याशी सामना देत असे; बाकी रयत मात्रखुशाल झोपत असे. तरीपण रयतेने स्वखुशीने जागल्यास पुरेसे अन्न व बलुते दिले नाही. सरकारला देखील याची दया आली नाही, त्यांनीही दहा वीस रूपयापेक्षा त्यांना अधिक पगार दिला नाही. यामुळे जागल्यावर उपासमारीची वेळ आली. परंतु त्याने गाव सोडले नाही. प्रमाणिकपणे त्याने गावची सेवा केली.

गावातील सर्व खाणाखुणा जागल्याला माहिती असत. ''त्या काळी धान्य उत्पादन अधिक झाले की, ते घरात साठवणे कठीण असायचे म्हणून दारासमोर रस्त्यात विहीरी प्रमाणे खड्डे तयार करायचे. ते बांधून काढायचे नाहीत. त्यांची खोली १० ते २० हात असायची. त्याला पेव म्हणत. ही पेवे धान्याने भरत असत. त्यावर कडबा अंथरायचा व त्यावर चार दांडकी आडवी टाकून वर माती लोटत त्यामुळे पुन्हा रस्ता पहिल्यासारखा होत असे. पेवातील धान्य काढावयाचे झाल्यास ते सर्वच काढावे लागते. नसता धान्याला किड लागते. ही पेवे तीन तीन वर्ष न उपसता तशीच राहायची त्याच्या खुणा फक्त जागल्याला किंवा महारालाच माहित असत. पेवाच्या खाणाखुणाा जागल्याला दाखवाव्या लागत असत.''[१९४]

जागल्या महसूल व्यवस्थेतही पाटलाला मदत करायचा. वसुलीसाठी असाम्यांना गावच्या चावडीवर बोलावणे व त्यांच्याकडून गोळा झालेला वसूल तालुक्याला घेऊन जाणे हे जागल्याचे कर्तव्य होते. श्री संत एकनाथ महाराजांनी जागल्याचे वर्णन पुढील शब्दात केले.

''रात्रंदिवस घोकितो तुम्ही सावध असा ।

तुमच्या नगरीचा आम्हा नाही भरोसा ।

उजेड पडताना गळा पडेल फासा ॥१॥
उठा की जी मायबाप । कशी लागली झोप ।
हुजुर जागूनिया । येवढी चुकवा खेप ॥धृ॥ २ ॥
तुमच्या नगरीची नाही नांदणूक बरी ।
तुमच्या शेजेला दोन लोभिष्ट नारी ।
त्यांच्या योगे दु:ख नगरात भारी ॥३॥
हिंडता देशांतरी चौऱ्यांशी जग ।
अजून सापडला नाही नीट सूमार्ग ।
कोणते हित केले बापा संग ॥४॥
जुन्या ठेवण्याच्या तुम्ही पूर्जा काढा ।
त्याच्या आधारे बोलेन घडाघडा ।
एका जनार्दनी धरा बळकट मेढा ।
चाकर हुजूराचा घेईन अवघा झाडा ॥५॥''[१९५]

**३) प्रसुती व गर्भपात करण्याचे काम :**

महारांनी याकाळात गावकी, सरकारी व इतर कामे तर केलीच; परंतु महार पुरुषाप्रमाणेच महार स्त्रियादेखील मागे नव्हत्या. महार स्त्रिया यावेळी डॉक्टरांचे काम करत असल्याचेही दाखले सापडले आहेत. यासाठी खालील संदर्भ सांगता येतील.

''जानकी कोलीण सगी कोलीण इची लेक तिचा दादव्या दहा वरसे मुलकावर गेला आहे त्याच ठिकाणी नाही ती आईपासी पोट भरून आहे त्यास भोपसिंग पूरवर्या याजे घरी रोज पाणी घालीत होती त्या वरून भोपसिंग याचा व आपला योग घडला त्याजवर पोट आपले वाहाडले तेव्हा सीता महारीण येसू कावल्याची बायको तिजला २ रू । भोपसिंगाने देऊन तिचे आवशेद देऊन नायगावचे रानात पाडले पाडल्यास आज बारा दिवस जाले. ''[१९६]

"जबानी सती कोम येसा माहार मौजे लोणी कारणे जबानी लेहून दिल्ही येसाजे कुसी ठाकरीन व मैनी कोलीन ह्या दोघीजी माझ्या घरास आल्या आणि म्हणोन लागल्या की रमी माडऱ्याची लेकीचे पोटचे पाडावयाचे आहे त्यास तुजला एक लुगड व दोन रू । देऊ आणि तू पाडणे मग ती म्हटल की काही येत नाही तेव्हा वाघापूरचे मांगणी पासून पाडविले याजला येक वर्ष जाले त्यास आत्याचीजे पोटचे म्हणोन कुसीने व रमीने सांगितले."[१९७]

**४) विणकाम :**

महाराला गावकीच्या व सरकारी कामावर आपली गुजरानकरणे कठीण जात होते. कारण त्यांना त्यांच्या कामाचा योग्य मोबदला कधीच मिळत नसे. म्हणून त्यांना आपला उदरनिर्वाह करण्यासाठी इतरही व्यवसाय करावे लागले. "नागपूर शहरात व्यवसाय करणाऱ्या अस्पृश्य पुरुषांची संख्या पुढीलप्रमाणे होती. कापूस पिंजारी १८९, जोडे बनविणे व चामडे कमाविणे २८४, खोगीर व इतर चामड्यांचे काम करणारे १०८, नागपूरचे धोतर जोडे उत्तम धाग्यासाठी प्रसद्धि होते. ते धागे तयार करणारी महार (धेड ) कुटुंबे ४०० पेक्षा जास्त होती. भैरो नावाचे पांढरे कापड महार जातीचे लोक विणत. त्याला १० आण्यापासून १० रूपयापर्यंत किंमत मिळत असे. उत्तम कापडास २० रूपये सुद्धा मिळत."[१९८] महाराने भारतीयांची कामे तर केलीच; परंतु तो ब्रिटीशांच्या घरचीदेखील कामे करत होता. यासाठी खालील संदर्भ पाहाता येईल.

"आपले गृहकार्य चालविण्यासाठी ब्रिटिश गृहिणीला मदतीची आवश्यकता भासली तेव्हा त्या मदतीसाठी तिरस्कृत महार धावून आला व तो कार्य दक्ष घरगडी ठरला आणि घरची लहान मुले सांभाळण्यासाठी त्या महाराची बायको कुशल व विश्वासपात्र बाई सिद्ध झाली."[१९९] वरील संदर्भ पाहाता भारतीय व ब्रिटिश लोकात एक फरक आपणास आतापर्यंतच्या विवेचणावरून दिसून येतो तो असा की, भारतीय सवर्णांनी आपल्याच माणसावर अन्याय, अत्याचार केला त्यांचा स्पर्श निषिद्ध मानला परंतु परकीय ब्रिटिशांनी मात्र कसल्याही प्रकारची

अस्पृश्यता न पाळता महार व महारीणीला आपल्या घरात मुक्त प्रवेश दिल्याचे दिसून येते. यावरून असे दिसून येते की, ब्रिटिशांनी माणसापेक्षा त्याच्या माणुसपणाला व कतृत्वाला जास्त महत्त्व दिले होते.

महार जातीच्या कामाचा आढावा घेतल्यानंतर आपल्या असे निदर्शनास येते की, महारांचा संबंध गावगाड्यातील प्रत्येक जातीशी आणि प्रत्येक जातीतील प्रत्येक कुटुंबाशी महारांचा प्रत्यक्ष संपर्क येत असे. महारांच्या सहकार्याशिवाय गावातील कुठलाही कार्यक्रम किंवा गावकऱ्यांचे दैनंदिन व्यवहार सुरळीतपणे पार पडत नसे. महार हा वतनदारापैकी एक अनिवार्य वतनदार म्हणून त्याचे अस्तित्व होते. गावकऱ्याच्या कामाशिवाय त्याला सरकारी स्वरूपाचेही काम करावे लागत असे. त्यात सरकारी आदेशाची गावकऱ्यांना वर्दी देणे, सरकारी अधिकाऱ्याचा पाहुणचार करणे, गावातील अत्यावश्यक माहिती सरकारी अधिकाऱ्यांना सांगणे, गावामध्ये प्रवेश करणाऱ्या व्यापारी, पाहुणे, वाटसरू यासर्वांची इत्यंभूत माहिती त्यांना ठेवावी लागे. यावरून मध्ययुगीन कालखंडातील महार म्हणजे सरकार आणि रयत यांच्यातील महत्त्वाचा दुवा होता.

महारांची तत्त्वनिष्ठ व सत्यवादी भूमिका किंवा वृत्ती हा तर महारांच्या दृष्टीकोणातून अत्यंत अभिमानास्पद आणि गौरवपूर्ण मुद्दा ठरतो. महार हा महाराष्ट्राच्या समाजकारणामधिल अत्यंत महत्त्वाचा घटक असला तरी त्याची आर्थिक स्थिती अत्यंत प्रतिकुल असे. धर्मशास्त्राच्या आदेशामुळे महारांच्या दारिद्र्याला सिमाच नव्हती. सवर्णांच्या दातृत्वावर गुजरान करणारी महार जात आर्थिकदृष्ट्या जरी दरिद्री असली तरी तीने गुन्हेगारीचा मार्ग कधीच अनुसरला नाही. इ.स. १९११ साली पाश्चात्य संशोधक एम. केनेडी [२०१] यांनी ''क्रिमीनल क्लासेस ऑफ द बॉम्बे प्रेसिडेन्सी' या ग्रंथामध्ये महाराष्ट्रातील गुन्हेगारी जगतातील सर्व जातींची नावे सांगितलेली आहेत. त्यात 'महारांचा' उल्लेख आढळत नाही. एम. केनेडीने सांगीतलेल्या महाराष्ट्रातील गुन्हेगारी जाती पुढील प्रमाणे आहेत. ''बंजारा, बेरळ, राजपूत भामटे, भिल्ल, छप्पर बंद,

कैकाडी, कातकरी, कोळी, मांग, मांग गारूडी, पारधी, रामोशी, वाघरी, वडर आणि मिआने'' यासर्व गुन्हेगारी जातीमध्ये महारांचा उल्लेख आढळत नसल्यामुळे महार हा अत्यंत इमानदार, प्रमाणिक व सत्यवादी होता याबाबत कसलाही वाद निर्माण होऊ शकत नाही. महार हा गावचा पहारेकरी, रक्षक, पालक आणि सरकार व रयत यांच्यातील मध्यस्थ म्हणून वावरत असे. अशा प्रकारे महारांच्या कामाचा आढावा घेता येईल.

## २.६ महार आणि महाराष्ट्र :

महार ही भारतातील अतिपुरातन जात आहे. ते या भूमीचे मूळ पुरुष आहेत. म्हणूनच यांना 'भूमीपुत्र' असे म्हटले आहे. महार या भूमीचे राज्यकर्ते होते. आर्य भारतात येण्यापूर्वी या भूमीत नागवंशीयलोक राहात होते. 'नाग' नावाचा व्यक्ती यांचा प्रमुख राजा असल्यामुळे याच्या वंशजाला नागवंशीय म्हटले आहे आणि हे नाग म्हणजेच आजचे महार होत. याचे विवेचन पूर्वी केलेच आहे. एकंदरीत या महारांच्या कर्तबगारी वरूनच या प्रदेशास 'महाराष्ट्र' हे नाव पडले आहे.

''मोल्सवर्थ यांच्या शब्द कोशात जॉन विल्सन यांनी दाखवून दिले आहे की, गुजर + राष्ट्र = गुजराथ असे होते तसेच महार + राष्ट्र = महाराष्ट्र असे होणे सत्य आहे.'' [२०१] महारापासूनच या प्रदेशास महाराष्ट्र हे नाव पडले आहे यामताला खालील विद्वानांनी देखील पाठिंबा दिला आहे. त्यात आलेक्झांडर रॉबर्टसन [२०२], महात्मा फुले [२०३], श्री वामन भट [२०४], डॉ. दत्तात्रय पुरुषोत्तम खानापूरकर [२०५], डॉ. एन. जी. भवरे [२०६], डॉ. ओपर्ट [२०७], सोमवंशी बी.सी. [२०८], राजाराम शास्त्री भागवत [२०९], डॉ. हटन [२१०] इत्यादी.

महारापासून महाराष्ट्र हे नाव कसे तयार झाले हे पाहण्यासाठी एच. एल. कोसारे व श्रीधर व्यंकटेश केतकर यांची मते महत्त्वाची आहेत.

श्री. एच. एल. कोसारे [२११] यांच्या मते ''महाराष्ट्राच्या परिसरात अनेक नागवंशीय महार येऊन वेगवेगळ्या भागात वसाहती करून राहिले. या परिसरात इतरही वंशाचे लोक होते. परंतु

यात नागवंशीय महारांचा समुह प्रमुख होता. यांनी जो परिसर व्यापलेला होता त्याचे सर्व अधिकार त्यांच्याकडे होते. म्हणून त्या प्रदेशाला 'महाराष्ट्र' असे नाव पडले. "

श्री. व्य. केतकर [२१२] यांच्या मते "महाराष्ट्र हा शब्द व भाषा वररूचीच्या काळी होती आणि वररूचीच्या काळी ही भाषा संवर्धीत झाली होती आणि वररूचीचा काळ ख्रिस्तपूर्व ८०० पासून ६०० पर्यंत केव्हा तरी असा धरला तर महाराष्ट्राची स्वतंत्र भाषा अगोदर दोन तीन वर्ष तरी विकसीत होत असली पाहिजे. म्हणजे ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्त्रकात महाराष्ट्राच्या आद्यविकासाचा काळ जातो आणि या भाषेच्या नावास कारण झालेले जे महार आणि रट्ठ यांचे एकराष्ट्रीयकरण ते ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्त्रकात झाले असावे असे दिसते. अश्मक राजा करुयुद्धात पडला आणि कुरुयुद्धापासून अश्मकाचे सातत्य आहे; तर महार आणि रट्ठ यांचे एकराष्ट्रीयकरण आणि अश्मक राजाचे सातत्य याची संगती लावण्याचा प्रयत्न आवश्यक होतो. दोन राष्ट्रे एकत्र व्हावयाची ती एकावर दुसऱ्याच्या विजयाने होतात. महार आणि रट्ठ यांची देशभर मारामारी होऊन एकराष्ट्र होण्याची क्रिया अश्मकाचे राज्य चालू असता घडणे शक्य नाही; तर अश्मक राज्य सुरु होण्यापूर्वीच महारांच्या देशात रट्ठांचा प्रसार होऊन महाराष्ट्र बनले असावे आणि त्यांच्या संयुक्त जनतेत अश्मक राजकुल उत्पन्न झाले असावे; असाच इतिहास असावा असे दिसते. म्हणजे महाराष्ट्राच्या वैशिष्ट्यास म्हणजे महार आणि रट्ठ यांच्या एकत्रीकरणास आरंभ कुरुयुद्धापूर्वीच झाला असला पाहिजे."

"भोई, कोळी, महार व रट्ठ याजाती महाराष्ट्रात कुरुयुद्ध कालीच होत्या आणि त्या पैकी महार आणि रट्ठ यांचेच संख्याबल अधिक असल्यामुळे त्यांचे नाव देशास पडले असावे."[२१३]

## २.७ समारोप :

वरील सर्व विवेचनावरून महार याजातीची उत्पत्ती, पोट जाती, महारांची कामे, महार आणि महाराष्ट्र यासर्व मुद्यांचा विस्ताराने विचार केलेला आहेच. महाराष्ट्रातील महारांच्या अस्तित्वावरून असे नमूद करणे आवश्यक ठरते की, 'जिथपर्यंत महार तीथपर्यंत महाराष्ट्र'

अशी आवस्था आपल्या निदर्शनास येते. महार हा महाराष्ट्राच्या समाजकारणाचा, राजकारणाचा, धर्मकारणाचा, अर्थकारणाचा कणा समजला जातो. महारांचे आर्थिक जीवन अत्यंत हालाखीचे असून ही महारांनी कधीही गुन्हेगारी मार्ग अनुसरला नाही. महार हे शरिरयष्टीने अत्यंत दणकट, काटक व स्वभावाने लढाऊ होते. महाराष्ट्राच्या राजकारणामध्ये ज्या ज्या वेळेस सत्तांतर झाले त्या त्या वेळेस महारांची भूमिका निर्णायक ठरलेली असावी हे मराठा कालखंडातील महारांच्या भूमिकेवरून वाटते. छत्रपती शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रात हिंदवी स्वराज्याची स्थापना करीत असताना त्यांनी महाराष्ट्रातील आठरा पगड जातीच्या मावळ्यांना सोबत घेतले. त्यांच्या सुख, दुःखाशी एकरूप झाले यामुळेच ब्राह्मण, कायस्थ, मराठा, मुसलमान, न्हावी, रामोशी याजातीच्या मावळ्याबरोबरच महार जातीतील अनेक शूरविरांनी हिंदवी स्वराज्याच्या जडणघडणीमध्ये अत्यंत महत्त्वाचे योगदान दिलेले आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या हिंदवी स्वराज्याच्या संवर्धनासाठी असंख्य महारांनी आपले बलीदान दिलेले आहे. त्या सर्व ज्ञात अज्ञात महारांच्या पराक्रमावर व शौर्यावर प्रकाश टाकणे ही काळाची गरज आहे. कारण आतापर्यंतच्या इतिहास लेखणाच्या वाटचालीमध्ये सवर्ण मावळ्यावरच जास्तीत जास्त लिखाण झालेले आहे. इतिहास व इतिहासकाराने मराठे कालखंडातील महारांच्या शौर्याची फार मोठी उपेक्षा केलेली आहे. अनेकांनी जाणीवपूर्वक महारांचे शौर्य अनुलेखाने (उल्लेख न करता) झाकूण टाकण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे हिंदवी स्वराज्याच्या जडणघडणीमध्ये निर्णायक भूमिका बजावून ही महार मावळे किंवा पराक्रमी महार सरदार इतिहासामध्ये आलेले दिसत नाहीत. त्यामुळे हिंदवी स्वराज्याच्या वाटचालीतील लढवय्ये महार सरदार कालानुक्रमे पुढील प्रकरणामध्ये सांगण्यात आलेले आहेत.

## संदर्भग्रंथ सूची


१. धनराज डहाट, महाप्राण जोगेंद्रनाथ मंडळ, पृ.११

अ. शिंदे वि. रा., भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न पृ. १११,११९

२. ओतूरकर रा. वि., (संपा.) पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्र व्यवहार लेख ९६ व, पृ.७१

अ. जोशी श.ना., (संपा.) शिवकालीन पत्रसार संग्रह खंड - १, लेख ६२१ पृ.१३३

ब. ऐतिहासिक संकिर्ण साहित्य, खंड -७, लेख -३२

क. वि. का. राजवाडे, (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड-२५, लेख-७३

ड. सरदेसाई गो. स., (संपा.) पेशवे दफ्तर, खंड-४२ पृ. ३२

ई. कित्ता, खंड - ४३, नोंद -६२

ड. बाड ग. चि./पारसनिस द. बा., (संपा.) पेशवे रोजनिशी, खंड-९ नोंद १९२५

ए. Elphinstane Mounstuart, Territories conquered from the Paiswa -A Reports, P. 23, 46

३. शिंदे वि. रा., भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न पृ. १२१

४. कोसारे एच.एल., प्राचीन भारतीय नाग, पृ. ९८,१०१, १०७,१०८, ११४ ते ११६

५. जोशी लक्ष्मणशास्त्री, (संपा.)राजवाडे लेख संग्रह पृ. १३९

६. भागवत राजारामशास्त्री, राजाराम शास्त्री भागवत यांचे, निवडक लेख, पृ.९०-९५

७. केतकर श्री. व्यं., (संपा.) महाराष्ट्रीयन ज्ञान कोश,खंड-१८, पृ. ८३

८. कोसारे एच. एल., उपरोक्त पृ. १३१, ५२

९. शेणोलीकर ह. श्री./ देशपांडे प्र.न., महाराष्ट्र संस्कृती : घडण आणि विकास पृ.३८

१०. मा. फ. गांजरे, (अनु.), (डॉ. बी. आर. आंबेडकर) अस्पृश्य मुळचे कोण ?व ते अस्पृश्य कसे बनले ? पृ. ७२,८७,८९

११. डॉ. भवरे एन. जी.,| प्राचीन नागलोक व महाराष्ट्रातील बौद्ध धर्म प्रसार, पृ. ७

१२. राजवाडे वि. का.,(संपा.) उपरोक्त , खंड -१६, लेख-५८, पृ. ६६

१३. भा. इ. सं. म., शिवचरित्र साहित्य, खंड-११, लेख -२७, पृ. १६

१४. खोबरेकर वि. गो., (संपा.) शिवकालीन कागदपत्रे , पृ. ५९

१५. भिक्क्षू शिवली बोद्धी, (अनु.) , (आलेक्झांडर रॉबर्टसन), महार लोक, पृ. ५६

१६. शेणोलीकर ह. श्री. /देशपांडे प्र. न. , उपरोक्त , पृ. ३८

१७. शंकरराव खरात, महाराष्ट्रातील महारांचा इतिहास पृ. ७३

१८. ओतूरकर रा. वि., (संपा.) उपरोक्त, लेख - ९६ पृ. ७१

१९. मंगूडकर मा. प., (संपा.) शिंदे लेखसंग्रह,| पृ. १३७

२०. मोल्सवर्थ, मराठी - इंग्रजी शब्दकोश, प्रस्तावना पृ. २३

२१. Bhat Wamanrao, The Harijans of Maharashtra, P. 43

अ. खैरमोडे चा. भ. , डॉ. बी. आर. आंबेडकर चरित्र, खंड - १, पृ. ४

२२. केतकर श्री. व्यं., प्राचीन महाराष्ट्र , सातवाहन पर्व , पृ. १३

अ: कोसारे एच. एल., उपरोक्त , पृ. १३१

ब| केतकर श्री. व्यं., महाराष्ट्रीयन ज्ञानकोश खंड-१८, पृ. ८३

क. भिक्षू शिवली बोधी ,| (अनु.) , उपरोक्त , पृ. ५६

२३. फुले जोतिराव, पवाडा छ. शिवाजी राजे भासले पृ. १

अ. य. दि. फडके, (संपा.) म. फुले, समग्र वाङ्मय पृ. १५७

२४.| डॉ. खरात प्रकाश,| (संपा.) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे, खंड-१
पृ. ११९,१२०

२५. खरात शंकरराव ,| महाराष्ट्रातील महारांचा इतिहास पृ. ३०

२६. वि. रा. शिंदे , उपरोक्त पृ. १२५

२७. कित्ता , पृ. १२१

२८. खरात शंकरराव, उपरोक्त , पृ. ३२

२९. कित्ता , पृ. ३३

३०. कोसारे एच. एल., उपरोक्त, पृ. ९८,१०१, १०७, १०८, ११४ ते ११६

अ. गोडबोले रघुनाथ भास्कर , (संपा) श्री भारत वर्षीय प्राचीन ऐतिहासीक कोश , पृ.२६९

ब. शर्मा राणाप्रसाद, (संपा.) पौराणिक कोश, पृ. ४०४

३१. य. रा. दाते / कर्वे, (संपा.) सुलभ विश्वकोश भाग -५, पृ. १९२७, २८

३२. त्रि. ना. आत्रे, गावगाडा, पृ. ५

३३. डॉ. केतकर श्री. व्य., ज्ञानकोश भाग-१८, पृ. ८३

३४. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ३४

३५. शेणोलीकर ह. श्री. / देशपांडे प्र. न., उपरोक्त, पृ. ३८

अ. महाराष्ट्रराज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, (संपा.) मराठी विश्वकोश, खंड-१२, पृ. १४७०

३६. सोमवंशी बी. सी., भारतीय जाती संस्थेत मातंगाचे स्थान आणि महार-मांग संबंध पृ.८१

३७. खरात शंकरराव, उपरोक्त पृ. ९८

३८. कित्ता , पृ. ९८

३९. शिंदे वि. रा., उपरोक्त पृ. १२३,१२४

४०. खरात शंकरराव, उपरोक्त , पृ. ३९

४१. कित्ता , पृ. १०१

४२. जोशी महादेवशास्त्री, (संपा.) भारतीय संस्कृती कोश, खंड -७ पृ. १८९,१९०

अ. Bombay Gazetter, Vol. XVII, P. 439

४३. शिंदे वि.रा., उपरोक्त, पृ. १०१,१०२

४४. भिक्षू सिवली बोद्धी, (अनु.) , उपरोक्त, पृ. ७४, ७५

४५. कित्ता, पृ. ७५

४६. कित्ता, पृ. ५४

४७. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ८५

४८. पं. महादेवशास्त्री जोशी, उपरोक्त, पृ. १८९, १९०

४९. डॉ. कठारे अनिल, शिवकाळ व पेशवाईतील महारांचा इतिहास, पृ. ३९

५०. खरात शंकरराव, उपरोक्त, ८६

५१. जाधव श्रीराम, भारतीय राजकारण व डॉ. आंबेडकर, पृ. ९५

५२. डॉ. सिंगारे अनिल, दक्षिण भारताचा इतिहास, पृ. ६४

५३. भिक्षू सिवली बोद्धी, (अनु.), उपरोक्त, पृ. ५५

५४. कित्ता, पृ. ५५

५५. औचरमल ल.या., निजामकालीन मराठवाड्यातील समाज रचना व अस्पृश्यांचे स्थान पृ.१४४

५६. भिक्षू सिवली बोद्धी, (अनु.) ,उपरोक्त, पृ. ५५

५७. खरात शंकरराव , उपरोक्त, पृ. ८६

अ. जोशी महादेवशास्त्री, (संपा.), भारतीय संस्कृती कोश, खंड -७, पृ. १९०

५८. भिक्षू सिवली बोद्धी, (अनु.) ,उपरोक्त, ५४

५९. कित्ता , पृ. ५५

६०. कित्ता , पृ. ५५

६० अ. मुंबई इतिहास संशोधन मंडळ, भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक वर्ष २८ पृ. ३२,३३

६१. कित्ता, पृ. ६३

६२. जोशी महादेवशास्त्री, उपरोक्त, पृ. १८९

अ. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ८६

ब. वलदेकर का. रा. ,महार आणि मराठे सांस्कृतिक अनुबंध , पृ. ४०

६३. दाते य. रा. / कर्वे चि. ग., (संपा.)सुलभ विश्वकोश, भाग -५ , पृ. १९२७

६४. भिक्षू सिवली बोद्धी , (अनु.) , उपरोक्त, पृ. ५५

६५. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ८५

अ. जोशी महादेवशास्त्री, (संपा.) उपरोक्त, पृ. १९०

६६. मुंबई इतिहास संशोधन मंडळ, भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक , पृ. १२७

६७. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ८५

अ. बाड ग. चि., पारसनिस द.बा. , (संपा.)पेशवे रोजनिशी खंड - ८ , नोंद ११२५

ब. भा. इ.सं. मं. पुणे, त्रैमासिक ६२, पृ. १२४

क. फाटक न. र. ,(अनु.) , (रानडे म. गो.), मराठी सत्तेचा उत्कर्ष , पृ.१२

६८. ओतूरकर रा.वि., उपरोक्त, लेख - ९६, पृ. ७१

अ. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ८५

क. ढेरे रा. चि. ,लज्जागौरी, पृ. ५९

६९. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ८५

अ. जोशी महादेवशास्त्री, (संपा.), उपरोक्त, पृ. १८९

७०. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ८५

७१. महाराष्ट्रराज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, (संपा.), उपरोक्त, पृ. १४७०

७२. जोशी महादेवशास्त्री, (संपा.) उपरोक्त, पृ.१८९

७३. कित्ता, पृ. १८९

७४. कित्ता , पृ. १९०

७५. कित्ता, पृ. १९०

७६. कित्ता, पृ. १९०

७७. भिक्षु सिवली बोद्धी, (अनु.), उपरोक्त, पृ. ५५

७८. कर्वे चि. ग. / जोशी य. गो./ जोगळेकर स. आ., (संपा.), महाराष्ट्र परिचय अर्थात संयुक्त महाराष्ट्राचा ज्ञानकोश, पृ. ९४

७९. औचरमल ल. या., उपरोक्त, पृ. १७२

८०. भिक्षु सिवली बोद्धी, (अनु.), उपरोक्त, पृ. २३

अ. औचरमल ल.या., (संपा) उपरोक्त, पृ. १७३

ब. दि. दा. गांगल, मराठेकालीन समाज दर्शन, पृ. १५२

८१. भा.इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक ६२, पृ. १२८

अ. भिक्षु सिवली बोद्धी, (अनु.), उपरोक्त, पृ. ३०

ब. कुलकर्णी अ. रा., शिवकालीन महाराष्ट्र, पृ. २८,३९,१२८

८२. डॉ. गवळी पी. ए., पेशवे कालीन समाज व जातीय संघर्ष, पृ. ६२

८३. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य खंड -११, लेख-२७, पृ. १६

८४. कित्ता, खंड -१, लेख ८४, पृ. १०२

८५. Elphinstone Mounstuart, Ibid, P.23

८६. डॉ. कठारे अनिल, शिवकाळ व पेशवाईतील महारांचा इतिहास, पृ. १४९

८७. पारसनीस द. बा., (संपा.) पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, पृ. १०,१३

८८. बाड ग. चि./पारसनिस द. बा., (संपा) उपरोक्त, खंड-१, नोंद २९८

८९. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य, खंड-११, लेख - ८५ पृ. ५६

९०. राजवाडे वि. का., (संपा) उपरोक्त, खंड -१५, लेख -२९०

९१. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य, खंड-२, लेख - ९३, पृ. ११५

९२. Edi. J.P. Guha, ( Grant Duff.) History of Maratha Vol. I, P. 16

A. Sen S.N., Administrative System of the Maratha , P. 129, 130

९३. अत्रे त्र्य. ना. ,गावगाडा, पृ. ३४

अ. भावे वा. कृ., पेशवेकालीन महाराष्ट्र, पृ. ३४६

ब. Elphinstone Mountstuart, Ibid , P. 23

क. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक ६२, १ -४ पृ. १२७

९४. भावे वा. कृ., उपरोक्त, पृ. ३४६

९५. Elphinstone Mountstuart, Ibid P. 23

९६. डॉ. गवळी पी. ए. ,उपरोक्त , पृ.९

९७. Elphinstone Mountstuart, Ibid , P. 35

९८. Sen S.N. I bid, P. 167

९९. भा. इ. सं. मं., पुणे त्रैमासिक, ६२, पृ. १२८

100. Sen S.N. I bid P. 130, 256

अ. भावे वा. कृ., उपरोक्त, पृ. ३४६

१०१. Elphinstane Mountstuart, Ibid, P. 47

अ. भावे वा. कृ. ,उपरोक्त, पृ. ३४७

ब. मुंबई इतिहास संशोधन मंडळ, उपरोक्त, पृ. ३२

क. सरदेसाई गो. स., (संपा.) पेशवे दप्तर, खंड - ४३, पृ. ५४, ५५

ड. भा. इ.सं. मं. त्रैमासिक, ६२, पृ. १२८

इ. भिक्षू सिवली बोद्धी , (अनु.) , उपरोक्त, पृ. ३४

१०२.ओतूरकर रा. वि., (संपा.) उपरोक्त , लेख ३४ , पृ. २३

१०३. बाड ग. चि./ पारसनिस द.बा., (संपा.) उपरोक्त , खंड - ७ , नोंद ६२२




अ. डॉ. गवळी पी. ए., पेशवे कालीन गुलामगिरी व अस्पृश्यता, पृ. ६३

१०४. ओतूरकर रा. वि. , (संपा.) उपरोक्त , लेख ७८ , पृ. ५७

१०५. कित्ता लेख - ८४, पृ. ६२

१०६भा. इ. सं. मं. पुणे , शिवचरित्र साहित्य , खंड - १ , लेख ३३ , पृ. ५४

अ. इतिहास संशोधन मंडळ मुंबई, उपरोक्त, पृ. ३० 



१०७ बेंद्रे वा. सी., (संपा.)महाराष्ट्रेतिहासाची साधने , पृ. ४८७

१०८Elphinstone Mainstuart, Ibid P. 21

अ. डॉ. गवळी पी. ए., उपरोक्त पृ. ९

ब. भिक्षू सिवली बोद्धी , (अनु.) , उपरोक्त, पृ. २९

१०९. जोशी श. ना. ,(संपा) संभाजीकालीन पत्रसार संग्रह पृ. ९५

११०. भा. इ.सं. मं. ,पुणे, त्रैमासिक, ६२, १.२ , पृ. १२८

१११. दांडेकर गो. नी.,महाराष्ट्र दर्शन पृ.१३५

११२. बाड ग. चि. / पारसनिस द. बा. (संपा.), पेशवे रोजनिशी खंड-८ नोंद ९५६

११३. कित्ता, खंड -८ , नोंद ९५८

११४. औचरमल ल. या., उपरोक्त , पृ. १७३

११५. भिक्षू सिवली बोद्धी , (अनु.) , उपरोक्त, पृ. ३०

११६. अत्रे त्र्य. ना., उपरोक्त , पृ. ३३

११७. बाड ग. ची. / पारसनिस द. बा. (संपा) उपरोक्त , खंड -३, नोंद - ५२१

११८. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य , खंड - ३ , लेख -४१५, पृ. १७

११९. ओतूरकर रा.वि., (संपा.) उपरोक्त , लेख - ६४, पृ. ४४

१२०. भिक्षू सिवली बोद्धी , (अनु.) , उपरोक्त, पृ. ३१



१२१. कित्ता, पृ. ३१

१२२. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य खंड - ३, लेख - ६१३ , पृ. २०१

१२३. ओतूरकर रा. वि., (संपा) उपरोक्त, लेख - ४६, पृ. ३२

१२४. खरे वा. वा. (संपा.) ऐतिहासीक लेख संग्रह, पुणे, खंड-११, लेख - ४४८२

१२५. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक, ६२, १.४ , पृ. १२८

अ. अत्रे त्र्य. ना., उपरोक्त, पृ. ४,३४,३५

ब. कुलकर्णी अ. रा., उपरोक्त, पृ. ४८

१२६. Elphinstone Mountstuart Ibid, P. 23

A. Gazetter of India Maharashtra state history Part-III , P. 213, 215

१२७. अनु. भिक्षू सिवली बोद्धी, उपरोक्त, पृ. ३०, ३१

१२८. राजवाडे वि. का., उपरोक्त, खंड - २५, लेख - ७३

१२९. Elphinstone Mountstuart Ibid, P. 23

१३०. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक, ६२, १.४, पृ. १२८

१३१. अत्रे त्र्य. ना., उपरोक्त, पृ. ३४

१३२. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक, ६२, १.४, पृ. १२८

१३३. कित्ता, पृ. १२८

१३४. औचरमल ल. या., (संपा) उपरोक्त, पृ. १७३

१३५. अनु. भिक्षू सिवली बोद्धी, उपरोक्त, पृ. २३

१३६. भा. इ. सं. मं. पुणे, ऐतिहासीक संकिर्ण साहित्य, खंड-३, पृ. १२७

अ. बाड ग. चि. / पारसनिस द.बा. (संपा.) उपरोक्त, खंड - १, नोंद -२८९

ब. राजवाडे वि. का., (संपा) उपरोक्त , खंड - २०, लेख - १७४ , पृ. २२४

१३७. बाड ग. चि. / पारसनिस द.बा. (संपा.) उपरोक्त, खंड - ३, नोंद - ५२१

१३८. राजवाडे वि. का. (संपा), उपरोक्त, खंड - २१, लेख - ६

अ. बाड ग. चि. / पारसनिस द.बा. (संपा.) उपरोक्त, खंड - १, नोंद - २८९

ब. डॉ. कठारे अनिल, मराठेकालीन सरकारी अधिकारी व त्यांचे गैरवर्तन, पृ. ३१

१३९. बाड ग. चि. / पारसनिस द.बा. (संपा.) उपरोक्त, खंड - १, नोंद - २८३

अ. राजवाडे वि. का. ,(संपा.) उपरोक्त, खंड - २१, लेख - ६,२६

ब. ओतूरकर रा. वि., (संपा.) उपरोक्त, लेख - ४६,९४, पृ. ३२, ६८

१४०. राजवाडे वि. का., (संपा.) उपरोक्त, खंड - ६, लेख - ९५

१४१. कर्वे चि. ग., (संपा.) पुणे नगर संशोधन वृत्त, पृ. ४५

१४२. भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक, ६२, १.४, पृ. १२७

अ. भा. इ. सं. मं. पुणे ऐतिहासीक संकिर्ण साहित्य , खंड -३, लेख - २७, पृ. १२७

१४३. औचरमल ल. या. ,उपरोक्त, पृ. १७४, १७५

१४४. ओतूरकर रा. वि., (संपा.) उपरोक्त, लेख - २८, पृ. १९

अ. बाड ग. चि. / पारसनिस द. बा. (संपा.), उपरोक्त, खंड - ३, नोंद - ५२१

१४५. कित्ता, खंड - १, नोंद - २८९

१४६. आत्रे त्र्य. ना. , उपरोक्त , पृ. ७९

१४७. डॉ. गवळी पी. ए., पेशवेकालीन समाज व जातीय संघर्ष, पृ. ४८

१४८. भावे वा. कृ. , उपरोक्त, पृ. ३४६

१४९. ऐतिहासिक संकिर्ण साहित्य, खंड - ३, लेख - १२७

१५०. आत्रे त्र्य. ना., उपरोक्त, पृ. ३५, ६८

अ. भा. इ. सं. मं. पुणे त्रैमासिक, ६२, १.४ पृ. १२७

१५१. खैरमोडे चा. भ., खंड - १ , उपरोक्त, पृ. १८८

१५२. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य खंड - १, लेख - ८४, पृ. १०२

१५३. कित्ता, खंड - ११, लेख - २७, पृ. १६

१५४. कित्ता, खंड -२, लेख - ३३८, पृ. ३३१

१५५. कित्ता, खंड - १, लेख - ५८, पृ. ६१

१५६. ओतूरकर रा. वि., (संपा) उपरोक्त, लेख - ४६, पृ. ३२

१५७. कित्ता, पृ. ३२

अ. बेंद्रे वा. सी., (संपा.) उपरोक्त, खंड - ३, लेख -१०५६, पृ. ५९५

१५८. राजवाडे वि. का. , उपरोक्त, खंड - ६, पृ. १०५

अ. इतिहास संशोधन मंडळ, मुंबई, भारतीय इतिहास व संस्कृती, पृ. ३३

१५९. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक, ६२, १.४, पृ. १२७

१६०. औचरमल ल. या. ,उपरोक्त, पृ. १७५

१६१. कित्ता, पृ. १७६

१६२मोल्सवर्थ, उपरोक्त, पृ. ५८०, ७७०

१६३. कित्ता, पृ. ५८०,७७०

१६४. डॉ. गवळी पी. ए., सरंजामशाही , पृ.९३

१६५. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य, खंड - ९,लेख -१२, पृ. ११, १२

१६६. कित्ता, लेख - ११, पृ. १०

१६७. कित्ता, लेख - ४३, पृ. ४७

१६८. कित्ता, खंड - १०, पृ. १४

१६९. कित्ता, खंड - ९, लेख - ६३, पृ. ६५

१७०. डॉ. गवळी पी. ए. ,उपरोक्त, पृ. ९५

अ. डॉ. गवळी पी. ए., पेशवेकालीन महाराष्ट्र, पृ. ३००

१७१. वाड ग. चि. / पारसनिस द.बा.,(संपा.) उपरोक्त, खंड - ३, नोंद - ३४१

१७२. कित्ता, खंड - १, नोंद - २८१

१७३. डॉ. गवळी पी. ए., सरंजामशाही, उपरोक्त , पृ. ९७

१७४. मोल्सवर्थ, उपरोक्त, पृ. ६९३

१७५. ओतूरकर रा. वि., उपरोक्त, लेख - ४६, पृ. ३२

१७६. बाड ग. चि. / पारसनिस द. बा., (संपा.) उपरोक्त, खंड - ६, नोंद - ७२३

१७७. ओतूरकर रा. वि. , उपरोक्त, लेख - ९४, पृ. ६८

१७८. बाड ग. चि. / पारसनिस द. बा., (संपा.) उपरोक्त, खंड -३, नोंद ३३४

१७९. बाड ग. चि. / पारसनिस द. बा.,(संपा.) , शाहू महाराज यांची राजेनिशी पृ. १४३, १४५

१८०. भा. इ. सं. मं. पुणे, शिवचरित्र साहित्य खंड - १, लेख - ३१, पृ. ५३

अ. कित्ता, खंड - ३, लेख - ५२३,५२७,५५५

ब. कित्ता, खंड -१२, लेख - ९९, पृ. ६३

क. ओतूरकर रा. वि. ,(संपा) उपरोक्त, लेख - ४०, पृ. २८

१८१. बाड ग. चि. / पारसनिस द. बा., (संपा.) पेशवे रोजनिशी, खंड - ३, नोंद - २६५

अ. भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक, ६२,१.४ पृ. १३३,१३४

१८२. बाड ग. चि. / पारसनिस द. बा., (संपा.), उपरोक्त, खंड -३, नोंद २६५

अ. कित्ता, खंड - ६ नोंद - ६७३

१८३. सरदेसाई गो. स. (संपा.), उपरोक्त खंड - ८, नोंद-११, पृ. ८

अ. बाड ग. चि. /पारसनिस द. बा., (संपा.), उपरोक्त, खंड -२, नोंद ३३१

ब. कित्ता, खंड -४, नोंद - ५७

क. डॉ. गवळी पी. ए. , पेशवे कालीन महाराष्ट्र, उपरोक्त, पृ. ३००

१८४. डॉ. आंबेडकर बी. आर. , माहर आणि त्यांचे वतन, पृ. ११,१२

१८५. बाड ग. चि. / पारसनिस द. बा., (संपा.) उपरोक्त, खंड -६, नोंद ७२३

अ. भा. इ. सं. मं. ,त्रैमासिक ६२, १.४, पृ. १३४

१८६. बाड ग. चि. /पारसनिस द. बा., (संपा.) , उपरोक्त, खंड -२, नोंद २८३

१८७. कित्ता, खंड -३, नोंद - ४१५

१८८. राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, संशोधक , पृ. ३३

१८९. इतिहास संशोधन मंडळ, मुंबई, भारतीय इतिहास आणि संस्कृती, पृ. ३२

190. Elphinstene Mounstuart, Ibid, P. 46

A. Sen S.N. Ibid, P. 256

१९१. अत्रे त्र्य. ना., उपरोक्त, पृ. ६७

१९२ कित्ता, पृ. ६६

१९३. Elphinstone Mounstuart Ibid, P. 23

१९४ दांडेकर गो. नी. उपरोक्त , पृ. १३४

अ) नन्नवरे क. को. , वतनदार महारांची संस्कृती , पृ. ३०,३१

१९५. देशपांडे ब्रह्मानंद (संपा.), श्री एकनाथ महाराजांची भारूडे, पृ. ३८,३९

१९६. वाडेकर दे. दे. / कर्वे चि. ग.टीकेकर श्री. रा. (संपा.), चाफेकर संस्मृती, पृ. ३३,३४

१९७. कित्ता, पृ. ३५

१९८. मुंबई इतिहास संशोधन, मंडळ, भारतीय इतिहास आणि संस्कृती, पृ.३२,३३

१९९. भिक्षू सिवली बोद्धी, (अनु.) उपरोक्त, पृ. १५

२००. अत्रे त्र्य. ना. (अनु.) , (एम. केनेडी) ,गुन्हेगारी जाती , पृ. ८

२०१. मोल्सवर्थ, उपरोक्त, पृ. २३

२०२. भिक्षू सिवली बोद्धी, (अनु.) उपरोक्त, पृ. ५६

२०३. खौरमोडे चा. भ. , खंड - १, उपरोक्त, पृ. १६२

२०४. कित्ता, पृ. ४३

२०५. खरात शंकरराव , उपरोक्त , पृ. ३३

२०६. डॉ. भवरे एन. जी., उपरोक्त, पृ. ७

२०७. शेणोलीकर ह. श्री. / देशपांडे प्र. न. , उपरोक्त, पृ. ३८

२०८. सोमवंशी बी. सी., उपरोक्त, पृ. ८१

२०९. राजारामशास्त्री भागवत यांचे निवडक लेख , पृ. ९०

२१०. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. ३३

२११. कोसारे एच. एल. , उपरोक्त, पृ. १३१

२१२. केतकर श्री. व्यं., उपरोक्त, पृ. १३

२१३. कित्ता, पृ. १५



## प्रकरण - तिसरे

# शिवकालखंडातील पराक्रमी महार

*प्रकरण तिसरे*

# शिवकालखंडातील पराक्रमी महार

३.१ प्रस्ताविक

३.२ स्वराज्य स्थापनेत महारांचे योगदान

३.३ पुरंदर गडावरील महारांचा पराक्रम

३.४ गोदनाक महार

३.५ रायनाक महार

३.६ खंडू महार

३.७ अविचारे व बेगले महार

३.८ चिव्हे महार

३.९ बहिरनाक

३.१० मेटे नाईकी महाराकडे

  ३.१०.१ खंडनाक

  ३.१०.२ बेगले महार

  ३.१०.३ महाद नाक

३.११ वाल्हे येथील महार

३.१२ नागनाक महार

३.१३ शिदनाक महार

३.१४ धर्मांतरीत पराक्रमी महार

३.१५ समारोप

## ३.१ प्रास्ताविक :

भारतात अस्पृश्य ठरवलेल्या महार, मांग व चांभार या जातींपैकी महार ही जात हाडाने कनखर, आवाजाने खणखणीत शूर, कर्तबगार, अंगकांतीने तुकतुकीत, गुणाने बद्धीमान आणि काळावर दृष्टी ठेवून सावधगीरीने वागणारी होती. महार ही महाराष्ट्रातील अतिप्राचीन जात आहे. म्हणून हेच खरे या भूमिचे मूळ निवासी असल्याचे स्पष्ट होते. म्हणूनच "महारांना भूमिपूत्र या नावाने ओळखले जाते."[१] अस्पृश्य म्हणून समजली गेलेली महार जातही मुळची क्षात्रवृत्तीची होती. फार प्राचीनकाळात त्यांची राज्य महाराष्ट्रात होती. परंतु कालांतराने भारतात परकीय टोळ्या आल्या. यामध्ये महारांवर प्रथम स्वारी करणारांमध्ये आर्य होते. "जे दिसण्यास भारतीयांपेक्षा रंगाने गोरे, धिप्पाड, लांब नाकाचे गोऱ्या किंवा काळ्या डोळ्यांचे, मजबूत शरीरयष्टी व रूंद कपाळाचे होते."[२] यानंतर काही आर्योत्तर टोळ्यांनीही येथील अस्पृश्यांवर आक्रमने केली. या परकीय टोळ्यांनी मूळ भारतीय लोकांसोबत राजकीय अधिकार प्राप्त करण्यासाठी अनेक लढाया केल्या. या परकीय टोळ्यांकडे चांगल्या प्रतिची शस्त्रास्त्रे होती. तसेच ते त्या शस्त्रांचा वापर दुरूनही करू शकत होते. यांच्या तुलनेत मूळ भारतीय लोकांकडची शस्त्रे ही साधारण प्रतिची व दुरून मारा न करता येणारी होती. तसेच मूळ भारतीय हे शांतताप्रिय होते. तर या परकीय टोळ्या युद्ध तंत्रात पारंगत होत्या. "ह्या परकीय टोळ्यानी मूळ लोकांसोबत राजकीय अधिकार प्राप्त करण्यासाठी अनेक लढाया केल्या. या उभयंतांच्या संघर्षात परकीय टोळ्यांचा विजय झाला. नंतर यांनी मूळ महाराष्ट्रीयनांची राज्य नष्ट केली व त्यांना आपले गुलाम बनवले."[३] अस्पृश्य जातीतील महार लोक अत्यंत कर्तबगार होते. तसेच ते शूर व चांगल्या प्रकारचे लढवये होते. यांनी शिवकालखंडामध्ये रणभूमीवर मोठा पराक्रम गाजविला. वि.रा.शिंदे यांच्या मते "कोकण हा प्रांत मुळात महार, मांग, भिल्ल, ठाकूर, कोळी, क्रॅग यांनी या ठिखाणी एकेकाळी राज्य केलेल्या लोकांचा होता. कदंबानी महारांपासून चालुक्यांनी मांगापासून आणि मौर्यांनी कोळ्यांपासून राज्ये जिंकून घेतली."[४]

''एकेकाळी राजा असलेल्या या महारांवर आर्य, मुसलमान व इतर परकियांनी स्वाऱ्या केल्यामुळे महार पराभूत झाले. या पराभूत महारांना जेत्यांनी आपला गुलाम बनविले. वरील परकीय टोळ्यांच्या हल्ल्यामधून जे महार सहिसलामत सुटले ते घाटावरून कोकण तळावर गेले व तेथेच त्यांनी आपल्या वसाहती निर्माण केल्यानंतर त्यांनी स्वतःच्या उदरनिर्वाहासाठी कला-कौशल्याची कामे केली. त्यातूनच त्यांच्यात व्यापारी, उत्कृष्ट कलाकार, राज्यकर्ते व योद्धे निर्माण झाले. तसेच मौल्यवान धातुची (ज्यात सोने, चांदी, तांबे यांचा समावेश होता) पैदास कशी करावी याचे संशोधन केले आणि कोकणात याधातुंच्या मोठ्या खाणी निर्माण केल्या. यानंतर त्यांनी व्यापार करण्यास प्रारंभ केला. यांचा व्यापार अरबस्तान, इराण व सिंहलद्विपात सुरू होता. तसेच यांनी समुद्रमंथनात मोठी कामगिरी केली. व्यापाराबरोबरच लढाऊ जहाजे तयार करण्यात ते निपूण होते. व्यापार उद्योगात यांनी भरभराट केल्यानंतर त्यांनी आपले छोटे छोटे राज्य निर्माण केले. अशा या कुशल महारांचा नायनाट करून आपले वर्चस्व स्थापन करण्याची चळवळ कोकणस्थ ब्राह्मणांचा पुढारी परशुराम याने क्षत्रियांना हाताशी धरून केली, तरी देखील कोकणात महार अस्तित्व टिकवून राहिले.''[५] यावरून महार जात ही 'मार्शल रेस' (लढाऊ जमात) होती हे सिद्ध होते. महार सैनिक शूर, धैर्यवान व लढवय्या सैनिक होते याची इतिहासाने नोंद घेतली आहे.

आर्य संस्कृतीच्या वसाहतवाल्यांनी महारांची राज्य जिंकून घेतली व यांना गुलाम केले. महार लोक हे मूळ बौद्ध धर्माचे अनुयायी होते. त्यांनी हा धर्म सोडून ब्राह्मणी आर्य धर्म स्वीकारण्यास नकार दिला. इतरांनी मात्र (हल्लीचे मराठे) बौद्ध धर्म सोडून ब्राह्मणी आर्य धर्म स्वीकारला म्हणून आर्यांनी त्यांना क्षत्रिय वर्णात जागा दिली. महार, मांग, चांभार यांनी ब्राह्मणी आर्य धर्म स्वीकारण्यास नकार दिला. त्यांना मात्र गुलाम बनविले. तसेच त्यांचा स्पर्शदेखील आर्यांसाठी निषिध बनला. यासंदर्भात Lieut General Cir George Macmann (लिऊट जनरल सर जॉर्ज मॅकमन) असे म्हणतात की, 'The Maharattas are Cer-

tain flok of Semi-Aryan extraction who own and cultivate the land of the Caostal plains and hills north and south of Bombay, the spurs and valleys of the wall of western ghate, and the uplands known as the Deccan, more properly Dekhan and the lower lands and Jungles of the Konkan. Because some Aryan or Jat race, because they were men of thaws and hearts and because they were Prepared to leave Buddhism and came back to the Brahmin fold, therefore, they were admitted to have something, it is not quite clear what of Rajput status"।[६]

**३.२ स्वराज्य स्थापनेत महारांचे योगदान :**

महाराष्ट्रात महार, मांग व चांभार यांना अस्पृश्य समजले जात होते. परंतु वरील पैकी महार या जातीस अस्पृश्य समजण्या मागचा हेतू राजकीय पराभव हा होता. तर मांग व चांभार यांना मांस भक्षण व घाणेरडे व्यवसाय यामुळे अस्पृश्य गणले गेले होते. "मांग व चांभार हे मेलेल्या जनावरांच्या कातड्यांपासून निरनिराळ्या वस्तू बनवित होते."।[७] शिवपूर्वकालीन समाज हा मनुस्मृतितील तत्वानूसार आचरण करत होता. या मनुस्मृती ग्रंथाद्वारे अस्पृश्यावर मोठी जाचक बंधने लादली होती. यामुळे ते उच्चवर्णीयांचे सेवक किंवा दास बनले होते. उच्चवर्णीयांनी अस्पृश्यावरील बंधनाची कडक अंमलबजावणी करण्यावर जोर दिला. वरील ग्रंथाचा आधार घेऊन अस्पृश्यांचा करता येईल तेवढा छळ स्पृश्यांनी केला. अस्पृश्यांचे उत्पन्नाचे सर्व मार्ग बंद करून त्यांना आपले दास बनविले. मुस्लिमांच्या स्वाऱ्या भारतावर होण्यापूर्वी हजारो वर्षांपासून अस्पृश्य लोक स्पृश्यांच्या गुलामगीरीत जीवन जगत होते.

मुस्लिम राज्यकर्त्यांची भारतावर जेव्हा आक्रमणे सुरू झाली, तेव्हा या मुस्लिम राज्यकर्त्यांना भारतातील हिंदूचे राज्य जिंकून घेण्यासाठी सैनिक म्हणून मनुष्याची गरज भासू

लागली. म्हणून मुस्लिम आक्रमकांनी भारतातील हिंदू व गुलामीत असलेल्या अस्पृश्य जातींना आपल्या सैन्यात भरती करून घेतले. भारतात आपली सत्ता प्रस्थापित करण्यासाठी मुस्लिमांनी प्रामुख्याने महार, मांग व चांभार या अस्पृश्य जातीतिल लोकांचा उपयोग करून घेतला. मुस्लिम राज्यकर्त्यांनी हिंदूंना सरदारकी, जहागिरी व इनामदारी देऊन उच्चपदावर बसविले. परंतु अस्पृश्यातील महार, मांग व चांभारांना उच्च पदापासून वंचित ठेवले. कारण हिंदू समाजव्यवस्थेत ह्यांना हिन दर्जा दिलेला होता. अस्पृश्यांना उच्चपदे दिली; तर येथील उच्चवर्णियांचा रोष पत्करावा लागेल ही भिती मुस्लिम राज्यकर्त्यांना होती. तसेच अस्पृश्यांनी हातात शस्त्रे घेणे हे धर्मबाह्य कृत्य समजले जात होते; परंतु मुस्लिम राज्यकर्त्यामूळे अस्पृश्यांच्या हाती शस्त्रे आली. अस्पृश्यांच्या हाती शस्त्रे देण्याचे काम मुस्लिम आक्रमकांनी केले असले तरी उच्चपदापासून मात्र अस्पृश्यांना दूर ठेवले. ''मुस्लिमांची सत्ता भारतात, स्थिर करण्यास मदत करून ही मुस्लिम सत्ताधिशांनी अस्पृश्य जातींच्या लोकांना योग्य न्याय दिला नाही.'' [८] अस्पृश्यांना मुस्लिम कालखंडात उच्चपदे जरी मिळाली नसली तरी त्यांच्या हाती शस्त्रे मात्र आली. हिंदूंनी दूर सारलेल्या अस्पृश्यांना मुस्लिमांनी स्वतःच्या फायद्यासाठी का होईना जवळ धरले. एवढेच नाही तर त्यांना आपल्या धर्मात प्रवेश करण्याची परवानगी दिली. यामुळे अनेक अस्पृश्यांनी मुस्लिम धर्म स्वीकारला. ''धर्मांतरीत अस्पृश्यांना नंतर हिंदू अस्पृश्य मानत नव्हते. 'महार किंवा मांगाने जर मुस्लिम धर्म स्वीकारला तर जे हिंदू यांना स्पर्श करण्यास ही लायक समजत नव्हते तेच हिदू धर्मांतरानंतर त्यांना त्यांच्या देवघरात येऊन डोकावू देत होते.'' [९] याबरोबरच ''एखादा अस्पृश्य हिंदू मुसलमान झाल्यास मुसलमान लोकच काय तर त्यांचा खुद्द बादशाहा देखील त्याला आपल्या पुत्रा समान मानत असे'' [१०] एकदा अस्पृश्य मुस्लिम बनल्यानंतर त्यांची प्रतिष्ठा वाढत होती. स्वतः बादशहा त्याला आपल्या पुत्रासमान मानत होता. या संधीचा फायदा म्हणून धर्मांतरीत अस्पृश्यांनी स्पृश्य हिंदुवर जबरदस्त दहशत बसविली. यासाठी खालील संदर्भ उपयुक्त ठरतो. ''बंगाल प्रांतात अशी जबरदस्त दहशत बसविणारा काळा पहाड (सुभेदार)

हा मुळचा अस्पृश्य होता. त्याने एवढा दरारा बसविला होता की, हिंदू स्त्रिया आपल्या मुलांना पाळण्यात झोपविताना ते जर मूल लवकर झोपत नसेल तर झोप लवकर नाही तर काळा पहाड येऊन तुला घेऊन जाईल. अशी मुलांना भिती घालत असत." [११]

भारतात फक्त क्षत्रियांनीच हातात शस्त्र धारण करावे असा नियम हिंदू धर्म शास्त्रात होता. अतिशुद्राने हातात शस्त्रे बाळगणे म्हणजे महापाप समजले जाई. एवढेच नव्हे तर शस्त्रे हातात घेणाऱ्या अस्पृश्यांना देहदंडाची शिक्षा ठोठावली जाई. या संदर्भात खैरमोडे चा.भ.म्हणतात की, "हिंदू समाजातील खालच्या थरातील जातींना जर शस्त्रे वापरू दिली तर ते त्यांची उन्नती करून घेतील; आशा तऱ्हेने त्यांचा सामाजिक दर्जा ही वाढेल, ही भिती चातुर्वण्याच्या रक्षकांना होती. शुद्र व अतिशुद्र यांच्या हाती शस्त्रे आली तर ते जातीभेदाविरुद्ध सशस्त्र बंड करतील आणि सर्व उच्चवर्णीय हिंदुंचा शिरच्छेद करतील ही या चातुर्वर्ण्य संरक्षकांना जबरदस्त भिती वाटत असल्यामुळे त्यांनी शुद्रातिशुद्रांना शस्त्रे वापरण्याची मनाई करणारे धार्मिक कायदे आपल्या 'स्मृती' मध्ये घातले. त्यांची अंमलबजावणी हिंदु राजे धार्मिक भावनेने करीत होते." [१२] वरील प्रकारच्या नितीला धरून नसलेल्या जाचक बंधनामुळे कुशाग्र बुद्धीच्या, शूर, धाडसी, क्षात्रवृत्तीच्या महारांना हातामध्ये शस्त्रे घेऊन आपले क्षात्रतेज दाखविता आले नाही.

महारांनी वरीलप्रमाणे धर्माची कठोर बंधने असली तरी जेव्हा जेव्हा संधी मिळेल तेव्हा तेव्हा त्यांनी आपले शौर्य दाखविण्यात कसलीच कसूर ठेवली नाही; म्हणून याशौर्याचे व क्षात्रवृत्तीचे दर्शन मुस्लिम शासकाप्रमाणेच शिवाजी महाराजांना देखील झाल्याचे दिसून येते. मुस्लिम शासकाप्रमाणेच छत्रपती शिवाजी महाराजांनीही हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेसाठी महारांच्या शौर्याचा मोठा उपयोग करून घेतला. छत्रपती शिवाजी महाराज हिंदू धर्मशास्त्रांच्या नियमांची अंमलबजावणी करणारे राजे होते. परंतु हिंदवी स्वराज्य स्थापन करणे हे त्यांचे ध्येय होते. यासाठी ते पडेल ती किंमत व वाटेल ते धैर्य करण्यास तयार होते. या धैर्य पुर्तीसाठी महाराजांना शत्रूबरोबर दोन हात करण्यासाठी शूर, कर्तबगार, बुद्धीमान व निधड्या छातींच्या

मनुष्यबळाची आवश्यकता होती. त्यासाठी त्यांनी हिंदूधर्मग्रंथ बाजुला ठेवून अनेक जाती, धर्म व पंथाच्या लोकांना आपल्या सैन्यात प्रवेश दिला. जादुनाथ सरकार म्हणतात, ''छत्रपती शिवाजी महाराजांच्या सैन्यात ५६, (छप्पन) जातीचे लोक होते.''[१३] शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्य लढ्याच्या उभारणीत मुसलमान, रामोशी, पठाण, बेरड, भंडारी, कोळी, बेलदार, प्रभू, शेवणी, धनगर, भिल्ल, न्हावी, ब्राह्मण, तेली, मराठा या शिवाय ज्यांना गावकुसाच्या आत प्रवेश मिळत नव्हता अशा महार, मांग व चांभार जातीच्या लोकांना सुद्धा सामावून घेतले. गावाच्या वेशीबाहेर राहून जीवन जगणारे महार लोक शिवकाळात ब्राह्मणांच्या खांद्याला खांदा लावून लढत असत. हिंदवी स्वराज्य स्थापन करण्यात त्यांनी छत्रपती शिवाजी महाराजांना फार मोठी मदत केली. त्यांच्या सैन्यात इतरांपेक्षा महारांचा सर्वाधिक भरणा होता. या संदर्भात सुरेंद्रनाथ सेन म्हणतात, 'The Brahman Could fight shoulder to shoulder with the meanest of the untouchables, the mahar who is not allowed to live with in the village walls. And shivaji excluded none from his army, not even the Mahar'[१४]

यावरून असे सिद्ध होते की, छत्रपती शिवाजी महाराजांचे धोरण सर्वधर्मसमभावाचे होते. त्यांनी हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेसाठी धर्मग्रंथाचा आधार न घेता मानवतावाद डोळ्यासमोर ठेवून लष्कराची बांधणी केली. जात किंवा धर्म श्रेष्ठ नसून व्यक्तीचे गुण आणि कर्म हे श्रेष्ठ आहेत, या बाबीलाच त्यांनी जास्त महत्त्व दिल्याचे दिसून येते.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या धार्मिक धोरणाबद्दल ले.ई.थ्युयोडर किंग म्हणतात, ''शिवाजी महाराज आपल्या सैन्यासोबत रायगडाला निघाले असता त्यांचे सोबत तानाजी मालुसरे, नेताजी पालकर, येसाजी कंक, संभाजी कावजी, आबाजी सोनदेव मोरे, पिंगळे, अण्णाजी दत्तो, नीराजी पंत आणि गंगाजी मंगाजी इत्यादी सहकारी होते. वाटेत शिवाजीने प्रश्न केला की, 'महार म्हणजे काय आबाजी?' आबाजीने उत्तर दिले. 'एका खालच्या जातीची

व्यक्ती जी जातीच्या बाहेर आहे तेव्हा शिवाजी महाराज म्हणाले तुमचे असे मत आहे की, ते ब्राह्मण नाहीत, क्षत्रिय नाही व वैश्यही नाहीत. पण प्रश्न हा आहे की, ते ही आमच्यासारखे माणसं आहेत. ते सुद्धा जीवन जगत आहेत. काय त्यांना सूर्य आपल्या किरणांचा प्रकाश नाही देत आणि त्यांच्यावर पाऊस नाही पडत, जशी आम्हाला लागते तशी भूक त्यांना नाही का लागते आबाजी! जोपर्यंत आमचा देश जातीच्या आधारावर विभाजीत राहिल तोपर्यंत आपण आपल्या देशाला महाराष्ट्र बनवू शकणार नाही. आम्ही प्रत्येक व्यक्तीला माणुसकीच्या दृष्टीने पाहिले पाहिजे. याचे नाव बघा 'भाऊ' आहे. एवढे चांगले नाव राहू शकते कुणाचे? या भाऊने असे शौर्य दाखविले की जे कोणत्याही जातीने करून दाखविले नाही. आमच्या पूर्वजांचे जाती विषयक विचार खूपच निकृष्ट होते. ते सडक्या, कुजक्या विचारांच्या आहारी गेले होते आणि तुम्ही म्हणत असाल की आमच्या पूर्वजांचे विचार बरोबर होते, तर मी असा म्हणेल की, मी या महार जातीच्या पुष्कळ दूरच्या बाहेरच्या जातीचा आहे. तेव्हा तानाजीने आपला हात शिवाच्या खांद्यावर ठेवला आणि म्हणाला 'हा माझा भाऊ आहे' 'मोठा भाऊ' शिवाजी महाराज म्हणाले की, मी विचार करतो आहे की महाराज शब्दाने महाराष्ट्र नाही तर या देशात महार जातीचे लोक राहात होते. त्यांच्याच नावाने या देशाचे नाव महार-राष्ट्र, महाराष्ट्र असे झाले.''[१५]

छत्रपती शिवाजी महाराजांनी महारांचे शौर्य पाहून त्यांना आपल्या लष्करात सरळ समाविष्ठ करून घेतले. पुढे मराठा सत्तेच्या अस्तापर्यंत महारांनी मराठा राज्यांची सेवा केली. ''छत्रपती शिवाजी महाराज यांनी महारांना जंगलातील मार्ग, डोंगरी किल्यावर जाणारा गुप्त उघड मार्ग यांच्यावर देखरेख करणे आणि डोंगरी गडातील लोकांना जळण व वैरण पुरविणे या अतिमहत्त्वाच्या कामावर नेमले होते. वरील सर्व कामे म्हणजे लष्कराच्या संरक्षणाच्या नाड्या होत्या. त्या नाड्या छत्रपती शिवाजी महाराजांनी अत्यंत विश्वासू व इमानदार अशा महारांच्या हातात दिल्या होत्या. याशिवाय गडमाचीवर महारांची वस्ती ठेवणे हाही महाराजांनीच पायंडा पाडला. ही अवघड कामे करण्यासाठी महाराजांनी जसे महार कुटुंबांना वडिलोपार्जित नोकरीवर

ठेवले तसेच त्यांनी हजारो महार तरुणांना सैनिक म्हणून रणांगणावर शत्रूविरुद्ध देखील लढविले''[१६]

''मुसलमान, मराठे व पेशवे यांच्या राज्यात महार हे लढवय्ये सैनिक होते. त्यांना त्यांच्या अंगचे गुण प्रकट करण्याची संधी ज्या ज्या वेळी मिळाली, त्या त्या वेळी त्यांनी आपण शूर, पराक्रमी, इमानदार व निष्ठावान आहोत असे आपल्या कृतीने सिद्ध करून दाखविले आहे. वेळप्रसंगी आपल्या प्राणाची आहुती दिली आहे. आपल्या पराक्रमाच्या बळावर त्यांनी, सरदारकी, बहादुरी, इनामदारी व जहागिरी मिळविली आहे. रावबहाद्दर, तलवार बहाद्दर असे मानाचे किताब त्यांना मिळाले आहेत. त्याबद्दलचे उल्लेख उच्चवर्णीय बखरकारांनी स्पष्टपणे न करता अत्यंत तुरळक स्वरुपात उल्लेख करून महारांच्या बाबतीत अन्याय केलेला आहे.''[१७]

### ३.३ पुरंदर गडावरील महारांचा पराक्रम :

छत्रपती शिवाजी महाराजांनी अनेक जातीधर्माच्या लोकांना सोबत घेऊन हिंदवी स्वराज्याची स्थापना केल्यानंतर महाराजांची विजयाची घोडदौड मोठ्या प्रमाणावर सुरु होती. ''एका मागून एक विजय मिळत होते. शाहिस्तेखान प्रकरणात त्यांना प्रचंड विजय मिळाला. सुरत लूट करून तर त्यांनी मोगल साम्राज्याचे नाकच कापले. शिवाजीची जर अशीच प्रगती होत गेली तर शिवाजीवर नियंत्रण घालणे कोणालाच शक्य होणार नाही, अशी भिती औरंगजेबाला वाटत होती. यामुळे काहीही करून शिवाजीचा कायम बंदोबस्त करायचा असा औरंगजेबाने दृढनिश्चय केला आणि या कामासाठी त्याने हिंदू असलेल्या मिर्झा राजे जयसिंह याची नेमणूक केली. मिर्झा राजा जयसिंहाने अनेक मोहिमेत भाग घेऊन आपल्या कर्तबगारीतून शूर सेनापती असल्याचे सिद्ध केले होते. राजकारण, कुटनीती आणि रणनीती, या तिन्ही क्षेत्रात त्याची बुद्धी तितक्याच कुशलतेने चालत होती. हा जयसिंग लहानपणापासूनच मोगलांच्या सेवेत होता. मोगलांनी सोपविलेल्या अनेक जबाबदाऱ्यात हा एकदाही अपयशी ठरला नव्हता. यामुळे मोगल राज्यात जयसिंग म्हणजे यश असे समीकरण बनले होते.''[१८] म्हणून काट्याने काटा

कांढणे या म्हणीप्रमाणे हिंदू राजाचा पराभव करण्यासाठी औरंगजेबाने मिर्झा राजा जयसिंह या हिंदुची निवड केली होती व त्याला सहकार्य करण्यासाठी इतर मुस्लिम सरदार दिले होते.

''बादशहाच्या हुकुमाप्रमाणे जयसिंगाने दक्षिणेच्या स्वारीची त्वरीत तयारी केली. १४,०००- फौजेसह त्याने ९ जानेवारी १६६५ रोजी नर्मदा नदी ओलांडली आणि १० फेब्रुवारीला तो औरंगाबादला येऊन पोहोचला. औरंगाबादमध्ये राजपुत्र मुअज्ञम याची भेट व इतर दरबारी शिष्टाचार पाळण्यास त्याने कसे बसे तीन दिवस घालविले. दि. १३ फेब्रुवारी रोजी तो पुण्यास महाराज जसवंतसिंगाकडे रवाना झाला आणि महाराज जसवंतसिंगाकडून त्याने दक्षिणेच्या स्वारीची सुत्रे स्वतःच्या हाती घेतली. जयसिंगाने यावेळी सासवडला आपले प्रमुख लष्करी केंद्र ठेवले होते.''[१४] प्रथम मिर्झा राजा जयसिंगाने पुरंदर किल्ल्याला वेढा दिला. जयसिंगाने पुरंदरच्या किल्ल्याची सर्व जबाबदारी दिलेरखानावर सोपविली होती. अशाप्रकारे ''दि. ३१ मार्च १६६५ रोजी पुरंदरच्या युद्धास सुरूवात झाली होती. पुरंदरच्या पायथ्याशी मोगलांचे सैन्य दिलेरखानाच्या नेतृत्त्वाखाली पुरंदर किल्ला सर करण्याचा मोठा प्रयत्न करत होते. या संघर्षात मराठा सैन्याचे नेतृत्त्व मुरारबाजी देशपांडे हे करीत होते. यावेळी मराठ्यांचे जवळजवळ सातशे (७००) सैनिक दिलेरखानाच्या ५००० सैन्याशी झुंज देत होते. उभयतांच्या संघर्षात मुरारबाजी कामी आला. यामुळे दिलेरखान मोठा आनंदी झाला. यात मराठ्यांचे तीनशे तर दिलेरखानाचे पाचशे पठाण ठार झाले होते. परंतु मराठ्यांचे तीनेश सैन्य मारल्यामुळे खान आनंदी होता. ताकदीने खचलेल्या गडावर आता एकामागोमाग एक एक जबरदस्त हल्ले चढवून गड काबीज करण्याचा बेत खान करत होता. परंतु पुरंदरचा सरदारा पडला तरी पुरंदरचा सर दरवाजा पडला नव्हता. त्या प्रचंड दरवाजावरचा भगवा झेंडा दिमाखात फडकत होता. दरवाजावरची नाईक मंडळी खानापुढे वाकायला तयार नव्हती. कारण 'ती फौज होती महारांची' मुरारबाजीला मानाचा मुजरा करून ते म्हणाले, 'जोहार धनी जोहार! जावा सुखी देवा घरी जावा! गडाची चिन्ता नका करू! आमच्या छातीच्या ढाला हायेत तवर गडावरल्या झेंड्याला

हात घालायला अजून कुणाची ही माय व्यालेली नाही! आम्ही महारांची माणसं म्हणजे महाराजांची मानसं! जावा माघारी वळूनशानिबी नगा बघू! गड आमच्या काळजात अल्लाद हाय! आमचा जोहार घ्या ! धनी आमचा जोहार घ्या! किती किती कौतीक सांगावे गडावरच्या गड्यांचे? सर दरवाजाच्या महार पोरांनी, राजगादीवरल्या कोवळ्या मावळ्यांनी आणि कंद कड्यावरच्या खाशारामोशांनी पुरंदर गड मोठ्या थाटात झुंजत ठेवला होता. दिलेरखान हल्ल्यावर हल्ले चढवित होता आणि गडावरची महाराजांची माणसे पैजेवर खानांचा प्रत्येक हल्ला उधळून लावीत होती. रामोशांच्या अंगी जेजुरीचा खंडोबा जणू अवतरला होता. महार नाईकाच्या न्हिदी आई लक्ष्मी कडाडली होती. कोळ्याच्या मनगटात त्यांचा महारुद्र केदारेश्वर संचारला होता. ही सगळी मंडळी आपआपल्या कुलदैवताचा जयजयकार करीत खानाच्या सैन्याची दैना उडवीत होती. केवढा चिवटपणा हा! विलक्षण! बिनजोड! महाराजांच्या महार-रामोशासारख्या अडाण्यांनी अजूनपर्यंत किल्ला भांडत ठेवला होता. केवढी त्यांची निष्ठा! खरे धर्म कर्तव्य या अडाणी मंडळींनाच समजले. खरोखर आडाणी कोण? बेभान होऊन भगव्या झेंड्याखाली लढणारे गडावरचे हे महार की मोगली झेंड्याखाली लढणारे मिर्झा राजे? अस्पृश्य कोण ते की हे?''[२०]

## ३.४| गोदनाक महार

शिवकालखंडामध्येच म्हणजे शके १५७५ श्रावण शु. ३ इ.स. २७ जुलै १६५२ रोजी गोदनाक नावाच्या महाराने मोकादमांना वाचविण्यासाठी स्वतःचा जीव धोक्यात घालून मोकादमास वाचविल्याचे उदाहरण आहे. हा गोदनाक महार दिवानाकडून मारला गेला होता. म्हणून गोदनाकाचा मुलगा अर्जनाक यास तरालाचे वतन करून दिले. यासाठी खालील संदर्भ उपयुक्त ठरतो.

''अज रख्तखाने नरसो धोंडदेउजी हवालदार व मुदसदियान किले रोहिडा बु ॥ दौलतहू बजानेबू ता । बालोजी पटेल कुढले मोकदम व नाइकजी पटेल कुढले मोकदम मौजे करंजीये तर्फ मजकूर सु ॥ सन सलास खमसैन अलफ तुम्ही हर दोजण किला येउनु अर्ज केला जे

गोदनाक माहार महुडेकर किले मजकुर हा दिवाणाचा चाकर असता अमचे बराबर ठाण्याहूनु दिवाणची सदरी ठाणगावर मारिला सबब येउनु कसाला गुजरला आमचे बाप भाऊ वडील व बिरादरभाऊ धरुनु स्वारीचे लोकांनी खाना मागितला त्याप्रमाणे लोकास बकरी माजून वगैरे खाना देउनु नीट बंदोबस्त करूनी खुसी केले. त्याउपरी काही लोक निजले काही लोक रखवालीस बसले त्याणी गाऊमहारास ताकिद केली जे दो पटेल मोकदम भाऊ बिराद फरजंद नफर सारे चीजबस्त घर तुम्हा महाराचे हवाला केले असे यातील अफरातफरा हिला हरकत जाल्यास तुमचे सारे गाऊमहाराच्या गरदना मारू याप्रमाणे ताकीद करनु सारे लोक निजले. त्याउपरी आम्ही व आमचे बाप भाऊ बिरादर फरजंद याणी विचार केला जे दिवाणचा ठाणगा आपले वडिलानी मारिला याबाबे आपल्या गरदाना मारितील हे खास दिसते आता आपल्यास जाण्यास वाट आपले महारापासी मागावी असा मनसुबा करुनु गाउमाहारास सला पुसिली तो गाउमाहार बोलिले जे आम्ही तुमचे जिवासाठी दिवाणचे गुनेगार होऊनु आपल्या लेकराफरजंदा सुद्धा गरदना मारुनु घ्यावया हा हिया आमचे हातुनु होत नाही असे सर्वांनी सांगितले त्याउपरी आमचे बाप व बिरादर भाऊ व फरजंद यास जरब पडुनु गोंदनाक माहार महुडेकर किलेमजकूरचा चाकर याजला भाकेत गवसुनु वचन घेतले जे आमचे सारे जीऊ वाचवणे त्याजवरून गोंदनाक बोलिला जे माझी तर गरदान तम्हा बाबती मारितील त्यास मी कबूल आहे. परंतु माझा फरजंद अरजनाक यास काय तुम्ही आपले वतनापैकी वतन देता ते तुम्ही आपले पूर्वज स्मरुनु कबूल केल्यास पार करुनु देतो त्याजवरूनु ते वेळी गोंदनाकास वचन दिल्हे की आम्ही आपले इनामपैकी रु ॥ ३ ॥६ तीन येक पैसा व खालिसा पैकी वहाण कांबळे वरकस रान व खाचर सुधा देऊ व गाऊ महाराजाचे इनामपैकी हिसा अठवा रकम टका .।. रुके बारा व हडकी हडवळ्यात हिसा अठवा व बइत्यास हिसा अठवा व घर गाऊमहाराचे वेळी बारा घरटका व वणम्हैस पालक व गाऊमहाराची तरालकी दरोबस्त तुजला व तुझे भाऊ बिरादर फरजंद याजकडे अवलाद अफलाद चालऊ या वचनास जो आमचे वंशातील भाऊ न बाप फरजंद व बिरादर भाऊ नव

बिगर हक बिरकत करील त्यास पूर्वजाची व श्री महांकाळाची शफत असे त्याप्रमाणे ते वेळी इनाम जाले ते आम्हाकडून गोंदनाकास मिळावे तो गोंदनाक आमचे बाबती गुन्ह्यात येउनु दिवानानी ठार मारला असा गोंदनाक आमचे वडिलाचे उपयोगी येउनु आमचे जिऊ वाचविले ते वचन आम्ही गोंदनाकाचे फरजंदाकडे चालविणे जरुर याबाबे किला येउनु अर्ज केला हा दिवाणानी आमचा अर्ज खातरेस अणुनु अर्जनाक गोंदनाक याचा फरजंद यास आमचे वडिलाचे व आमचे वचनाप्रमाणे गाऊ महारांकडूनु करुनु दिल्हे पाहिजे याज वरून तुमचा अर्ज खातरेस अणुनु तुमचे गुन्हे माफ दिवाणातुनु तुम्हा मोकदमास माफ करुनु तुमचे अर्जदास्ताप्रमाणे धाकनाक वलद जाननाक माहार याजला पुरसीस केली जे हर दोजण मोकदम याचे बोलणे सदरहु तुजला कबूल असल्यास इमाने कबूल होणे त्याजवरुनु धाकनाक मजकूर बोलिला जे मोकदम पटेल त्याचे इमान गोंदनाकाजवळ जाले तेच माझे पूर्वजाचे व माझे फरजंद वंशासुधा जाले मोकदमाचे वचनाप्रमाणे अर्जनाक वलद गोंदनाक यास माझे वतनापैकी वतन अठवा हिसा व घर या सुधा घ्यावे त्याजवरून तुजला पुरसीस केली जे तू कबूल जालास याचे इमान करणे त्याजवरून तू इमान केलेस जे माझे वौशी जो तरालाचे वतनास व मोकदमाचे वचनास हिला हरकत करील त्यास पूर्वजाची शफत व माझे जातवले देवाची व पाहनीचे देवाची शफथ आमचे भाऊ बिरादर फरजंद व वौशिक यास असे त्याजवरुनु तीन बिनादरा खातरेस आणुनु गोंदनाक याचा फरजंद अर्जनाक याजला तुमचे कबुलाती अर्जदास्ती वरुनु बहाल दिवाण करून दिल्हा जातो जे मोकदम याचे इनामपैकी रुके ६३६ तीन एक पैसा व खालिसापैकी वहाण कांबळ्याबद्दल बरकस रान व खाचर याप्रमाणे व गाऊ महार याचे माहारकी पैकी इनाम रकम टका . ।. बारा रुके हिसा आठवा व हडकी हडवला व मळ्यात व दाईत्यात वगैरे हिसा आठवा व दरोबस्त तरालकी व वेलीचा घर व घरटका व वण व पालक व मानापैकी माहाराचे वतनापैकी एक मान देऊनु चालवावे असे मोकदम व गाउमहार याचे अर्जावरुनु दिवाणातुनु बहाल करुनु दिल्हे असे तरीही सनद अर्जनाक वलद गोदनाक याचे दुमाला करुनु चे फरजंदाचे फरंजद अवलाद अफलाद तरालकाचे वतन

माहारपणाचे वगैरे बाबती माहारपणाच्या दरसाल ताज्या सनदेचा उजूर न करणे या सनदेची तालिक लिहून घेउनु मुख्य सनद अर्जनाक वलद गोंदनाक तराल याजपासी फिरोन देणे जाणिजे छ १ रमजान मोर्तब सुद (शिक्का)'' [२१]

''छत्रपती शिवाजी महाराजांच्या तोफखान्यावर आणि किल्ल्याच्या संरक्षणासाठी उभारलेल्या शिबंदीमध्ये महार आणि मांग या लढाऊ शूरवीरांचा अधिक भरणा होता. शिबंदीमधील सैनिक किल्ल्याच्या संरक्षणासाठी सदैव तत्पर असत.'' [२२]

''कृष्णाजी अनंत सभासद यांनी लिहिलेल्या बखरीत ते उल्लेख करतात की छत्रपती शिवाजी महाराजांच्या लष्करात ४५,००० घोडेस्वार आणि १००००० पायदळ मावळे होते. या सैन्यात मुसलमान व महारांचासुद्धा समावेश होता.'' [२३]

**३.५ रायनाक महार :**

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केल्यानंतर हे स्वराज्य अबादीत ठेवण्यासाठी तसेच त्याचे संरक्षण करण्यासाठी अनेक किल्ले बांधले होते. शिवाजी महाराजांच्या लष्करी व्यवस्थेत किल्ल्यांना असाधारण महत्त्व होते. किल्ल्यांच्या आधारावरच शिवाजी महाराजांच्या राज्याचे रक्षण झाले. औरंगजेबासारख्या बलाढ्य शत्रुशी शिवाजी महाराजांना तोंड देता आले ते किल्ल्याच्या आधारामुळेच. ''शिवाजी महाराजांच्या राज्यात एकूण २४० किल्ले होते'' [२४] ''छत्रपती शिवाजी महाराजांच्या सर्व किल्ल्यांमध्ये रायगडचा किल्ला म्हणजे मुकुटमनी होता. या किल्ल्याचे बांधकाम पुर्ण झाल्यानंतर, तटबंदी, बुरूज झाल्यानंतर तसेच सर्व तोफा गडावर नेल्यानंतर छत्रपती शिवाजी महाराजांनी मुख्य मार्गा व्यतिरिक्त बाकीचे सर्व मार्ग पुर्णतः बंद करून टाकले. महाराजांनी नंतर दरबार भरवला आणि सांगितले की, किल्ल्याचे सर्व दरवाजे बंद असताना जो कोणी गड चढून दाखवेल त्यास मोठे बक्षिस देऊन सन्मानीत केलेजाईल. यावेळी पाचाडचा रायनाक महार दरबारात आला व जोहार करून किल्यावर अवघड मार्गाने चढून दाखविण्यास सिद्ध झाला. काम फत्ते झाल्यानंतर विजयी मुद्रेने हा महार महाराजापुढे

जोहार करून उभा राहिला. महाराजांनी सर्व खातरजमा केल्यानंतर त्या महारास त्याचे बक्षिस दिले व तो मार्ग महाराजाने कायमचा बंद केला. ''२५

### ३.६ खंडू महार :

रायगडावर घडलेली दुसरी एक घटना खालील प्रमाणे सांगीतली जाते.

''रायगडच्या किल्ल्यास औरंगजेबाच्या सैन्याने वेढले होते. पुष्कळ दिवसपर्यंत वेढा न उठल्यामुळे किल्ल्यावरील दारुगोळा व अन्नधान्य कमी होऊ लागले त्यामुळे लोकांचे फार हाल होऊ लागले. छत्रपती शिवाजी महाराजांना मोठी चिंता वाटू लागली. बाहेर कसे जावे याबद्दल ते विचार करू लागले. तेव्हा त्यांनी किल्ल्यात दवंडी पसरविली की; ज्यांना किल्ल्याची चोर वाट माहित आहे, त्यांना सोन्याचे कडे इनाम मिळेल. या दवंडीमूळे खंडुजीने महाराजांना चोरवाट दाखविली. त्यावेळी महाराज म्हणाले, खंडू तू गरीब आहेस, पुन्हा स्वार्थाच्या आहारी गेलास तर देशावर मोठे संकट उद्भवेल. तू पुन्हा कुणाला चोरवाट सांगू नये म्हणून मला तुझे दोन्ही पाय दे. खंडूने दोन्ही पाय देऊन एका मोठ्या संकटातून महाराजांची चिंता दूर केली.

माझा राजा चोर वाटेनी सुरक्षित जावे याकरीता खंडूने आपला एकुलता एक मुलगा फूल म्हणून वाहिल. असा रायगडच्या पायथ्याशी असलेल्या रायरोबा नावाच्या देवाला नवस केला होता. त्या देवाकडे जाण्यासाठी त्याची पत्नी हौसा हिने खंडूला आपल्या खांद्यावर घेतले व कडेवर चिमुकले पोर घेऊन नवस करण्यास गेले. वाटेत त्यांना संन्याशांनी त्याला अशा स्थितीत इथे कशाला आलास असे विचारले तेव्हा त्यांनी घडलेली परिस्थिती सांगीतली. संन्याशाने खंडूला आपल्या चिमुकल्या मुलाला देवास फूल वाहू नकोस. मी महाराजांना चोर वाटेची व्यवस्था करण्यास सांगतो, असे म्हणून जावू लागले. तेव्हा खंडूने त्यांना बोलावले व सांगीतले महाराजांना जी चोर वाट सांगीतली ती लहान आहे मी तुम्हाला मोठी चोरवाट सांगतो त्यावर ते संन्याशी म्हणाले, तू महान आहेस, तुझ्यासारखे लोक महाराजाजवळ आहेत म्हणूनच आम्ही कधी गुलाम होणार नाहीत. आता ही चोरवाट दुसऱ्याला माहित होऊ नये म्हणून तू

मला तुझी जीभ दे. त्यावर खंडूनी आपली जीभ कापून दिली. हा खंडू दुसरा कोणी नसून एक महार होता."[२६]

वरील घटना ह्या दंतकथा वाटताल परंतु दंतकथा ह्यादेखील सत्यावर आधारितच लिहिल्या गेल्या आहेत. त्यात काही बाबी अतिशयोक्ती असू शकतात. परंतु वरील कथेवरून एक बाब स्पष्ट होते ती ही की, या भारतभूमीत एक शूर, पराक्रमी, स्वतःचे बलीदान देणारी जात होती ती जात महार, हीच होती. स्वतःच्या शरीराचे अवयव तोडून देणे हे त्याकाळच्या लोकांसाठी नगण्य होते. कारण त्याकाळी म्हटले जायचे की, सारा गाव मेला तर चालेल परंतु त्यांचा पोसींदा (पालनकर्ता) जिवंत राहिला पाहिजे. दुसरी बाब खंडूच्या बायकोसमोर ही घटना घडली होती. परंतु तीनेदेखील आपल्या पतीस आडवले नाही. कारण त्याकाळच्या स्त्रिया देखिल तितक्याच धैर्यवान होत्या. आपला पती युद्ध मोहीमेवर जात असताना त्याचे काय होईल, तो परत येईल किंवा येणारही नाही हे माहिती असताना देखील त्याला युद्ध मोहीमेवर जाण्यापासून वंचीत करत नव्हत्या, फक्त आपल्या धन्याच्या वापस येण्याची प्रार्थना आपल्या कुलदैवताजवळ करत असत. युद्धावरून परत येणारा प्रत्येक सैनिक जिवंत घरी आला तरी तो जखमी मात्र झालेला असायचा. मग यामध्ये त्याच्या शरीराचे काही अवयव पुर्णतः निकामी झालेले असायचे. म्हणून खंडूसारख्या एका मानसाने पाय व जीभ तोडून देणे महाराजावरील प्रेमासाठी नगण्य होते.

### ३.७ अविचारे व बेगले महार :

छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्यामध्ये जे अनेक किल्ले होते. त्या पैकीच पुरंदर किल्ला हा एक होता. पुरंदर किल्ल्याशी महारांचा फार निकटचा संबंध असल्याचे दिसून येते. शिवाजी महाराजांनी ह्या किल्ल्यावर महारांची नेमणूक केल्याचे पुरावे सापडले आहेत. ज्यावेळी महादजी निळकंठराव यांच्याकडे या किल्ल्याचे सर्व हक्क होते. त्याच काळात त्यांचे निधन झाले. त्यांना चार मुले होती. त्यांच्यात किल्ल्याच्या हक्कासाठी वाद सुरू झाले. अशा स्थितीत हा किल्ला महाराजांच्या ताब्यात आला. नंतर महाराजांनी हा किल्ला आपल्या ताब्यात सहिसलामत

रहावा म्हणून पराक्रमी महारांची नेमणुक या किल्ल्यात केली. यासाठी पुढील संदर्भ महत्त्वाचा ठरतो.

''तकरीर कर्दे गणेश शंकर निलकंठराऊ सरनाईक किल्ले पुरंदर सु ॥ सबा सलासीन मया अलफ पुरंधरचे माहार अविचार व बेगले याचा कजिया आहे याकरिता स्वामीनी आम्हास आज्ञा केली की हजूर येणे त्यावरून आम्ही व चउघे कोळी व चौघे बेरड व माणिक भट हुजुर आलो त्यावर आज्ञा केली की तुम्ही आपलाल्या तकरीरा लेहून देणे त्यावरून आपण आपली तकरीर लेहून दिम्ही बेदरी पातशा होते बेदरचे देशपांडे त्याचा त्रास पातशाहासी फारच होता हा मुलुक काबीज न होय करिता नामजाद पाठवीत ते या देशास न ये तेव्हा येक फौज इकडे वाटे लाविली त्यास सांगितले की त्या प्रांते डोंगर वसवावयाचा पाहोन येणे फौजेने येऊन पाहिले की पुरंधर वसविल्याने मुलूक अगदी जफ्त होतो ते वर्तमान पातशाहास सांगितले तेव्हा जरुर जाले की पुरंधर वसवावा तेथे माणूस मातबर पाहिजे याकरिता देशपांडे यास हुकूम जाला की तुम्ही तिघे भाऊ आहा त्यात एक जण पुरंधरास पाठवा सरनाई (की) देऊन त्यावरून त्यांनी एक भाऊ पाठविले दोघे तेथे राहिले ते हली देशपांडे पण खात आहेत इकडे आले त्याचे नाव चंद्रसपंत यांनी येऊन पुरंधर वसविला सरनाइकी करीत असेत त्या अलीकडे वंश तपसिले ल्याहावा तर विस्तार वाढतो चंद्रसपंत सरनाईकी करीत असता बैत्ती व रया जाधवराऊ कनोजा त्यास नाईकी ६० लोकांची देऊन पाठविला याउपर भटारे कोळी त्याची नाईकी १५ लोकाची व ताम्हणे कोळी याची नाइकी १५ यैशा तीन नाइक्या पाठविल्या त्या गडी चाकरी करीत असता कोळीयाचा दोन्ही नाइक्या बुडाल्या त्याचा निर्वेश जाला जाधवरायाची नाइकी व आपले वडील सरनाईकी करीत अस्ता बेदरची पातशाई मोडली अलीकडे कुतुबशा व आदलशा व निजमाशा ती ठाई तीन पतशा जाल्या निमाजशाचे पातशाईचा बयान ल्याहावा तर फार वाढतो देवगिरीस निजामशा पातशा जाले हा मुलूक व किले त्याचे जाले ते वेळेस आमचे वडील निलकंठराऊ आपले पणजे फार वृद्ध जाले जाधवराव नाईकवाडी होता तो बलावला यास खाले ठविले ते बहिरवाचे देवळी

घर बांधोन होते तेथे मृत्यू पावले पुत्र ३ होते ते लाहान त्यास गडावर न घे तेव्हा माहादाजी निळकंठराऊ देवगिरीस जाऊन हुजूर राहिले तो जाधवराव बदलोन पातशाही हुकुमानी जाया जाला तो जाधवरायास माहादाजी निळकंठराऊ यानी कैद करून देवगिरीस पाठविले हे सरनाईकी करून गडी होते तेव्हा इदलशाचे व निजामशाचे लागले गडास वेढे येऊ लागले चाकर लोक टिकेनातसे जाले तेव्हा धामधुमीत कोळी येऊन याप्रमाणे वाटा मारू लागले असकरा पडिला तेव्हा माहादाजी निलकंठराऊ यानी कोळ्याचा तलाश करून कौल देऊन आणून यास नाइक्या मिरासीच्या देऊन पातशाई परवाने करून देऊन ठेविले चिवटे ३०, मिसाल १५, सगारे १५कालकुली १५ यणे प्र ॥ ठेविले त्याउपर बेगळे महार हि वाटा घेऊ लागले याचा अस्करा पडिला यासहि कौल देऊन त्यास दोन नाइक्या देऊन ४० लोक ठेविले ते माहादाजी निलकंठराऊ आपले आजे त्याचे करकीर्दीस ठेविले पलीकडे हे नाहीत माहादाजी निलकंठराऊ मृत्यू पावले पुत्र ४ भांडो लागले त्यामुळे सिवाजी राजे याच्या हातास गड आला तेथून कोळी महार गडावर प्राबल्ये जाले अविचारे खाले घातले बेगळे गडचा घेरा व गड चालऊ लागले आम्ही गड शिवाजीराजे यास दिल्हा आमचे चुलते वडील निळोपंत यास सरनाईकी करार करून गडावर ठेविले नेताजी पालकर यास सरनोबती सांगोन राजे खाले उतरोन पुण्यास आले निळोपंत वरीसभर गडावर होते तो रोज उठोन आमचा कजिया होऊ लागला याकरिता चौघा भावास पालख्या देऊन आपणाजवळी ठेविले तो पावेतो अविचार माहार गडावर होते अलीकडे कोळी माहार एक होऊन अविचार खाले घातले कोळ्यानी लेहून दिल्हे की गड आपण वसविला याकरिता जाले वर्तमान लेहून दिल्हे आहे खरे खोटे करणार स्वामी समर्थ आहेत आपण लि ॥ यात नवदिगीर जाली तर स्वामीचे अंण्याई." [२७]

### ३.८ चिव्हे महार

महारांचा पराक्रम हा प्राचीन काळापासून राजे रजवाड्यांना ज्ञात होताच महार ही जात मुळातच शूर, इमानदार, शब्दाला जागणारी व मालकासाठी प्राणाची बाजी लावणारी होती.

यामुळेच आर्यांनी कपटाने यांचा पराभव करून यांना गुलाम बनविले. परंतु यांचे हे गुलामीचे जीवन फार काळ राहिले नाही. कारण छत्रपती शिवाजी महाराजांनी प्राचीन सर्व शूरजातींच्या शौर्याचा बारकाईने अभ्यास केला. तेव्हा त्यांना दिसून आले की, मराठ्यांबरोबरच ज्यांना सामाजव्यवस्थेने हिन समजले आहे अशा अनेक जातीतील लोक शूर व लढवये आहेत. म्हणून शिवाजी महाराजांनी अनेक जाती जमातींच्या लोकांची भरती आपल्या सैन्यात केली. त्यात सर्वात शूर व लढवये महार आहेत हे शिवाजी महाराजांच्या नजरेतून सुटले नाही. म्हणून महाराजांनी या महारांची नेमणूक किल्लेदार म्हणून करण्याचे ठरवीले. या पदावर निवड करत असताना महाराजांनी जातीपेक्षा ही कर्तबगारीवर जास्त भर दिला. महाराजांच्या काळात सर्वात जास्त महत्त्वाचे स्थान हे किल्ल्याला होते. कारण त्यांची युद्ध निती ही गनिमी कावा या पद्धतीची होती. म्हणून किल्ले म्हणजे महाराजांच्या स्वराज्याचा आत्मा होता. मराठ्यांचे सैन्य कमी असल्यामुळे शत्रुवर हल्ला केल्यानंतर आश्रयासाठी किल्ल्याशिवाय दुसरा पर्यायच नव्हता. "एका किल्ल्यामुळे परिसरातील पन्नास मैलाचा भाग ताब्यात राहत होता. किल्ल्यावरून भोवतालच्या प्रदेशाचाही राज्यकारभार पाहिला जात असे. संरक्षणाच्या दृष्टीने किल्ल्यास असाधारण महत्त्व असल्यामुळे किल्ल्याच्या डागडुगीवर महाराजांनी अमाप पैसा खर्च केला." [२८] "किल्ल्याच्या संरक्षणाची व्यवस्था हवालदार, सबनीस, कारखानीस आणि सरनौबत या चार अधिकाऱ्यावर सोपवलेली असे यात हवालदार आणि सरनौबत मराठा जातीचे, सबनीस ब्राह्मण जातीचा आणि कारखानीस प्रभू जातीचा अशी व्यवस्था असे. हवालदार हा किल्ल्याच्या चाव्या स्वतःकडे ठेवी, सबनीस हा लेखापालाचे काम व रजिस्टर सांभाळत असे तर कारखानीस हा किल्ल्याच्या सर्व कारभारास जबाबदार असे." [२९]

वरील अधिकाऱ्या व्यतिरिक्त प्रत्येक किल्ल्यामध्ये एक किल्लेदार नेमला जात असे. किल्लेदाराची निवड करत असताना छत्रपती शिवाजी महाराजांनी कधीच जातीचा विचार केला नाही. तर त्यांनी कर्तबगारी व शौर्याचा विचार केला. म्हणूनच या पदावर त्यांनी महारांची निवड

केल्याचे दिसून येते.

"पुरंदर किल्ल्याचा किल्लेदार 'चिव्हे नाईक' हा महार होता हा अवसरी खुर्द ता. पुरंदर जि. पुणे येथील रहिवाशी होता."[३०] "किल्ल्याच्या बाहेरच्या भागाच्या संरक्षणाची जबाबदारी महार व रामोशी यासारख्या जातीकडे सोपवलेली असे."[३१] याबरोबरच छत्रपती शिवाजी महाराजांच्या तोफखान्यावर आणि शिबंदीमध्ये महार शूरवीरांचा भरणा अधिक प्रमाणात होता. "किल्ल्यावरील शिबंदीकडे अत्यंत महत्वाची व जबाबदारीची दोन कामे होती. (१) त्यांनी किल्ल्याचा बंदोबस्त ठेवून किल्ल्यावर जे कैदी असतील त्यांना सांभाळावे (२) भोवतालच्या सपाटीवरील प्रदेशास कुमक लागल्यास त्याची व्यवस्था करावी."[३२] या बरोबरच "मराठ्यांच्या लष्कराच्या तोफा बैलगाडीतून समरांगणावर नेत, या तोफा बैलगाडीवर चढविणे, बैलगाड्या समरांगणावर नेणे तेथे तोफांची व्यवस्था लावून त्या डागणे व उडविणे ही कामे ही महार व मांग पाईकांना नेमून दिलेली होती."[३३]

### ३.९ बहिरनाक

छत्रपती शिवाजी महाराजांचे सैन्य तीन भागात विभागले होते. त्यात पायदळ, घोडदळ व आरमार या तीन विभागापैकी पायदळाकडे शिवाजी महाराजांनी विशेष लक्ष दिले होते. कारण महाराष्ट्राचा भौगोलिक परिसर हा दऱ्याखोऱ्या, डोंगर, पर्वतांचा होता. या ठिकाणी पायदळ गनिमी काव्याच्या पद्धतीने शत्रूला चांगलेच जेरीस आणू शकत होता. "महाराजांच्या पायदळात जवळजवळ १ लाख लोकांचा समावेश होता. अशा या पायदळातील नोकरी ही महारांची जवळजवळ वंशपरंपरागत हक्काची बाब झाली होती."[३४] या पायदळाची रचना सर्वसाधारण पणे पुढीलप्रमाणे होती. "दहा सैनिकामागे एक नाईक, पाच नाईकावर एक हवालदार, तीन हवालदारावर एक जुमलेदार, आठ जुमलेदारावर एक हजारी आणि त्यावर एक सेनापती असे."[३५] पायदळातील सैनिकाबरोबरच नाईक या पदावर देखील बहिरनाक महार हा होता. यासाठी पुढील संदर्भ महत्त्वाचा ठरतो.

"अज दिवाण र ॥ खास बजानिब कारकुनानी बाजे महाल बिदानंद सु ॥ समान इसरीन अलफ बजीब किले पुरंदर बंदगी हजरती मालूम केले जे किले मजकुरास देणे याची मोईन ब ॥ हुजती (मो.जा.) सादर केली आहे ते माहेवारी तनखा बि ॥ दुमाल (मो.जा.) हुजनी प्रमाणे अज दिल्हा आहे बितपसील त ॥ खेडेबारे देहे १३ व त ॥ महाले देहे ३ ॥ व त ॥ १ येकुन होन २२४० मोईन होन २०० येणे प्रमाणे दिधले आहे पैकी त ॥ खेडेबारे देहे १३ व त ॥ सन खमस हिरदुमाल दस्त पडत ते बेरजेची वाटणी किल्ले मजकुरीहून करून देवत आसते ते वाटणीने आपणात आपण रंजीस बोलले म्हमोन किले मजकूरचे सबनीस जागीर न नायकवाडी मिलोन सन सितामधे देहे हाये मजकूरची वाटणी करून हिशोब दुमाला लिहिला ते वाटणी सरस निरस पाहून जाली नाही म्हणोन सन समानाकारणे देहाय मो ॥ वाटणी करून हुजूर जाबता पाठविला आहे व का महाले ३ ॥ व त ॥ १ तनखा आहे त्याची मोईन होन दोनसे यासी वाटणी हिरदुमहाल जैसी चालिली आहे तेणे प्रमाणे ता हिरदुमाल (मो.जा.) आहे सदर हू तनख्याची नफरगत वाटणी व ॥ जाबता प्रमाणे आलाहिदा नफरगत मोकरर फर्मान करून दवावणे यास जाले ब ॥ इस्यार ३ दिवाण इलतमेसी देवविले किले पुरंदरास तनखा ब ॥ हुजती प्रमाणे अजम त ॥ खेडेवारे देहे १३ व त ॥ १ एकुण होन २४४० व तरफ महाले देहे ३ ॥ त ॥ येक १ मोईन होन २०० सदरहू तनखियाची वाटणी करून जाबला किले मजकुरी हून हुजूर पाठविला आहे तेणे प्रमाणे हुजरून नफरगत जाले नाही. या मोकरर फरमान करून दिल्हा आहे ती पैकी जथे बहिरनाक सोन नाईकवाडी खास नाईक किले पुरंदर शा व तैनाती ब ॥ हुजती महाल नो । २४ एकुण बेरीज देणे सालिना होन १६८."[३६]

इ.स. १६५९ साली कल्याण आणि भिवंडी हे भाग जिंकल्यानंतर छत्रपती शिवाजी महाराजांचा सिद्दी सोबत संघर्ष सुरू झाला. "सिद्दीचे सैनिक छत्रपती शिवाजी महाराजांच्या सैन्यासोबत जमिनीवर लढण्यासाठी सक्षम नव्हते. म्हणून सिद्दीचा प्रमुख फत्तेखान हा शिवाजी महाराज अडचणीत असतील तेव्हा त्यांच्या प्रदेशावर चोरून लपून हल्ले करीत असे. म्हणून

महाराजांनी बाजी पासलकर यास सिद्दीचा पाडाव करण्यासाठी पाठवीले. बाजी पासलकराने मोठा संघर्ष करून सिद्दीचा पराभव केला. याच बाजी पासलकरांचे अंगरक्षक खंड्या महार व येल्या मांग हे शूर शिपाई होते.''[३७]

### ३.१० मेटे नाईकी महाराकडे

छत्रपती शिवाजी महाराजांच्या स्वराज्याचा आत्मा म्हणजे किल्ले होता. या किल्ल्यामध्ये तीन प्रकार होते. जलदुर्ग, भुईकोट व डोंगरी किल्ले. जलदुर्ग हा किल्ला पूर्णपणे पाण्यामध्ये उभारला जाई. भुईकोट किल्ला हा अर्धा जमिनीत व आर्धा जमिनीच्यावर असे. त्याच्या भोवती मोठा खोल खंदक खोदून त्यात पाणी सोडले जात असे. तिसरा प्रकार हा डोंगरी किल्ल्याचा होता. जो किल्ला जमीनीच्या उंच अशा डोंगरावर बांधला जात असे. सुरुवातीच्या दोन प्रकारच्या किल्ल्याच्या रचनेतच त्याच्या संरक्षणाची पूर्ण सोय होती. परंतु डोंगरी किल्ल्याला नैसर्गिक संरक्षण नव्हते. म्हणून प्रत्येक डोंगरी किल्ल्याच्या शिबंदी संरक्षणासाठी किल्ल्याच्या उतरणीवर ठिकठिकाणी जेथे थोडी सपाटी असेल तेथे कायम वस्ती करण्यात येत असे. त्याला मेट्ट किंवा मेटे अशी संज्ञा असे. मेट्टे किंवा मेटे हा शब्द मूळ कानडी आहे. या मेट्ट्या वरती मेटनाईक म्हणून बहुधा महारच असत. या मेट्ट्यांनाच संरक्षण चौक्या देखील म्हणत असत. महाराबरोबरच मेटनाईक म्हणून कोळी, ठाकूर, मांग, बेरड आणि रामोशी यांच्याही नेमणूका केल्याजात असत. मेटे म्हणजे किल्ल्याखालची पहाऱ्याची जागा असल्याने मेटनाईक म्हणून नेमण्यात आलेल्या महार, मांग, कोळी, ठाकूर, बेरड, रामोशी यांना चोवीस तास डोळ्यात तेल घालून पहारा द्यावा लागत असे. उदाहरणासाठी पुढील संदर्भ महत्त्वाचे ठरतात.

#### ३.१०.१ खंडनाक

''करीना (हकीकत) खंडूनाक वलद रामनाक महार मौजे करंजिये ता. भोर ता। रोहिडखोरे सु। सन सबा अबैन मया अलफ साहेबाचे सेवेसी करीना लेहोन दिल्हा यैसाजे इदिलशाहा निजामशहाचे कारकिर्दीस किले रोहिडा येथे आपले बापाचा चुलता काळनाक महार

मौजे मार व येसनाक महार सोंडकर या दोघांच्या नाईक्या होत्या ते समई वतनदारीचे चाकरीस कमळनाक महार मौजे नाटंबी ता। मार व वाडी व धावडी ता ॥ उतरोली हे दोघेजण दुतर्फाचे (किल्ल्याच्या दोन्ही बाजूंच्या उतरणीवर) महार होते. निमेनिमप्रमाणे उत्पन्न घेऊन चाकरी करून होते. त्या दोघांनी बदअमली (काही गैरवर्तणुक) केली म्हणोन अजम सेखाजी किलेदारी किले रोहिडा यानी दोघांची डोचकी माराविसी केली व मुलेबाळे ढाणकास (ढाण्यावाघास खाण्यास रानात सोडणे) द्यावीसी केली तेव्हा सोंडकराने रदबदल करून कमळनाक महार मौजे नाटंबी यासी आपले हाती घेऊन खंड कबूल केला तो दिवाणास दिल्हा वाडी धावडीचा महार अटकेत ठेवीला ते समई नाटंबीच्या महारास खंडाचा पैसा न मिळे म्हणून त्याने आपले महारकीच्या वतनाची चौथी तक्षिम येसनाक सोंडकर यासी दिल्ही तेही येसनाक सोंडकर कबूल न करी आपला पैकाच मागो लागला तेव्हा महारकीच्या वतनाची चौथी तकसीम व किल्ल्याचे वतनदारी मुले उपेंद्र होईल ते खाणे व वतनदारीची चाकरी करणे म्हणोन सांगितले त्याप्रमाणे येसनाकाने कबुल करून त्या प्र ॥ चालत आले त्यावरी किला महाराज राजश्री थोरले स्वामीस हस्तगत जाला मोगलाई बुडाली तेव्हा कालनाकाची नाईकी व सोंडकर महाराची नाईकी करार केली आणि वाडीचा महार अटकेत होता त्यास खंडाचा पैका न मिळे याकरिता त्यास सर्जा (रायगड) बुरुजाच्या खाले पायात घालावयाचा हुकूम महाराजांनी केला. त्यावरून वाडीचा महार सर्जा बुरुजाच्या पायाखाले घातला. त्यावरी काळनाक व सोंडकर महार मयत जाला पोरांडा जाला देशावरी गेले त्यावरी रामनाक आपला बाप गावावरी आला त्याने रायगडास जाऊन महाराज राजेश्री कैलासवासी याणी पुर्वीचा दाखला मनास आणून पूर्ववत प्रमाणे सनद दिल्ही ते किल्ल्यास आणिले मेटे आठ बसविली नाईकी वतनदारी चालवून लागला पुरातन घरठाणा बांधला टाके पाणी खावयासी एक दिल्हे तेथील पाणी खावून वतनदारीची चाकरी व नाईकी केली तो मृत्यू पावला त्यास सर्जा बुरजाखाले पुरिला तेथे चिरा रोवीला आहे त्यास त्याचा लेक आपण आपले लग्न जाले नव्हते तेव्हा भोजनाक राजानी वसती वाडी ता। उत्रोली

त्याची लेकी लग्नाची केली ते लहान म्हणवून त्याचे घरी येकेठाई राहिलो आणि वतनदारीची चाकरी व किल्ल्याची नाईकी करीत होतो त्यावरी भोजनाक बोलला की तू एकला दुजला दोन्ही चाकऱ्या ओढणार नाहीत तरी वतनदारीची चाकरी मजला सांगमे व तू नाईकी करणे म्हणोन बोलिला त्यावरून आपण त्यास बोलिलो की तुजला वतनदारीची चाकरी सांगता येत नाही तरी तू माझे नाईकीत ++++ राहोन माझे निसवतीने वतनदारीची चाकरी करीसील तर तुजला सांगेन यैसे बोलिलो त्या प्र ॥ भोजनाकाने कबूल केले. त्यावरी त्याची आसामी आपले नाईकीत घालून त्यास वतनदारीची चाकरी करावयासी सांगीतले आपण नाईकी करीत होतो त्या उपरी आपण वेगळा निघालो तेव्हा वतनदारी बद्दल भोजनाक कजिया करू लागला दसरियाचे शांतीच्या टोणग्याचे सीर आपले वडील व आपण घेत भोजनाकाने कजिया खाले सीर नेत होता त्यास आपण दोही दिल्ही त्या तागाईत दरवाजा नजीक श्री....जननी जवळ टोणगियाचे सीर पुरु लागला'[३५]

### ३.१०.२ बेगले महार

''पुर्वी नीलकंठराव पुरंधरी किलेदारी हकिमी सरनाईकी करून होते शाहजी भोसले पातशाही चाकर व हेही पातशाही चाकर पातशाहीमध्ये गडब (ड) होऊ लागली ते समई किल्यावरी नीलकंठराव खाले अंमल शाहाजी भोसल्याचा तेयाचे साहित्य करीत व पातशाहीची आज्ञा शाहाजी भोसल्यास की पुरंधरचे साहित्य करीत असेत त्याकडे खेडेबारे व रोहिडखोरे मावलचे फुटगाव व थोरले सुपे शाहाजी भोसल्याकडे पुणे देश सरकारात त्यास भोसलेच फार कडून पुणे देसचा भोगवता घेत असेत शाहाजी भोसले इतबारी जाणून पातशाहानी चंदीकडे पाठविले दादाजी कोंडदेव सिवाजी राजे सिवपुरी वरसाचे ठेवून आपण चंदीस गेले किल्ल्याचे साहित्य करावे तो सिवाजी महाराजे लाहान दादाजी पंताचे काही चालेना कोली महार मिलोन वाटा पाडू लागले किल्ल्यास सरजाम जांऊ देईनात यैसे जाले किल्ल्याची मोठी हालाखी जाली उपरी लोक होते ते उठोन गेले जवळील गावचे होते ते दोनच्यार से राहिले किल्ल्यास

भरती नाही तेव्हा माहादाजी नीलकंठरायानी तजवीज करून कोली वाटा पाडीतात त्यासी राजकर्ण करून कोली.

१ ताम्हणे कोली अवध्यात वडिल त्यास बेलघाटी ठेविले

१ कालकुड नीर्गुड मेटी (ठेविले)

१ ढगारे बावचीचे मेटी ठेव (ले)

१ मिसाल जवल ठाकरास ठेवला.

येणे प्र ॥ चार नाइक्या करून दाहा दाहा दाहा अशा म्यानशी ठेविले वाटा पडेनाशा जाल्या किल्यास सरजाम येऊ लागला सिवाजी राजे लाहानपणापासूनच त्याची बुधपातशाही अंमल उठवावा पुंडाई करावी ते किल्ल्यासी घासो लागले कोली से पनास चाकर नीलकंठरायांनी ठेवून मुलुग मारावा किल्ल्याची बेगमी करावी त्यास कोली बलावले ते म्हणो लागले आम्हास तुम्ही अणून ठेवले आम्हास सरकारची सनद करून द्या त्यावरून नीलकंठरायांनी पातशाहास लेहून सनदा केल्याच्या नावाच्या आणिल्या त्यास दिल्हा तुम्हास नीलकंठरायानी आणून मेटाच्या नाईक्या देऊन ठेविले त्या प्र ॥ तुम्ही मेटी राहून किल्ल्याची चाकरी नीलकंठराव सांगतील त्या प्र ॥ करून सुखरुप राहाणे ऐसी सनद अणून दिल्ही त्यावरी ताम्हणे कोली याचे बुडाले त्यापासी चिव्हे जमातीत चाकर होते तेच मेटी राहून चाकरी करू लागले या प्र ॥ च्यारी किलीयास आणून त्याचा गौर बहुत प्रकारे करून राजगडाखाले ताम्हाणे कोली मुख्य होते त्यास वस्त्रेपात्रे देऊन त्यानी चाकरी किल्ल्याची करावी यैसे इमान प्रमाण करून ठेविले त्यास जागे नेमून दिल्हे.

या उपरी शाहाजी भोसले चंदीकडे गेले पातशाहीची घालमेल जाली माहादाजी नीलकंठराव मेले सिवजी राजे बलावले त्याणी किला घेतला नीलकंठरायाची मुले माणसे उतरूण पुणियास नेली बाजी घोलप सिवाजी महाराजापाशी होते बरे अकलबत शाहाणे माणूस जाणून किलेदारी सांगोन पुरंधरी ठेविले ते किलेदारी करू लागले भोवताली घरे लोकाची त्याचे

घरी लग्न मोहुर्त जाला तर पानाचा खाड व खोबरियाची वाटी गावकरानी न्यावी किलेदारास काही नाही तेव्हा घरा करार करावास जाला भोवरगाव जमा करून घेरा किल्ल्याकडे करावा यैसे कागद भोवरगावचे घेऊन जमान अमान राजीनामे घेऊन आपण निघाला देशमुख देशपांडे अणवी निघाला तो बेलघाटचे वाटेने खाले उत्तरोन तलवटी पूर आहे गावचे दक्षिणेस पेठे कडून वाट सावगिरीकडे जाते व वाटेने निघोन पूर डावे टाकीले. ते समई पेट नवती सायेघाटाचे तलवटीहून हली धोंडोबा अपानी विहीर खाटली आहे. त्याचे दक्षणेस डोंगर अेक आहे त्याच्या पायाने निघोन वरधोजी नाईक बेरडाची वहिवर गेले तेथून हली बेरड वज्रगडाखाले वाडीस राहात ते वाडीस जाऊन पानवडी हली जे पानवडीस धोंडो अपानी घर बांधले ते वाडी डावी टाकून वर चढोन नाईक्या करीत होते बेगले माहार कोल्या बराबर होते ते दाहाबारा महार बरे मर्द असेत त्यास किल्ल्याचे दक्षणेस, बावचीच्या मेटाखाली कालदरीच्या बहिरावचे उत्तरेस अदमध घरे बांधोन राहावयास जागा दाखविली तेथे घरे बांधोन नांदत होते हली भिताडे त्याची आहेत याउपरी सिवजी राजाचे प्राबल्य त्यास किल्ल्याची अगत्य त्याचे कारकिर्दीस कोली अथवा माहार गडावरी गेले नाहीत मेटीहू चाकरी करावी सकराजी नारायणे यास सुरनिसी सांगितली पुणे देश त्यास दिल्हा सावोत्र। इनाम करून दिल्हा या प्र ।। चालत होते ते समई कोल्याची घरा म्हणून घेतला नाही त्या उपर राजे याचे अवतार समाप्त जाहाला नारोशंकर लाहान संभाजी महाराजे धरून नेले मागे धनी कोणी नाही राजिक फार जाले मुलूक उजेड जाला किल्यावरी लोक नामजाद होते ते उठोन गेले त्रिंबक सिवदेव सिचीवाचे मामा त्यास पुरंधरी ठेविले पैसा मिलेना लोक मिलेनात गडावरील गस्त चालली पाहिजे व सदरेस वेडा पाहिजे या करीता बेगले माहार गडावरी आणून संताजी बतदल येलदेकर यास नाईकी पहिलेच होती त्याची अलग होती ते जागा महारास देऊन गडावरी ठेविले. गस्तिची चुड धरावी व सदरेस बेडा आणून द्यावा गस्तीच्या असाम्या व वेडेकराची असामी करून दिल्ही.''[३५]

### ३.१०.३ महादनाक :

वरील प्रकारच्या महारांना दिलेल्या मेटनाईकी प्रमाणेच सातारा किल्ल्याची मेटनाईकी महादनाक वलद राजनाक या महाराकडे होती. परंतु इ.स. १७२८ साली या मेटकरी असणाऱ्या महारास सातारा सदाशिव पेठेचे ढालेपणाचे वतन देण्यात आले यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

''महादनाक वळद राजनाक महार' मेटकरी किल्ले सातारा यासी''

दिल्हे वतनपत्र ऐसी जे तुवा हुजूर अर्ज केला जे शहर सातारा येथे सदाशिवपेठेची नवी वसाहत सरकारातून जाहाली. तेथील ढालेपणाचे वतन स्वामींनी कृपाळू होऊन मजला नुतन करार करून मानपत्र वगैरे नेमून देऊन चाकरी घेऊन भोगवाटिस पत्र करून दिल्हे पाहिजे-म्हणोन त्याजवरून तुझा अर्ज सातरेस आणून पेठमगर येथील ढालेपणाचे वतन तुजला करार करून द्यावयाचे त्याबद्दल शहर मजकूरचे इतर पेठेतील ढाले यास मानपान वगैरे काम पावते ह्याची चौकशी करून लिहून पाठवणे म्हणोन कृष्णाजी जनार्दन पेटा सातारा येथील माथतळीचे काम चालविणार त्यास साल गु ॥ समसमान आहारीरात हुकूम सादर जाला त्यावरून त्यांनी एकशे त्रेसष्ट आखचे विनंतीपत्र व पेठ गुरुवार येथील ढाल्यास मानपान त्याची याद पाठविली.

१ तश्रिके बदल साळिणा रु. ३

१ पोटगी व घोंगडी ब ॥ मिळोन रु. ५

१ किरकोळ परभारे घ्यावयाची'' [४०]

''ढालेपणाचे वतन म्हणजे दरवर्षी विजयादशमीस ढाळकाठीस नवा ध्वज चढवायचा असतो या ढालकाठीची जागा गावच्या मध्यावर प्रमुख ठिकाणी असे. दरसाल दोन पासोड्या घेऊन त्यास गोडतेल व काव घातलेल्या ताकात भिजवून भगवा रंग द्यावयाचा व त्याचे भले मोठे, निशाण शिवून सिद्ध करावयाचे आणि मग ते समारंभपूर्वक ढालकाठीस चढवावयाचे त्याबद्दल महार व तेल्यास जमीन इनाम मिळे.''[४१]

''महारास मिळालेली इनाम जमीन व पराक्रम याचा संबंध काय? असा प्रश्न पडणे सहाजीक आहे. परंतु महारांना इनाम जमीनी, सरदारकी व पाटीलकी ही मराठे कालखंडात विनाकारण न देता महारांच्या शौर्यामूळे मराठकालखंडातील राजांना साम्राज्य विस्तार करण्याचा फायदा, कधी गड किंवा किल्ले शत्रूंच्या मगरमिठीतून जिंकून देण्याचा फायदा तर कधी राजे व राजघराण्यातील लोकांचे, सरदारांचे, मोकदमाचे प्राण वाचविले. यामुळे खूष होऊन शासकांनी महारांना इनाम जमीनी, सरदारकी व पाटीलकी दिलेली आहे.''[४२]

### ३.११ वाल्हे येथील महार

महार ही जात शूर, धाडसी व पराक्रमी तर होतीच. याबरोबरच ही जात अत्यंत विश्वासू व इमानदार होती. महार जात अत्यंत इमानदार असल्यामुळेच गावातील कोणताही तंटा सोडवण्यासाठी महाराची साक्ष ही अत्यंत महत्त्वाची समजली जात असे. ''कोणत्याही प्रकारचे भांडण, तंटा, जमीनीचा वाद शिवे संबंधीचा वाद यामध्ये महारांची साक्ष महत्त्वाची होती. कारण तो अत्यंत इमानदार व विश्वासू म्हणून ओळखला जात होता.''[४३] या महार जातिच्या विश्वासूपणाचा व इमानदारीचा उपयोग छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या स्वराज्याच्या स्थापनेसाठी तर घेतलाच याबरोबरच महारांचा वापर महाराजांनी आपल्या कुटुंबाच्या संरक्षणासाठी देखील केल्याचे दिसून येते. याकाळात ''गावच्या पाटलाची, आसामीची व जमीनदाराची मुलगी किंवा सून परगावी जात असेल तर तिच्या संरक्षणासाठी तिच्यासोबत मुऱ्हाळी म्हणून महार जात असे. अशावेळी त्या स्त्रिवर चोर, दरोडेखोरांनी हल्ला केला तर आपल्या जीवाची पर्वा न करता तो त्या स्त्रिच्या संरक्षणासाठी चोरांशी दोन हात करत असे. जोपर्यंत त्याच्या जीवात जीव आहे तो पर्यंत तो महार त्या स्त्रिच्या केसालाही धोका होऊ देत नसे. अशी ही जीवावर बेतनारी कामगिरी तो इमानदारीने पार पाडत असे.''[४४] असाच प्रसंग छत्रपती शिवाजी महाराजांच्या बाबतीत घडला होता. ''छत्रपती शिवाजी महाराजांची मुलगी सखुबाई हिचा विवाह बाबाजी निंबाळकर यांच्या मुलाबरोबर झाला होता. तिच्यावर एकदा संकट गुदरले,

त्या प्रसंगी वाल्हे येथील महार तिच्या उपयोगी पडले. म्हणून तिने त्यांना भाऊ म्हटले व तेव्हापासून आपले आडनाव भोसले, पडले असे त्यांचे म्हणणे आहे.''[४५] म्हणूनच कदाचित आज महारांमध्ये भोसले अडनावाची अनेक कुटुंबे आहेत.

महार जातीच्या विश्वासूपणा पराक्रम व इमानदारीबद्दल बेदरच्या बादशाहाच्या काळातील एक घटना अत्यंत महत्त्वपूर्ण ठरते. ज्या घटनेमुळे महार ही जात किती विश्वासू व इमानदार होती हे कळते. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो. ''एकदा बेदरचा बादशहा आणि त्याची राणी निवडक शिपायासह शिकारीला गेले होते. त्यांच्या सोबत अमृतनाक नावाचा एक महार देखील होता. जो बादशहाचा विश्वासू शिपाई म्हणून कामास होता. बादशहाने दिवसभर शिकार केली. काही हरणांना मारले तोपर्यंत सायंकाळ झाली. त्याच जंगलात त्यांनी एक तंबू उभारला होता. राणीची व्यवस्था दुसऱ्या तंबुत केली होती. सायंकाळी बादशाहा आपल्या सहकाऱ्यांसोबत मनोरंजनाचा आस्वाद लुटत असतानाच तंबुच्या बाहेर घोड्यांच्या टापाचा आवाज आला आणि काही कळण्याच्या आतच काही लोक जे दरोडेखोर होते ते तंबुत घुसले. तंबुतील सर्व मशाली त्यांनी विझविल्या यामुळे काय होत आहे हे कोणालाच कळेना. अंधार असल्यामुळे काहीही दिसत नव्हते. तेव्हा अमृतनाकाने तंबुच्या जवळच वाळलेल्या गवताची गंजी होती ती पेटवून दिली यामुळे सर्वत्र प्रकाश पडला. यामुळे दरोडेखोरांनी तेथून पळ काढला. यानंतर पहातात तो राणी व तीचा घोडा त्या ठिकाणावरून गायब होता. ही बातमी बादशहास कळताच तो रागाने लालेलाल झाला व सर्व शिपायांना राणीस शोधून आणण्याचा हुकूम दिला. सर्वत्र शोधाशोध करूनही राणीचा ठावठिकाणा लागला नाही. बादशहास वाटले राणी या गोंधळामध्ये स्वतःचा बचाव करण्यासाठी घोड्यावर बसून आपल्या राजवाड्याकडे गेली असेल. म्हणून सर्व राजवाड्याकडे आले. परंतु तेथेही राणी नव्हती. बादशहापुढे मोठे संकट उभे राहिले. दोन तीन दिवस शोध घेऊन ही राणीचा शोध लागत नव्हता. म्हणून बादशहाने फर्मान काढले की जो कुणी राणीला शोधून आणेल त्याला जहागीर देण्यात येईल. परंतु कोणीही ही जबाबदारी

स्वीकारण्यास पुढे येत नव्हता. नंतर बादशहाने दरबार भरवला व सर्व शिपाई व सरदारांना त्यांनी पुन्हा वरील बाब सांगीतली. शेवटी अमृतनाक हा त्यांचा शूर शिपाई समोर आला व त्याने भरदरबारात विडा उचलला. त्याने बादशहाकडून राणीसाहेबांना शोधून आणण्यासाठी काही दिवसाचा वेळ मागितला. राणीला शोधण्यासाठी विडा उचलून ही काही दिवस अमृतनाक हा घरीच होता.हे बादशहास कळल्यानंतर त्याने तसे अमृतनाकास विचारले. अमृतनाक नंतर शोधमोहिमेस जाण्यास सिद्ध झाला. परंतु जाण्यापूर्वी तो बादशहास भेटावयास आला. त्या भेटीत त्याने बादशहास एक छोटी पेटी दिली व ती सुरक्षित ठेवण्यास सांगीतले. तसेच त्या बादशहाकडून वचन घेतले की ही पेटी मी राणीसाहेबांना घेऊन येत नाही तोपर्यंत उघडू नये, आणि अमृतनाक राणीच्या शोधास निघाला. त्याने घोड्यास टाच मारली व तो जंगलात दिसेनासा झाला. त्याने आपल्या बुद्धीच्या जोरावर राणी कुठल्या दिशेने गेली असेल याचा अंदाज बांधला आणि त्या दिशेने त्याची शोधमोहीम सुरू झाली. काही दिवस शोधा शोध केल्यानंतर त्याला राणी ज्या घोड्यासह गायब होती तो घोडा दिसला. परत शोधाशोध केल्यानंतर तो राणीपर्यंत जाऊन पोहोंचला. राणीला घेऊन अमृतनाक बेदरला आला. राणीलापाहून बादशहास खूप आनंद झाला. मोठा दरबार भरवून राणीचे स्वागत करण्यात आले. राणी आल्याची बातमी सर्व गावात वाऱ्यासारखी पसरली. याबरोबरच काही संशयी लोकांनी राणी व अमृतनाक यांच्या चारित्र्यावर शंका घेतली. ही बातमी बादशहास कळल्यानंतर बादशहा देखील अस्वस्थ झाला. त्याने आपल्या प्रमुख सरदारासोबत विचार विनिमय केला आणि अमृतनाकास भर दरबारात आपण निर्दोष असल्याचे सिद्ध करण्यास फर्मान सोडले.कदाचित मागील काही इतिहास अमृतनाकास माहित असेल म्हणून अमृतनाकाने राणीला शोधण्यास जाण्यापूर्वी राजास एक छोटी पेटी दिली होती व परत येईपर्यंत ती न उघडण्याचे वचनही घेतले होते. अमृतनाक दरबारात आला आणि आपण निर्दोष असल्याचे सांगू लागला परंतु त्याच्यावर दरबारातील सर्वांनीच खोटे बोलत असल्याचा आरोप केला. तेव्हा अमृतनाकाने बादशहास

विनंती केली की, मी राणीस शोधण्यास जाण्यापुर्वी आपणाकडे एक छोटी पेटी दिली होती ती आता आणून उघडून पहावी कारण त्यात मी निर्दोष असल्याचा पुरावा आहे. बादशहाने ती पेटी दरबारात मागवून घेतली. सर्वांसमक्ष उघडली. पेटी उघडल्याबरोबर बादशहास आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसला.त्यांच्या डोळ्यात अश्रू आले. ते अमृतनाकाकडे फक्त पहात होते. कारण त्यांच्या शंकेचे समाधान झाले होते. हा सर्व प्रकार दरबारातील लोकांना कळत नव्हता. बादशहा खूपच आनंदात होता. त्या पेटीत दुसरे तिसरेकाही नसून अमृतनाकाच्या परुषत्वाची निशाणी होती. हे पाहून बादशहाने अमृतनाकास मोठी जहागीर देण्याचे मान्य केले. परंतु अमृतनाकाने जहागीर न घेता आपल्या समाजासाठी ५२ हक्काची सनद मागीतली. ती सनद बादशहाने ताम्रपटावर लिहून दिली.''[४६]

हिंदवी स्वराज्याचे संस्थापक छत्रपती शिवाजी महाराज यांच्यावर १६८० मध्ये काळाने झडप घातली आणि एक महान, कर्तबगार शुन्यातून विश्व निर्माण करणारा सम्राट काळाच्या पडद्याआड गेला.ज्या मोगली सत्तेला गदागदा हालवून महाराष्ट्राच्या भूमीवर पाय ठेवण्यास ही पुढे येऊ दिले नाही. त्या महान व्यक्तीमत्वाला काळाने कायमचे महाराष्ट्रापासून दूर नेले. छत्रपती शिवाजी महाराज मोगलांसाठी कर्दनकाळ होते. म्हणून त्यांच्यानिधनाचा सर्वात जास्त आनंद मोगलांना झाला असणार. ''छत्रपती शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील सर्वात दुःखाची घटना म्हणजे त्यांचा ज्येष्ठ पुत्र संभाजी १२ डिसेंबर १६७८ मध्ये त्यांच्या शत्रुला म्हणजेच मोगलांना जाऊन मिळाला होता.संभाजी हा ज्येष्ठ पुत्र असल्यामुळे त्याच्याकडे सर्व मराठे भावी राजा म्हणून पहात होते. परंतु तोच मोगलांना जाऊन मिळाल्याने मराठा स्वराज्यातील प्रत्येक व्यक्ती दुःखी झाली होती. संभाजीच्या माध्यमातून छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्यात मोठे खिंडार पाडण्याचा प्रयत्न मोगल बादशहा औरंगजेब करत होता. संभाजी मोगलांना जाऊन मिळाल्यामुळे संपूर्ण दक्षिण हिंदुस्थान आपल्या ताब्यात आल्याचा आंद मोगलांना झाला होता. संभाजी यांना मोगलांनी सात हजारी मनसबदारी, 'राजा'हा किताब व एक हत्ती भेट म्हणून

दिला होता. संभाजीचा उपयोग मोगलांनी साम्राज्यविस्तारासाठी करण्याचे ठरवले आणि त्या प्रमाणे दिलेरखानाने संभाजीस सोबत घेऊन विजापूरवर स्वारी करण्याचे ठरविले. दिलेरखानाच्या स्वारीचे संकट लक्षात येताच सिद्दी मसुदने शिवाजी महाराजांकडे मदतीची याचना केली. शिवाजी महाराजांनी ही सिद्दी मसुदच्या विनंतीस मान देऊन ६००० सैन्य विजापूरच्या मदतीस पाठविले. यावेळी विजापूरमध्ये दुष्काळ पडला होता म्हणून बरेच धान्य सुद्धा शिवाजी महाराजांनी विजापूरला पाठविले होते. परंतु मसुदखान देखील शिवाजी महाराजांना फितूर झाले व त्याने मोगला सोबत मैत्री करणे पसंत केले. यावेळी या दोघांसोबत संभाजी देखील होता. परंतु वरील मैत्री नियतीला देखील पसंत नसावी. उभयंतामध्ये पुन्हा वितुष्ठ निर्माण झाले व दिलेरखान व मसुदखान यांची मैत्री संपुष्टात आली. परत मसुदखान शिवाजी महाराजांना शरण आला. महाराजांनी नंतर ही मसुदला दहा हजार घोडेस्वार पाठवून मदत केली. दिलेरखानास शह देण्यासाठी म्हणून शिवाजी महाराजांनी मोगली मुलूखात लुटालूटीस प्रारंभ केला. याचवेळी महाराजांनी जालना शहरातील श्रीमंत व्यापाऱ्यांची मोठी लुट केली. जालना शहरावर स्वारी करून केलेली लुट ही महाराजांची शेवटची स्वारी होती.''[४७]

मोगलांनी मराठी मुलूखामध्येच हैदोस घातला होता. संभाजीच्या उपस्थितीमध्येच मराठा सैन्याला कैद करून त्यांचा मोठा छळ केला जात होता. यामुळे मोगलांविषयी संभाजीचा मोठा भ्रमनिराश झाला. दिलेरखानाने संभाजीस दिलेली वचने तो पाळत नव्हता; म्हणून संभाजी राजे मोगलांना सोडून देऊन पुन्हा स्वराज्यात पन्हाळगडावर आले. (४ डिसेंबर १६७९). या दिवशी सर्व मराठ्यांना मोठा आनंद झाला. ही शुभ वार्ता शिवाजी महाराजांना कळताच ते स्वतः पन्हाळ्याला संभाजीस भेटण्यास गेले. या भेटीत त्यांनी दक्षिण भारातील मराठ्यांना संभाजीकडून किती अपेक्षा आहेत हे समजावून सांगितले. संभाजीने कर्नाटक राज्यावर लक्ष केंद्रित करावे अशी शिवाजी महाराजांची इच्छा होती. परंतु संभाजीने याबाबीस म्हणावा तसा प्रतिसाद दिला नाही. ''आपण आता महाराजांना सोडून कुठेही जाणार नाही'' असे निक्षूण

सांगितले. सभासद बखरीत शिवाजी महाराज व संभाजी यांच्या भेटीबद्दल असे म्हटले आहे की, "मग पिता पुत्राची भेट जहाली. बहुत रहस्य जाहाले, त्या उपरी राजे म्हणू लागले की, लेकरा, मजला सोडू नको. औरंगजेबाचा आपला दावा, तुजला दगा करावयाचा होता. परंतु श्री ने कृपा करून सोडून आणिला. थोर कार्य जाले"[४८]

वरील विवेंचनावरून आपणास एक बाब प्रकर्षाने लक्षात येते ती ही की, मोगल हा मराठ्यांचा फार मोठा शत्रू होता. त्याने विविध बाबींचा वापर करून छत्रपती शिवाजी महाराजांना नामोहरम करण्याचा प्रयत्न केला; परंतु छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या कर्तृत्व व शौर्याच्या जोरावर मोगलांना शह दिला. परंतु त्यांचा ज्येष्ठ पुत्रच मोगलांना जाऊन मिळाल्यामुळे त्यांची हिम्मत खचली. तरी त्यांनी धैर्याने मोगलांना कडवा विरोध केला. त्यात त्यांना बरेच यश आले. परंतु त्यांच्यावर झालेल्या मानसीक हल्ल्यामुळे ते लवकर सावरु शकले नाहीत. संभाजीच्या कृतीमुळे त्यांना मोठा धक्का बसला. मोगलांना प्रतिकार करत असताना त्यांना मोठी ताकद खर्ची घालावी लागली. तसेच त्याना याकाळात खूप शारीरिक ताण पडला. रात्रंदिवस मोगलांना झुंज देऊन महाराज क्षिण झाले होते. शेवटच्या काळात त्यांना त्यांची प्रकृती देखील साथ देत नव्हती. शिवाजी महाराजांना प्रश्न पडला होता की, माझ्यानंतर कोण गादीवर बसवावा. संभाजी राजाने शिवाजी महाराजांच्या हयातीमध्येच बंडखोरी केली होती. यामुळे "शिवाजी महाराजांच्या अष्टप्रधान मंडळाचा पाठिंबा संभाजी महाराजांना नव्हता. सल्लागार मंडळ नेमून राजारामाच्या नावाने राज्यकारभार चालवावा असे मत पेशवा मोरो त्र्यंबक व अण्णाजी दत्तो यांचे होते. यामुळे गादीसाठी यादवी युद्ध होणार याची शिवाजी महाराजांना खात्री होती. म्हणून मृत्यूपूर्वी ते दुःखीच होते. तशातच गुडघेदुखी व तापाने आजारी पडून ४ एप्रिल १६८० मध्ये शिवाजी महाराजांचे निधन झाले."[४९] यानंतर ज्येष्ठ पुत्र म्हणून संभाजी महाराजांनाच राजगादीवर बसविले.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर म्हणजेच १६८० ते १७०७ हा कालखंड

मराठ्यांच्या स्वातंत्र्य संग्रामाचा कालखंड मानला जातो. म्हणजेच १६८० ते १७०७ या एकुण २७ वर्षाच्या काळात मोगल-मराठे यांच्यात स्वातंत्र्य युद्ध चालले. "मोगल-मराठा संघर्ष हा संभाजी महाराजांच्या काळात सुरू झाला असला तरी संभाजी महाराजांच्या वधानंतर त्याची तीव्रता जास्त जाणवू लागली."[५०]

संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर वंशपरंपरेने छत्रपती शिवाजी महाराजांचा कनिष्ठ पुत्र राजाराम हा राजगादीवर आरुढ झाला. याच्या काळात मोगल व मराठे यांच्या मधील स्वातंत्र्य लढा मोठ्या प्रमाणावर वाढला होता. "छत्रपती संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर मराठेशाहीमध्ये मोठ्या प्रमाणावर अव्यवस्था निर्माण होऊन ती मोडकळीस आली होती. म्हणून महाराष्ट्रातील ब्राह्मण, मराठे, प्रभू व इतर जातींनी स्वराज्य प्रेमाखातर एक दिलाने व मुत्सद्देगिरीने नेटाचे प्रयत्न करून अनेक युद्धे केले व मराठेशाहीस सावरून धरून तिला बळकटी आणली. या कामासाठी ब्राह्मण, मराठे, प्रभू ह्या प्रमाणेच स्वराज्यप्रेमी महारांनी देखील मोगलाविरुद्धच्या युद्धात मोठा पराक्रम केला." [५१] ज्याप्रमाणे महारांनी आपल्या पराक्रमाची चुणक छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळात दाखवून हिंदवी स्वराज्य बळकट केले होते. त्याप्रमाणेच शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतरही महारांनी आपल्या पराक्रमाची धार बोथट होऊ दिली नाही. जो जोश छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळात होता तोच जोश व उत्साह पुढे देखील महारांनी कायम ठेवल्याचे दिसून येते. याबाबीची कल्पना खालील घटनांवरून येईल.

### ३.१२ नागनाक महार :

मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धाच्या काळात महारांनी आपल्या तलवारीचे पाणी मोगलांना पाजले होते. खालील सांगीतला जाणारा प्रसंग हा राजाराम काळातील आहे. ह्या कालखंडातील महारांच्या पराक्रमाच्या माहितीचा कागद वाईच्या देशपांडे घराण्यातून मिळाला आहे. त्यातील माहिती पुढीलप्रमाणे सांगता येईल.

"मौजे नागेवाडी प्रांत वाई येथील कदीम पाटीलकी मुळची महाराची. छत्रपती राजाराम

महाराजांचे वेळी माहजूर सेटी बिन नागनाक महार हा पाटील होता. त्याने नागेवाडी येथील नागवडसिद्ध ह्या देवाची पुजा करून राहण्याकरता धांडेघर व गोडाली येथील मोरोजी व चिंतामणी हे दोन गुरव आणिले. हे दोघे गुरव येऊन राहिल्यानंतर त्यांनी पाटीलाशी मारेचुरे करून त्याची पाटीलकी बळकाविली. तेव्हा सदर पाटलाने गुरवाविरुद्ध परशरामपंत प्रतिनिधीकडे फिर्याद केली. प्रतिनिधीनी गुरवास बोलाविले; पण ते आले नाहीत. तेव्हा प्रतिनीधींनी सिवझडे (सिवधडे) कऱ्यास (म्ह. जवळील गावचे मोकदम) विचारिले; त्यांनी, पाटिलकीचे वतन महाराचेच असे सांगीतले. यावरून गुरवांनी देव पुजून असावे; पाटीलकीशी त्यांचा अर्थाअर्थी संबंध नाही, असा महार पाटलाच्या बाजूचा निकाल दिला. हा आपल्या विरुद्ध झालेला निकाल ऐकूण मोरोजी व चिंतामणी या उभयता गुरवांनी पुनः छत्रपतीकडे फिर्याद नेली. यावेळी छत्रपती रांगण्यास होते. तेव्हा ही पाटिलकीची फिर्याद पुनः आलेली पाहून राजारामांनी महारास धार दिव्य करण्यास सांगीतले. म्हणजे मोगलांनी घेतलेला वैराटगड स्वराज्यास जोडून द्यावा व पाटिलकीचे वतन अनुभवावे असा निकाल दिला. त्यावेळी मोगलांनी एक एक किल्ला घेऊन पुढे जावे व मागून मराठ्यांनी ते ते किल्ले स्वराज्यास जोडावे असे चालू होते. अशातच वैराटगड हा नागेवाडीच्या महारांनी मोगलांशी लढून घेतला व पाटिलकीचे वतन मिळविले. ह्या पाटिलकीच्या वतनाबद्दल नागेवाडीच्या गुरवा महाराजांमध्ये तीन वेळा फिर्यादी झाल्या. तिनही वेळा महारांचेच वतन ठरले'' [५२]

वरील प्रकारच्या महारांच्या पराक्रमाच्या विश्वसनियतेसाठी खालील संदर्भ महत्त्वपुर्ण ठरतो.

''× × × × गुरव पिलाजी गोले यांची (साखा?) संख्य करून वतनासी भांडतो तो खोटा त्यास व वतनासी अर्थाअर्थी समंध नाही त्यावरून देशमुख व देशपांडे व समस्त गोत व समाकुल पांढर व भोंवरगांव यांचे साक्षिनशी महजर करून दिल्हा बित ।।

महजरनामा बतेरीख ९ माहे जिल्हेज बि हुजूर हजीरमजालसी गोत प्रांत वाई सरकार

नबी शाहुदुर्ग उर्फ परनाला सुभे दारुलजफर बिज्यापूर

सु॥ १११११ सन इसने मया अलफ

| | | |
|---|---|---|
| रा॥ दत्ताजी केवशजी नाईक | रा॥ गंगाजी शंकर व | |
| व सुर्याजी फिरंगोजी नो । पि- | गिरमाजी झुंगो देशपांडे | |
| साल देशमुख पा मजकूर१ | पा मजकूर१ | |
| गोपाल सेटिया मल्हारजी | बावधनकर | |
| चौधरी व मोवनसेट पाटणा कसवा | तुळाजी पिसाळ | आपाजी प ॥ |
| वाई१\| | का ॥ मजकूर१ | मा। मजकूर १ |
| जमाल पाटील कसबा वाई१ | बहिरोजी सेट्या, | सिवाजी चौगुला |
| कानुरकर\| | मौजे पसरणीकर मोकदम १ | क ॥ मजकूर १ |
| सिवाजी राजपुरे१ रतोजी राजपुरे१ | गोपाल कदम कसबे वाई१ | |

महजूर सेटी बिन नागनाक महार मौजे नागेवाडी सा। मुन्हे पा॥ मजकूर यासि लेहून दिल्हा महजर यैसाजे तुवा हुजूर येऊन जाहीर केले की मौजे नागेवाडी येथील कदीम पटेलकी आपली मिरास आपले वडील वडील चालवीत आले देवाचे पुजेस गुरव धांडे घरकर येक व गौडालीकर येक यैसे दोघे गुरव गावात आणून ठेविले त्याणी रहिवास होताच आपले वडिलांचे मारेचुरे करून मिरास घेतली आपण महार दूर उभा राहून असे गुरव जवळ जडला लाचलुचपती देऊन मिरासीस जडला आपण कदीम बूनादी आहे साहेबी आपणास हाती धरून पांढरी वरी बसऊन आपले हाते पटले की घेतली पाहिजे म्हणऊन विनती केली त्यावरून मनास आणिता गुरव येक दोन वेळा बोलाविले परंतु ते येऊन उभे राहिनात आगर पदरहि झाडिनात तेव्हा दिसोन आले की गुरव गैरमिरासी सेटी मजकुराने गुरव माळुमाती जडला म्हणऊन सांगितले ते खरे व सिवझडे मुकदम यांसीहि विचारिले की कदीम मिरास कोन्हाची ते सत्य स्मरोन सांगणे त्यासि याणी सांगितले की मौजे मजकुरची पाटिलकी माहाराची मिरास यैस आम्हास दखल आहे

आमच्या वडीलवडीली सांगत आले आहेत यैसी साक्षी दिल्ही मग मौजे मजकूरची पाटीलकी मिरास लेहून दिल्ही आसे तुझ्या लेकराचे लेकरी पाटिलकी खाऊन गांवची लावणीसंचणी करून पाटिलकीचा हकलाजिमा पटीपासोटी गाहूड मोट इनाम मानपान (नेम) णूक सुखे असणे गुरवाने गावीचा देव श्री नागवड सिध पुजून असावे पाटिलकीसी अर्थाअर्थी समंध नाही माहारानी पाटिलकी खाऊन असावे यासी पेस्तर हिलाहरकत करील तो गोताचा अन्याई दिवाणचा गुन्हेगार व महजर सही येणेप्रमाणे महजर करून दिल्हा त्याप्र ॥ आपण पाटिलकी आनभवीत आसता मोरोजी गुरव याणी चिंतामण गुरवाची पाटी करून कैलासवासी महाराज स्वामी सनिध उभा राहिला माहराज साहेबी पुर्वील हकिकत मनास आणून भगवंत सामराज व गिरमाजी झुंगो देशपांडे पा। मजकूर यासी हुजूर आणून पुरसीस केली त्यास त्याणी उत्तर केले की पाटिलकी मोकदमी कदीम वतन माहारांचे त्यासि मधे गुरवानी हुजूर फिर्याद केली होती त्यास राजश्री परशरामपंत प्रतिनिधी याणी किले वैराटगड मोगलाकडे होत" ते महाराज धारदिव्य दिल्हे त्यावरून माहाराने किला घेऊन साहेबास दिल्हा तेव्हा हि माहार खरा जाला व गुरव खोटा जाला. त्यास देशमुख व देशपांडे याणी गोताचे साक्षीनसी महजर महारास करून दिल्हा त्याप्र ।। माहार पाटिलकी आनभवीत आहे. गुरवास पाटिलकीच्या वतनास आर्थाआर्थी समंध नाही त्यावरून मनास आणून मौजे मजकूरची पाटीलकी मोकदमी तुझे वतन पुरातन हा आपले वतन वंशपरंपरेने आनभवीणे म्हणऊन आज्ञा केली त्याप्रमाणे आपण वतन आनभीत आहे त्यास महाराज साहेबी कृपाळू होऊन भोगवटीयासि पत्रे करून देऊन वंशपरंपरेने सदरहू वतन चालविले पाहिजे म्हणऊन विदित केले त्यावरून मनास आणून मौजे मजकूरची पाटिलकी मोकदमी वतन पुरातन याचे पूर्वी रांगणियाचे मुकामी असता याणि किले वैराटगडचे धारदिव्य याणे केले व चिरंजीव कैलासवासी याणीहि जमीदारास पुरसीस करून पुरातन वतन याचे खरे केले त्याप्र ।। मौजे मजकूरची पाटिलकी मोकदमी वतन करार करून अजरामरामत करून यासी वतनपत्र करून दिल्हे...गुरव पहिले पासोन खोटा होत आला आहे. त्यास मौजे मजकूरचे पाटिलकी

मोकदमीसी अर्थाअर्थी समंध नाही.''[५३]

वरील विवेचनावरून एक बाब स्पष्ट होते ती ही की, मौजे नागेवाडी येथे मुळतः पाटिलकी सेटी बीन नागनाक महाराची होती. नागेवाडीतील नागवडसिद्ध या देवाजी पुजा करून राहण्यासाठी नागनाकाने धांडेघर गौडाली येथील मोरोजी व चिंतामणी हे दोन गुरव आनले होते; परंतु यांनी देवपुजा करायचे सोडून, ते नागनाकाच्याच जिवावर उठले. 'ज्याचे करावे भले तो म्हणतो माझेच खरे' या म्हणीप्रमाणे नागनाकाची स्थिती झाली होती. परशुरामपंत प्रतिनिधींनी नागनाकाच्या बाजूने निकाल दिला असताना सुद्धा हे गुरव छत्रपती राजारामाकडे तक्रार घेऊन गेले. यावेळी छत्रपती राजारामानेसुद्धा खरे खोटे पणाची शहानिशा न करता अंधळे पणानेच नागनाकास धारदिव्य करण्यास फरमावले. यावेळी खरे पहाता धारदिव्य गुरवांनी करावयास हवे होते; परतु महारांचा पराक्रम सर्व ज्ञात होता. छत्रपती राजारामाने हा निर्णय स्वार्थापोटी दिल्याचे जाणवले. कारण मोगलांना टक्कर देऊ शकणारी महार जात होती. या मुळे नागनाकाच्या मजबुरीचा फायदा राजारामांनी घेतला आणि धारदिव्य गुरवा ऐवजी महारांना करण्याचे फरमावले. नागनाकाला सुद्धा आपली पाटिलकी टिकवायची होती म्हणून त्यानेही हे आव्हान स्वीकारले व मोगलांशी युद्ध करून वैराटगड जिंकला व छत्रपती राजारामाच्या स्वाधीन करून आपले पाटिलकीचे वतन परत मिळविले.

### ३.१३ शिदनाक महार :

महारांच्या पराक्रमाची माहिती सर्व महाराष्ट्राला होतीच. छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळापासून हिंदवी स्वराज्य अबादीत राहण्यासाठी महारांनी आपल्या प्राणांची बाजी लावली होती. महारातील प्रत्येक व्यक्तीम्हणजे एक सैनिक व कुटुंबाचा प्रमुख हा सेनापती होता. असाच ''शिदनाक नावाचा एक महार मोठा शूर व योद्धा होता. याने महारांचे मोठे सैन्य उभे केले होते. या शिदनाकास आपल्या पूर्वजांचा इतिहास चांगलाच ज्ञात होता. छत्रपती शिवरायाच्या काळात अनेक महारांनी आपल्या प्राणांची बाजी लावली होती; परंतु त्याच छत्रपती शिवाजी महाराजांच्या

मुलास म्हणजेच संभाजी महाराजांना मोगलांनी अत्यंत क्रुरपणे मारले होते. म्हणून शिदनाक हा भयंकर चिडला होता. रागाने बेभान झाला होता. मोगलांना ठेचून काढण्यासाठी शिदनाकाने महार लढवय्ये पथक तयार केले. याच पथकाने मोगलाविरुद्ध संपूर्ण महाराष्ट्रभर धुमाकुळ घातला होता.''[५४] ज्याप्रमाणे नागेवाडीच्या नागनाक महाराने मोगलास सळो की पळो करून सोडले होते. त्याचप्रमाणे शिदनाकाने देखील मोगली सैन्यामध्ये मोठी दहशत बसविली होती. एवढेच नाही तर खुद्द मोगल बादशहा देखील मराठा सैन्याच्या पराक्रमामुळे मोठा दहशतीखाली होता. औरंगजेब बादशहा मराठा स्वातंत्र्य लढ्यातील मराठा सैन्याबद्दल म्हणतो की, ''रात्री-दिवसा कुणीकडून येतील, काय करतील, असे झाले आहे. मोगलाई फौज आठही प्रहर भय बाळगी, अकस्मात यावे, बक (बगळा) मत्स्य (मासा) उचलून नेतो तसा घाला घालावा, शिपाईगिरीची शर्थ करावी, प्रसंग पडल्यास माघारी पळून जावे, खाण्यापिण्याची दरकार बाळगत नाहीत. पाऊस, ऊन, थंडी व अंधार काही न पाहता घोड्यावरच हरभरे व भाकरी, चटणी, कांदे खाऊन धावतात. त्यांना कसे जिंकावे? एक्या मुलकात फौज आली म्हणोन त्याजवर रवानगी करावी तो दुसरीकडे जाऊन ठाणी घेतात? मुलुख मारितात. हे आदमी नव्हेत भूतखाना आहे!''[५५] यावरून आपणास कळते की, मोगल सैन्य तर सोडाच; परंतु स्वतः औरंगजेब सुद्धा मराठा सैन्यास घाबरत होता. मराठा हा शब्द जातीवाचक नसून हा शब्द प्रांतवाचक व मराठी भाषा बोलणारे ते मराठा अशा अर्थाने आहे. कारण शिवकालखंडात सर्व अठरा (१८) पगड जातींच्या लोकांना मराठा हाच शब्दप्रयोग होता. याच मराठा सैन्यातील शिदनाकाच्या सैनिकांनी मोगलांना कशी टक्कर दिली होती हे खालील संदर्भा वरून लक्षात येईल.

''कृष्णा काठाने शिदनाकांचे सैन्य जात असता एका गावात दारुण किंकाळ्या येत होत्या. शिदनाकाने लगेच आपला मोर्चा त्या गावाकडे वळविला. तिथे मोगल सैनिकांने लुटमार सुरू केली होती. गावाचे कित्येक लोक रक्तबंबाळ झाले होते, काही स्त्रियांचे अपहरण केले होते, हे समजताच शिदनाकाच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. ज्या दिशेने मोगल सैन्य

गेले होते. त्या दिशेने शिदनाकाने आपला मोर्चा नेला. कृष्णानदी ओलांडत असताना मोगल सैनिकांना गाठले व त्यांना वेढले. मोगल सैन्याची दाणादाण झाली ते भयंकर घाबरले मराठा आया! मराठा आया! म्हणून पळापळी सुरू झाली. नदी रक्तरंजीन झाली. असा हा शिदनाक मोगलांच्या अत्याचाराला ही नष्ट करीत होता. त्या काळात शिदनाकाच्या पुंडाईमुळे सर्व महाराष्ट्रातील मोगल हवालदिल झाले होते. शिदनाकाने मोगलांची दाणादाण करून सोडली होती'' [५६] मराठा सैन्यातील महारांनी मोगलांशी असा चिवट लढा दिल्यामुळे औरंगजेब सुद्धा हवालदिल झाला होता. त्यास कोणत्याही स्थितीत महाराष्ट्राची सत्ता बळकावयाची होती. त्यास आपले साम्राज्य महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात निर्माण करावयाचे होते. यासाठी त्याने अनेक मातब्बर मोगली सरदारांना मोठी फौज, शस्त्रास्त्रे, तोफा व दारूगोळा देऊन पाठविले होते; परंतु राष्ट्रप्रेमी मराठ्यांनी या बड्या बड्या मोगली सरदारांना व त्यांच्या सैन्यांना आपल्या तलवारीचे पाणी पाजले होते. यामुळे खुद्द औरंगजेब बादशहा मोठा चिडला होता. म्हणून ''मोगल बादशहा औरंगजेब दिल्ली सोडून मराठ्यांचे पारिपत्य करण्यासाठी दक्षिणेत म्हणजेच महाराष्ट्रात येऊन राहिला. जवळजवळ २५ वर्षे औरंगजेब दक्षिणेत मुक्काम टाकून होता. सर्वशक्ती निशी त्याने मराठा सत्तेस हादरे देण्याचा प्रयत्न करून ती कायमची नष्ट करण्याचा प्रयत्न केला. नंतर औरंगजेबाने वजीर असदखानाचा पुत्र ईतिकदखान यास रायगड हस्तगत करून राजारामास पकडून आणण्याची आज्ञा केली. खानाने २५ मार्च १६८९ रोजी रायगडास वेढा घातला. यामुळे आतिल लोकांवर मोठे संकट आले. यावेळी गडावरील सर्व सरदार व मुत्सद्दी एकत्र येऊन विचार विनिमय करु लागले. यावेळी तिजोरीत रक्कमेचा ठणठणाट होता. पागा व फौज सर्व मोडले; किल्ले बेसरंजाम झाले, पूर्वीची अनुभवी माणसे मरून गेली. मोगलांच्या फौजा मराठी राज्यात सर्वत्र घुसून नाश करू लागल्या तेव्हा शत्रुशी उघड-उघड टक्कर देणे शक्य नव्हते. तेव्हा येसुबाईने सांगितले की, तुम्ही सर्व पराक्रमी सरदारांनी एकविचारे चालून, राजारामाने त्याचे बायका सुद्धा बाहेर पडावे, आम्हास मुलास घेवून राहण्यास योग्य जागा

रायगडासारखी नाही.त्यानुसार राजाराम ५ एप्रिल १६८९ रोजी रायगडावरून प्रतापगडावर गेले. इकडे रायगडास वेढा घालून आठ महिने झाले तरी किल्ला खानाला मिळाला नव्हता. तेव्हा खानाने कपट विद्येचा प्रयोग केला. सूर्याजी पिसाळ हा रायगड किल्ल्याच्या बचावास होता. यास खानाने वाईची देशमुखी देण्याचे आमिष दाखवून फितूर केले. या आमिषाला बळी पडून पिसाळाने रायगड किल्ल्याचे दरवाजे उघडून मोगलांना किल्ल्यामध्ये प्रवेश दिला. मोगलांनी किल्ल्यावर ताबा मिळवून येसूबाई, संभाजी पुत्र शाहू, मदनसिंह व माधवसिंह हे संभाजीचे दोन अनौरस पुत्रे थोर शिवाजीची एकमात्र विधवा राणी सकवारबाई आणि इतर २०० स्त्री-परुष सेवक शाहू सोबत कैद केले. औरंगजेबाने संभाजीच्या अगदी उलट शाहूशी वर्तणूक केली. त्याने शाहूस आपला नातू मानले. राजा म्हणून मान्यता दिली आणि ७ हजारांची मनसब ही दिली. औरंगजेबाची कन्या जिन्नतउन्निसा बेगम (वय ४७) हिने शाहूची व त्याच्या परिवाराची चांगलीच काळजी घेतली. मृत्यूपर्यंत (१७२१ पर्यंत) तिच्याशी शाहूचे स्नेहपूर्ण संबंध होते. शिवाजीचा सेनापती प्रतापराव गुजर याचे दोन पुत्र खंडोजी व जगजीवन हे शाहू बरोबर असून औरंगजेबाने त्यांना शाहू ऐवजी मुसलमान बनविले. शाहूचे जन्मनाव शिवाजी असले तरी त्यास औरंगजेब शाहू असेच म्हणत असे. औरंगजेबानेच शाहूचा विवाह कन्हेरखेडच्या शिदयांच्या मुलीशी नोव्हेंबर १७०३ मध्ये लावून दिला.''[५७]

औरंगजेबास कोणत्याही परिस्थितीमध्ये दक्षिण भारतात आपले वर्चस्व निर्माण करावयाचे होते. त्यासाठीच तो महाराष्ट्रात तळ ठोकून बसला होता. शाहू व त्याच्या कुटुंबास त्याने कैद केले होते; परंतु तो त्यांना चांगली वागणूक देत होता. यामागे औरंगजेबाचा हेतू शुद्ध नव्हता किंवा त्यास शाहू व त्याच्या कुटुंबाबद्दल फार आदर होता असेही नव्हते. संभाजी महाराज स्वतः बादशहाकडे आले होते. तेव्हा त्यांनी मोगल दरबारातील सेनाप्ती व सैनिकाकडून मराठ्यांचे व त्यांच्या साम्राज्यांचे काय हाल होत होते हे डोळ्यांनी पाहिले होते. म्हणून संभाजी महाराज परत आपल्या राज्यात आपल्या पित्याला शरण आले होते. ही बाब औरंगजेबास ज्ञात

होती. म्हणून त्याने शाहू व त्यांच्या कुटुंबाची विशेष काळजी घेतली. कारण म्हणतात ना, 'लांब उडी जर मारायची असेल तर चार पावल मागे जावे लागते' असाच काहीसा हाप्रकार होता. औरंगजेबाचा हा हेतू शुद्ध नव्हता म्हणून नियतीला देखील हे मान्य नसावे म्हणून औरंगजेबाचा २० फेब्रुवारी १७०७ मध्ये मृत्यू झाला.

### ३.१४ धर्मांतरीत पराक्रमी महार :

भारताच्या लिखीत इतिहासाची सुरूवात आजपासून मागे जवळजवळ ५००० (पाच हजार) वर्षापूर्वी झाली. यावेळी भारतात सिंधू संस्कृती होती. या काळात भारतात चार वर्ण होते. ज्यात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शुद्र यांचा समावेश होता. ही वर्ण व्यवस्था कर्मावर आधारीत होती. कोणाला ही आपल्या कार्यानुसार वर्ण बदलता येत होता. कोणालाही कोणताही व्यवसाय देखील करता येत होता. कालांतराने ही संस्कृती नष्ट झाली. नंतर वैदिक संस्कृतीचा प्रारंभ भारतात झाला. यामध्ये पूर्व वैदिक व उत्तर वैदिक हे दोन टप्पे होते. पूर्व वैदिक कालखंडामध्ये समाजव्यवस्थेत सिंधू संस्कृतीच्या तूलनेत जास्त काही बदल झाला नाही; परंतु उत्तर वैदिक कालखंडामध्ये समाजव्यवस्था मोठ्या प्रमाणावर बदलली. या काळात ही चारच वर्ण होते; परंतु हे वर्ण कर्मानूसार न राहता ते जन्मानुसार झाले. जो व्यक्ती ज्या वर्णात जन्मेल त्याला मरेपर्यंत त्याच वर्णात रहावे लागे व त्याच वर्णाची ठरवून दिलेली कामे करावी लागत. त्याची लायकी असली तरी त्यास आपला वर्ण किंवा त्या वर्णाचा ठरवून दिलेला व्यवसाय बदलता येत नव्हता. उत्तर वैदिक काळात जातीयतेने मोठे रूप धारण केले होते. वर्णव्यवस्थेतील ४ था वर्ण हा राजकीय पराभवातून याकाळात निर्माण करण्यात आला होता. ज्यांना शुद्र असे म्हटले जात होते. वरच्या तीन वर्गाची अविरतपणे सेवा करणे हेच यांचे प्रमुख काम होते. यांचा उदरनिर्वाह वरच्या तीन वर्गावरच चालत असे. वरच्या तीन वर्गांनी यांचा खूप छळ केला. त्यांना माणूस म्हणून जगू दिले नाही. अनेक शतकाच्या नंतर भारतात धार्मिक सत्तांतर झाले आणि इ.स.पू. ६ व्या शतकामध्ये अनेक पंथाचा उदय भारतात झाला. ज्या लोकांना या ठिकाणचा वैदिक धर्म

आपल्यावर अन्याय करतो असे वाटले व जे स्वातंत्र्य उपभोगू इच्छित होते. त्यांनी आपापल्या विचाराप्रमाणे व सोयीप्रमाणे त्या त्या धर्मात प्रवेश केला. अनेक शतके हे धर्म आपले अस्तित्व टिकवून होते; परंतु कालांतराने परत वैदिक धर्माने आपले वर्चस्व निर्माण करण्याचा मोठा प्रयत्न केला. नवीन उदयास आलेले अनेक धर्म परत वैदिक धर्मात विलीन झाले. त्यांचे धर्म तत्व आचरणात आणू लागले. ज्यांनी वैदिक हिंदू धर्माला विरोध केला त्यांना कायमचे संपविण्याचे सत्र भारतात सुरू झाले. यामुळे काही लोक देश सोडून इतर देशात पळून गेले व जे भारतात राहिले त्यांनी परत वैदिक धर्मात प्रवेश केला. या प्रवेशीत चौथ्या वर्णाची नंतर याठिकाणच्या धर्मांध सत्ताधिशांनी मोठी पिवळवणूक केली. पूर्वीपेक्षाही कठोर अशी जातीय निर्बंध त्यांच्यावर लादले गेले. नंतर त्या लोकांना अस्पृश्य ही संज्ञा देण्यात आली. ''अस्पृश्य म्हणजेच जे स्पर्श करण्यासही लायक नाहीत किंवा जे स्पर्श करण्यास अयोग्य आहेत.''।[५८]

अस्पृश्यांनी अनेक शतके याठिकाणच्या हिंदूंचा छळ सहन केला. नंतर भारतामध्ये अनेक इतर देशांच्या लोकांनी आक्रमणे करण्यास प्रारंभ केला. ज्यामध्ये मुस्लिम राष्ट्रांचाही समावेश होता. मुस्लिम शासकांनी भारतामध्ये आपली सत्ता हळूहळू स्थिर केली. परंतु त्यांना ही सत्ता स्थिरकरण्यासाठी माणसांची म्हणजेच सैनिकांची आवश्यकता भासू लागली. म्हणून त्यांनी भारतीय लोकांना आपल्या सैन्यात भरती करून घेण्यास प्रारंभ केला. ''हिंदूधर्मातील चातुवर्ण्य सिद्धांताप्रमाणे फक्त क्षत्रियांनी शस्त्रे हाती धरावीत असा दंडक होता. ब्राह्मण, वैश्य व शुद्र यांना शस्त्रे वापरण्याची मनाई होती. 'शुद्रातील अतिशुद्र-अस्पृश्य यांनी शस्त्रे घेणे हे तर महाधर्मभ्रष्टाकार समजले जाई. या धर्मभ्रष्टाकारास शिक्षा देहांताची असे. हिंदू समाजातील खालच्या थरातील जातींना जर शस्त्रे वापरू दिली तर ते त्यांची उन्नती करून घेतील व अशा तऱ्हेने त्यांचा सामाजिक दर्जाही वाढेल. ही भीती चातुवर्ण्याच्या रक्षकांना होती. शुद्र-अतिशुद्र यांच्या हाती शस्त्रे आली तर ते जातीभेदाविरुद्ध सशस्त्र बंड करतील आणि सर्व उच्चवर्णीय हिंदूंचा शिरच्छेद करतील ही या चातुवर्ण्य संरक्षकांना जबरदस्त भीती वाटत असल्यामुळे त्यांनी

शुद्रातिशुद्रांना शस्त्रे वापरण्याची मनाई करणारे धार्मिक कायदे आपल्या स्मृती ग्रंथामध्ये घातले. त्याची अंमलबजावणी हिंदु राजे धार्मिक भावनेने करीत होते. मुसलमानांनी भारतावर स्वाऱ्या केल्या. तेव्हा त्यांना शुद्रातिशुद्राची दैन्यावस्था दिसून आली. या लोकांना आपल्या छत्राखाली आणले तर ते आपल्या साम्राज्यासाठी लढू शकतील, हे त्यांनी हेरले. म्हणून मुसलमानांनी आपल्या सैन्यात शुद्रातिशुद्रांची भरती केली. या सैनिकांनी मुसलमानी साम्राज्यांची पाळेमुळे हिंदुस्थानच्या भूमीत रुजविण्यास मोठ्या प्रमाणात मदत केली.''[५१] महारांच्या या कामगीरीमुळे मुस्लिम सत्ताधिश मोठे खूष झाले. कारण त्यांना अत्यंत शूर, पराक्रमी व बुद्धीमान लोक मिळाले होते. यातून अस्पृश्यांमधील महार नावाजी जी जात होती ती मुस्लिम सत्ताधिशांच्या अत्यंत जवळ गेली. महारांना अन्याय व अत्याचार करणाऱ्या हिंदुपेक्षा मुस्लिम जवळचे वाटू लागले. कारण या धर्मात कोणत्याच प्रकारचा भेदभाव नव्हता. मुस्लिमातला अत्यंत गरीब व्यक्ती व श्रीमंत व्यक्ती या दोघांनाही समाजात सारखेच स्थान होते. मुस्लिमामध्ये एखादा गरीब फकीर जरी असला तरी तो स्वतंत्र होता. दोघेही मुक्तपणे मशिदीमध्ये जाऊन प्रार्थना करु शकत होते. त्यांच्यावर गरीब म्हणून धर्माची कोणतीही बंधने नव्हती. जी हिंदू धर्मात राहून सुद्धा महारांवर होती. अस्पृश्यांमध्ये महार, मांग व चांभार या जातीचा समावेश होता; परंतु महार वगळता मांग चांभार यांच्या बाबतीत हिंदुचे धोरण जरा जवळीकतेचे होते. कारण मांग व चांभार यांच्यावर हिंदू काही बाबतीत अवलंबून होते. उदाहरणादाखल सांगायचे म्हटले तर मांगापासून प्रत्येक हिंदूंना दोरखंड घ्यावा लागे. कारण हे काम फक्त मांग जातीचेच लोक करायचे. यामुळे या बाबतीत हिंदू मांगावर अवलंबून होते. या व्यतिरिक्त मांग लोक झाडू, तसेच सिंदीच्या फोकापासून टोपली ह्या वस्तू बनवत. तसेच चांभार देखील कातड्यापासून पादत्राने व इतर वस्तु बनवत होते. ज्या वस्तू ह्या हिंदूंना आवश्यक होत्या. अशा कोणत्याही बाबतीत महारावर हिंदू अवलंबून नव्हते. ते फक्त महारांना नोकर, गुलाम म्हणून राबवण्यासाठीच वापर करत. महारांना असा कोणताही व्यवसाय या समाजव्यवस्थेने ठरवून दिला नव्हता जेणे करून त्याद्वारे त्यांना आपला उदरनिर्वाह

करता येईल आणि अशा प्रतिकूल परिस्थिती मध्ये मुस्लिम सत्ताधिशांनी महारांना जवळ केले होते. एवढेच नव्हे तर त्यांना सन्मानाने वागविण्याचेही काम केले. यामागे सत्ता स्थिर करणे हा हेतू असला तरी महारांना देखील आपला विकास करण्याची संधी मिळाली. या विकासामधूनच महार हा मुस्लिमांच्या अधिक जवळ जवळ जात होता. हिंदूपेक्षा मुस्लिम महारांना खूप जवळचे वाटू लागले. त्यातूनच त्यांच्या मनामध्ये मुस्लिम धर्म स्वीकारण्याची जिज्ञासा निर्माण होत गेली. महारांनी मुस्लिम धर्म का स्विकारला याबद्दल खालील मत विचारात घेण्यासारखे आहे. ''मुस्लिमांच्या सैन्यात अस्पृश्य व महार का गेले याची कारणे तशीच असली पाहिजेत अस्पृश्य म्हणून महार यांना हिंदू धर्मात स्पृश्य-सवर्णाकडून मिळणारी पशुतूल्ये, अमानुष वागणूक यामुळे अस्पृश्यादी महारांनी धर्मांतर करून मुसलमान झाले असले पाहिजेत. त्यामुळे ते मुस्लिम सैन्यात भरतीही झाले असतील. हिंदू धर्मातील अस्पृश्य म्हणून मिळणाऱ्या वागणुकीपेक्षा मुस्लिम धर्मातील बंधूभावाची वागणूक अस्पृश्य महारांना बरी वाटली असेल. म्हणून ही धर्मांतर होणे शक्य आहे, म्हणून ते मुस्लिम सैन्यात गेले असावेत.''[६०]

महारांनी मुस्लिम धर्म स्वीकारल्याचे काही पुरावे सापडले आहेत. हे महार शिवपूर्वकालखंडातील किंवा शिवकालीन ही असू शकतात. यासाठी खालील संदर्भ महत्त्वाचे ठरतात.

''वऱ्हाडातील जळगाव येथील सुमारे पाच हजार महार लोकांनी थोड्या दिवसापूर्वीच एक जाहीर नोटीस प्रसिद्ध करून, हिंदुसमाजाने आपली अस्पृश्यता ठरावीक मुदतीच्या आत काढून टाकली नाही तर आपण परधर्माचा स्वीकार करू म्हणजे मुलमान किंवा ख्रिस्ती होऊ असे जाहीर केले होते. जळगावच्या महार लोकांचा हा जाहीरनामा म्हणजे नुसती एक पोकळ धमकी आहे असे हिंदुना वाटत होते. हा जाहीरनामा म्हणजे हिंदुंना थट्टा वाटली; परंतु हा जाहीरनामा महारांनी थट्टा म्हणून प्रसिद्ध केला नव्हता. तर त्यांचा तसा पक्का निर्धार झालेला होता. आज शेकडो हजारो वर्षे चालत आलेली गुलामगिरी ' त्यांना नाहीशी करावयाची होती.

परंतु सोवळ्या हिंदुंनी महारांचा हा निर्णय गंभीर स्वरुपात नघेता याकडे दुर्लक्ष केले. ही बाब महारांना कळली व हिंदुंना दिलेली मुदत संपल्यानंतर धर्मांतराची सुरूवात म्हणून जळगावच्या बारा (१२) महारांनी मुसलमान धर्म स्विकारला. यानंतर हजारो महार हाच मार्ग स्वीकारणार होते. बारा महारांनी धर्मांतर केल्यानंतर हिंदूचे डोळे उघडले व त्यांनी काही प्रमाणात अस्पृश्यता कमी करण्याचे मान्य केले. कारण सर्वच महार जर मुस्लिम झाले तर ते नंतर आपणास ठार मारतील. ही भीती हिंदूंना होती; परंतु १२ महार हे तोपर्यंत मुस्लिम धर्म स्वीकारून हिंदूंच्या कचाट्यातून मुक्त झाले होते.''[६१]

''या देशातील मुस्लिम समाज इथल्याच बहुजनामधून धर्मांतरीत झालेला आहे. तो इराण, तुर्कस्थान मधून आलेला नाही. वर्णव्यवस्थेने बहुजनांचे जातीच्या स्वरुपात तुकडे केले. त्यातील शुद्रांना जगण्याचे कुठलेही साधन नव्हते. म्हणून त्यांनी मुस्लिम धर्म स्वीकारला होता.''[६२] वरील विधान व मत बोपोडी (पुणे) येथील राष्ट्रप्रेमी कृती समितीने आयोजित केलेल्या राष्ट्रप्रेमी व्याख्यानमालेचे पाचवे पुष्प गुंफताना मुस्लिम विकास परिषदेचे 'हुमायुन मुरस्सल' यांनी केले.

महारांच्या धर्मांतराबद्दल शिवपूर्व काळातील देखील एक उदाहरण सांगता येईल. यासाठी खालील उतारा महत्त्वाचा ठरतो.

''१४ व्या शतकाच्या सुरुवातीला खुश्रुखान' या नावाला हिंदुस्थानच्या इतिहासात महत्त्व आले. खुश्रुखान हा खालच्या अस्पृश्य जातीतील परवारी या जातीचा म्हणजेच महार होता. (महारांमध्ये परवारी ही पोट जात होती) गुजरातमध्ये महारांना 'धेड' असेही म्हणतात. महारातील पोटजातीत धेड ह्या नावाची पोटजात ही आहे. याच परवारी महार बहाद्दराने मुस्लिम धर्माचा स्वीकार केला होता. मुस्लिम धर्म स्वीकार करण्यात त्यांच्या मनात मूळ ध्येय, उद्देश व महत्त्वाकांक्षाही असावी. धर्मांतर केल्यावर त्याने 'खुश्रुखान' हे नाव धारण केले. इ.सनाच्या १४ व्या शतकाच्या दुसऱ्या दशकातला हा काळ होता. त्यावेळी दिल्लीच्या गादीवर 'मुबारक'

नामक तुर्क सुलतान राज्य करीत होता. त्याच्याच पदरी हा खुश्रुखान सरदार होता. त्याने नंतर स्वतःची सैना उभी केली. सैना उभारत असताना त्याने मुबारकची परवानगी घेतली होती. नंतर खुश्रुखानने सैन्य बळाच्या जोरावर मुबारकला संपवून स्वतः शासक झाला. त्याने 'नशीरुद्दीन खुश्रुखान' हे नाव धारण करून दिल्लीच्या गादीवर बसला. यानंतर त्याने लागलीच सर्व मुख्य सरदारांना बोलावले. त्याने त्याच्या राजपदाला त्यांची संमती घेतली. सर्वांनी त्याच्या राजपदाला पाठिंबा दिला. त्यानेही मुल्ला, मौलवी, काझी, सरदार यांना देणग्या व पदव्या दिल्या.''[६३]

महाराने एकदा मुस्लिम धर्म स्वीकारला की त्याचा विटाळ होतो असे म्हणणारे देखील त्याला आपल्या मांडीला मांडी लावून बसू देत एवढेच नाही तर त्यास आपल्या देवघरापर्यंत प्रवेश देत असत. एकदा महार मुस्लिम झाला की, तो बादशहाचा मुलगा असल्याप्रमाणे ताट मानेने वावरत असे. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपुर्ण ठरतो.

''ज्या महाराला आम्ही आमच्या घराच्या अंगणातही येऊ देत नाही तोच महार मुसलमान झाला की, त्याला आमच्या घरात येऊन डोकावू देतो. एकदा हिंदूचा मुसलमान झाला की, त्याला मुसलमानच काय पण त्यांचा खुद्द बादशहा देखील स्वतःच्या पुत्रासारखा मानत असे.''[६४]

**३.१५ समारोप :**

वरील माहिती वरून एक बाब प्रकर्षाने सिद्ध होते की, महारांनी धर्मांतराचे सत्र अनेक शतकापासून सुरु केले होते. यांना धर्मांतर करण्यास भारतातील सनातनी हिंदूंनी भाग पाडले होते. म्हणून शिवाजी महाराजांच्या सैन्यात जे मुस्लिम सौनिक होते. यापैकी बरेच धर्मांतरीत असले पाहिजेत; परंतु धर्मांतर केल्यानंतर त्यांनी आपले नाव बदलल्यामुळे त्यांची पुर्वाश्रमाची जात लक्षात येत नाही म्हणून महारांनी केलेले धर्मांतर हा एक संशोधनाचा विषय बनू शकतो.

# संदर्भग्रंथ सूची


१) ओतुरकर रा.वी., (संपा.) पेशवे कालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार , लेख ९६, पृ. ७१

२) डॉ.गाठाळ एस.एस. , भारताचा इतहिास , पृ. ९२

३) खैरमोडे चा.भ. , अस्पृश्यांचा लष्करी पेशा , पृ. १

४) मंगुडकर मा.प. , (संपा.) , शिंदे लेख संग्रह , पृ. १३७

५) खैरमोडे चा.भ. , डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्रखंड , खंड २ रा , पृ. २२१, २२२

६) खैरमोडे चा.भ. , अस्पृश्यांचा लष्करी पेशा, उपरोक्त पृ. १

७) डॉ. गवळी पी. ए. , पेशवेकालीन समाज व जातीय संघर्ष , पृ. १२२

८) खैरमोडे चा.भ. , उपरोक्त , पृ. २

अ) खैरमोडे चा.भ. , डॉ. बाबासहेब आंबेडकर चरित्र खंड-०१ , पृ. १२४, १२६

९) नवलकर ह.ना. , शिवराम जानबा कांबले चरित्र , पृ. ४६

अ) डॉ. आंबेडकर चरित्र - साधने प्रकाशन समीती महाराष्ट्रशासन , डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे, खंड - ०१ , पृ. ६७,

१०) देशमुख मा.म. , युगप्रवर्तक शिवराय आणि मराठ्यांची शौर्य गाथा, पृ. ५२

११) खैरमोडे चा.भ. , डॉ. आंबेडकर चरित्र खंड-०१ , पृ. १२४

१२) खैरमोडे चा.भ. , अस्पृश्यांचा लष्करी पेशा , पृ. ०२

१३) देशमुख मा.म. , उपरोक्त , पृ. ४८

14) Sen S.N. , Militory system of the Maratha , P. 17, 18

१५) दीक्षित बाबुराव आवळे , नागवंशीय-आंबेडकरी चळवळतील महारांचे योगदान , पृ. ४०

१६) लोखंडे भाऊ , डॉ. आंबेडकरी सैनिकांची गौरव गाथा भाग - १ , पृ. १२७

अ) खैरमोडे चा.भ. , उपरोक्त , पृ. ३

ब) दीक्षित आवळे, उपरोक्त, पृ. ४१

१७) खांबे सुधाकर, शौर्य आणि पराक्रमाचे प्रतिक भिमा कोरेगावचा विजयस्तंभ , पृ. १

१८) डॉ. कोलारकर श.गो., मराठ्यांचा इतिहास, पृ. ५५

१९) कित्ता., पृ. ५५, ५६.

२०) पुरंदरे ब.मा., राजा शिवछत्रपती, पृ. ५, २०

अ) दीक्षित आवळे, उपरोक्त, पृ. ४१

ब) देशमुख मा.म., उपरोक्त, पृ. ३३

क) खांबे सुधाकर, उपरोक्त, पृ. ०३

२१) राजवाडे वि.का., (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड - १५, लेख २७२,

अ) डॉ. देशपांडे प्र.न., (संपा) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, लेख २७२, पृ. २४७

ब) केळकर न.चि. व आपटे व.दी., शिवाजी - निबंधावली भाग - ०२, पृ. १४५

क) जोशी श.ना., (संपा.) शिवकालीन पत्रसार -संग्रह, खंड - ०१, लेख ६२१, पृ. १३३

२२) भा.इ.सं.मं.पुणे, त्रैमासिक ६२, १-४, पृ. १४०

अ) Sr. Pitar Cadal, History of the Bombay Army, P. 12

२३) Sen, S.N., Military, System of the maratha, Ibia., P. 18

२४) डॉ. कोलारकर श.गो., उपरोक्त, पृ. ११८

अ) भावे वा.कृ., पेशवेकालीन महाराष्ट्र, पृ. ४२९

२५) नाथमाधव, स्वराज्याची स्थापना, पृ. ०१

अ) खांबे सुधाकर, उपरोक्त, पृ. ०४

२६) दीक्षित आवळे, उपरोक्त, पृ. ४२

अ) खरे ग. ह. शिवचरित्र वृत्त संग्रह खंड ३, पृ. ८५, ८६

ब) शेजवलकर त्र्य. श., श्री शिवछत्रपती प्रस्तावना आराखडे व साधने, पृ. ३३७

२७) पुरंदरे कृ.वा., (संपा.) शिवचरित्र साहित्य खंड - ०३, लेख ९२, पृ. १११, ११२

अ) दीक्षित आवळे, उपरोक्त, पृ. ४१

२८) डॉ. कोलारकर श.गो., उपरोक्त, पृ. ११८

२९) प्रा. पवार जयसिंग, छत्रपती, शिवाजी महाराज, पृ. २५२

अ) Sen S.N., Military system of the maratha, Ibid, P. 82, 83.

ब) डॉ. कोलारकर श.गो, उपरोक्त, पृ. ११८

३०) डॉ. कठारे अनिल, शिवकाळ व पेशवाईतील महारांचा इतिहास, पृ. १८३

अ. भिक्षु सीवलीबोधी, (अनु.), (आलेक्झांडर रॉबर्टसन), महारलोक, पृ. ३८

ब. डॉ. कोलारकर श. गो., उपरोक्त, पृ. ११८

३१. प्रा. पवार जयसिंग, उपरोक्त, पृ. १५३

३२. भावे वा. कृ., उपरोक्त, पृ. ४३०

३३. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक ६२, पृ. १४०

अ. Sr. Pitar Cadal, History of the Bombay Army, P. 12

ब. खैरमोडे चा. भ., अस्पृश्यांचा लष्करीपेशा, पृ. ६

३४. खैरमोडे चा. भ., कित्ता, पृ. ७

अ. Sen S.N. Ibid, P. 18

३५. डॉ. कोलारकर श. गो., उपरोक्त, पृ. ११६

३६. पुरंदरे कृ. वा., /आपटे ब. द. (संपा.) शिवचरित्र साहित्य खंड-०७ लेख -१३ पृ. १५

३७. खैरमोडे चा. भ., डॉ. बी. आर. आंबेडकर चरित्र, खंड - ०१ पृ. १८९

३८. भा.इ.सं.मं. पुणे, शिवचरित्र साहित्य खंड - ३, लेख ६०९, पृ. १९७

३९. कित्ता, लेख ४१५, पृ. १६, १७

अ. भा.इ.सं.मं. पुणे, शिवचरित्र साहित्य खंड - ०१, लेख - ९५, पृ. १११

४०. भा.इ.सं.मं. पुणे , ऐतिहासिक संकिर्ण साहित्य, खंड - ०४ , पृ. ३३, ३४

४१. खरात शंकरराव , महाराष्ट्रातील महारांचा इतिहास पृ. १५०

४२. भाऊ लोखंडे , उपरोक्त , पृ. १२७

४३. Elphinstane Mounstuart, Territories conquered from paishwa, P. 23

४४. अत्रे त्र्यं. ना. , गावगाडा , पृ. ३५, ६८

अ. भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक -६२ , पृ. १२७

४५. खैरमोडे चा. भ. , डॉ. आंबेडकर चरित्र खंड - १ , पृ. १८८

अ. दीक्षित आवळे , उपरोक्त , पृ. ४१

४६. भाऊ लोखंडे , उपरोक्त , पृ. ८ ते १९

अ. दीक्षित आवळे , उपरोक्त , पृ. ३८, ३९

४७. डॉ. कोलारकर श. गो. , मराठ्यांचा इतिहास , पृ. ९२, ९३

अ. डॉ. गठाळ साहेबराव , मराठ्यांचा इतिहास , (इ. स. १६३०ते १८१८) , पृ.१७५

४८. डॉ. कोलारकर श. गो. , उपरोक्त , पृ. ९३, ९४

४९. डॉ. गाठाळ साहेबराव , उपरोक्त , पृ. १७५

५०. कित्ता , पृ. २३१

५१. महर्षी शिंदे वि. रा. , भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न , पृ. १५३

५२. जोशी शंकरराव , मराठेकालीन समाजदर्शन , पृ. १२२

अ. पोतदार द. वा. / मुजुमदार श. ना. , (संपा.) सप्त संम्मेलन वृत्त , पृ. ५४, ५५

५३. जोशी शंकरराव , (संपा.) उपरोक्त , पृ. १२३,१२४

अ. पोतदार द. वा. / मुजुमदार श. ना. , (संपा.) , उपरोक्त , पृ. ५५ ते ५७

५४. दीक्षित आवळे , नागवंशीय - आंबेडकरी चळवळीत महारांचे योगदान , पृ. ४४

अ. मोरे चिंतामण , रणझुंजार शिदनाक , पृ. १९

५५. डॉ. गठाळ साहेबराव , उपरोक्त , पृ. २३२

५६. दीक्षीत आवळे , उपरोक्त , पृ. ४४

अ. मोरे चिंतामण , उपरोक्त , पृ. २४, २६

५७. सरदेसाई गो. स. , मराठे रियासत, खंड - १ , पृ. १७ ते २१

अ. देशमुख मा. म. , युगप्रर्वतक शिवराज आणि मराठ्यांची शौर्य गाथा , पृ. ६९

५८. डॉ. कठारे अनिल , उपरोक्त, पृ. ६७

५९. खैरमोडे चा. भ. , अस्पृश्यांचा लष्करी पेशा , पृ. ०२

६०. खरात शंकरराव , उपरोक्त , पृ. १४०

अ. देशमुख मा. म. , उपरोक्त , पृ. ५१

६१. डॉ. बाबासाहेब आंबेडकर , आग्रलेख बहिष्कृत भारत व मुकनायक , पृ. १८४,१८५

६२. गणपत कांबळे , (संपा.) दैनिक वृत्तरत्न सम्राट दि. १८ मे २००६, वर्ष ४ थे, अंक ४४ वा

६३. खरात शंकरराव , उपरोक्त , पृ. १३४, १३५

६४. नवलकर ह. ना. , उपरोक्त , पृ. ४३

अ. देशमुख मा. म. , उपरोक्त , पृ. ५२

*प्रकरण चौथे*

# पेशवेकालीन पराक्रमी महार

---

४.१ प्रस्ताविक

४.२ शिदनाक महार

४.३ तुकनाक महार

४.४ खंडनाक महार

४.५ माणिक महार

४.६ कोंडनाक महार

४.७ दुसरा शिदनाक महार

४.८ रायनाक महार

४.९ महारांची इतर पराक्रमी कार्य

- ४.९.१ पथकदार महार
- ४.९.२ जखमी सैनिकांना रणांगनातून आणने
- ४.९.३ महारास उडत रूमाल पदवी
- ४.९.४ पेशवेकालीन महारांचे हुलपथक
- ४.९.५ पेशव्यांच्या जनानखान्याचे रक्षक महार

४.१० समारोप

# प्रकरण ४ थे

# पेशवेकालीन पराक्रमी महार

## ४.१ प्रास्ताविक :

शिवकालखंडामध्ये महारांनी अनेक प्रसंगी आपल्या प्राणांचे बलिदान देऊन हिंदवी स्वराज्याचे संरक्षण करून आपला पराक्रम व शौर्य दाखविले. त्या प्रमाणेच पेशवे काळातही महारांनी आपल्या पराक्रमाच्या जोरावर पेशवाईस तारण्याचे काम केले. शिवकालखंडामध्ये ज्याप्रमाणे महार सैनिकांचा मोठ्या प्रमाणावर समावेश होता. तसाच पेशवाईतदेखील असल्याचे दिसून येते. या बरोबरच पेवाईत महारांची स्वतंत्र पथके सुद्धा होती. इ.स. १७१३ रोजी छत्रपती शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथ भट यांना पेशवाईची वस्त्रे दिली. म्हणून या दिवसापासूनच खऱ्या अर्थाने पेशवाईची सुरूवात होऊन शिवकाळाचा अस्त झाला. छत्रपती शाहू महाराज हे राजे असले तरी त्यांच्यावर अंकुश हा पेशव्यांचा होता. पेशव्याच्या मार्गदर्शनानूसार व सूचना नूसारच पुढील राजनिती ठरवली जाऊ लागली. म्हणून इ.स. १७१३ पासूनच पेशवाईस सुरुवात झाली असे म्हणण्यास हरकत नाही.

ज्या शिदनाक महाराने छत्रपती संभाजी महाराजांच्या हत्येनंतर मोठे सैन्य उभारून मोगलांना आव्हान दिले होते. तोच शिदनाक छत्रपती शाहू महाराजांच्या काळातही दिसून येतो. शाहू महाराजांनी याच्या पराक्रमी कार्यामुळे यास कळंबी हे गाव इनाम म्हणून दिले होते. यासाठी पुढील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

## ४.२ शिदनाक :

''औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र आजम हा ५ मार्च १७०७ रोजी पदारुढ झाला. त्याने जिन्नतउन्निसा व जुल्फिकारखान यांच्या सल्ल्यावरून मराठ्यात छत्रपती पदासाठी अंतर्गत कलह निर्माण व्हावा म्हणून शाहूची सुटका केली. शाहूने भोपाळच्या वायव्येस ३२ कि.मी.दुराई येथे ८ मे १७०७ रोजी मोगल छावणी सोडली. माळव्यातून विजागड सुलतानपूर मार्गे शाहू

ऑगस्ट १७०७ मध्ये अहमदनगर येथे पोहोचला. शाहूच्या सुटकेची व तो अहमदनगरमध्ये दाखल झाल्याची वार्ता ताराबाईस कळाली. आपल्या पदावर संकट येऊ नये म्हणून तिने हा शाहू खरा नसून तोतया आहे अशी घोषणा केली. त्यास छत्रपतीपद देण्यास नकार दिला. एवढेच नाही तर त्यांच्यावर ४० हजार फौजे निशी धनाजी जाधवास पाठवीले."[१] यामुळे दक्षिणेत मराठा साम्राज्यामध्येच प्रबळ असे दोन गट पडले. एका गटाचा प्रमुख शाहू होता तर दुसऱ्या गटाची प्रमुख ताराबाई होती. या परिस्थितीमध्ये मराठा सरदार व सैन्यामध्ये संभ्रमावस्था निर्माण झाली की, कोणी कोणाचा पक्ष घ्यायचा किंवा कोणत्या गटात जायचे शाहूच्या की, ताराबाईच्या? याचवेळी दक्षिणेत शिंदनाक नावाच्या महाराने मोठी फौज उभारली होती व तो मोगलांना आपल्या तलवारीचे पाणी पाजत होता. यामुळे मुसलमान फौजेत याचा चांगलाच दरारा निर्माण झाला होता. म्हणून शाहू व ताराबाई यांच्या सत्तेसाठीच्या संघर्षात शिदनाक महाराची भूमिका निर्णायक ठरणार होती. शिदनाक ज्या गाटत सामील होईल त्याचा विजय हे सूत्र यावेळी निर्माण झाले होते. कारण महारांचा पराक्रम हा सर्वांना ज्ञात होताच. यामुळे संताजी घोरपडे, धनाजी जाधव, बाळाजी विश्वनाथ हे लढवय्ये शिदनाकाकडे विचारणा करण्यास गेले की, तुम्ही कुणाची बाजू घ्याल. त्यावेळी शिदनाकाने सरळ शाहू महाराजांचा पक्ष घेतला व खंबीरपणे म्हणाला, "हे बगा ताराबाई आन शाहू महाराज हे दोघबी एका झाडाच्या फांद्या हायत्या, पण त्यातल्या त्यात रितीरिवाजा परमान छत्रपतीचा वारसा शाहू महाराजाकडे इतुया तवा तेच खरं वारसदार आहेत. तेंच्या बाजूलाच आपून उभ राहयले पायजे. आपल पाठबळ दिल पायजे"[२] मोगलांच्या कैदेतून सुटल्यानंतर ताराबाईने बळकावलेले आपले राज्य परत मिळविण्यासाठी शाहू महाराज पुण्यात आले होते. त्यांना अनेक लाहनमोठे मराठा सरदार येऊन मिळाले. यामध्ये शिदनाक महार हा देखील होता. उभयतांच्या संघार्षामध्ये ताराबाईचा पराभव झाला आणि छत्रपतीचा वारसा शाहू महाराजाकडे आला.

"छत्रपती शाहू महाराजांनी राज्य प्राप्तीनंतर निरनिराळ्या लोकांना त्यांच्या योग्यते

प्रमाणे बक्षिसे व देणग्या देऊन त्यांचे कौतुक केले. शेवटी शिदनाकाचे नाव पुकारण्या आले. शाहू महाराजांनी त्यास सरदारकीचे वस्त्र अलंकार दिले. त्याच्या मस्तकी शिरपेच चढवला आणि बहुमानाचे मानचिन्ह म्हणून त्याला बसण्यास पालखी दिली आणि इनाम म्हणून सांगली जिल्ह्यातील (पूर्वीचा सातारा जिल्हा) तासगाव तालुक्यातील 'कळंबी' हे गाव दिले व तसे दरबारातही जाहीर केले.''[३]

''शिदनाकाने आपल्या पराक्रमाच्या जोरावर कळंबी हे गाव इनाम म्हणून मिळविले होते. हा अनेक वर्षे इनामदार म्हणून कळंबीमध्ये होता. याच्या मृत्यूनंतर कळंबी गावचा इनामदार शिदनाकाचाच वारसदार 'राजनाक सिदनाक' हा आहे.''[४] अशा प्रकारे महाराने आपल्या तलवारीचे पाणी मोगलांना पाजून एक प्रकारची दहशत निर्माण केली होतीच; परंतु महार ही जात मुळातच इमानदार व कोणावरही अन्याय न करणारी होती. सत्यासाठी महारांनी आपल्या जीवाचे बलिदान दिले; परंतु ते कोणाच्याही आमिषाला बळी पडले नाहीत. ताराबाई शाहूपूर्वी शासक असूनसुद्धा शासक आहे म्हणून ताराबाईची बाजू न घेता खऱ्या वारसदाराची बाजू घेऊन शिदनाक व त्याचे सर्व महार सैनिक खंबीरपणे शाहूच्या बाजूने उभे राहून ताराबाईस शाहूचे वर्चस्व मान्य करण्यास भाग पाडले. महारांच्या या निःस्वार्थ धोरणामुळेच शिदनाकास कळंबी हे गाव इनाम म्हणून मिळाले व एक महार इनामदार झाला.

### ४.३ तुकनाक महार

भारत हा कच्चा माल व बाजारपेठ याबाबीसाठी प्रसिद्ध होता. यामुळे अनेक युरोपीयन देश भारतामध्ये व्यापार करण्यासाठी व भारतातील वस्तू आपल्या देशात नेण्यासाठी येत होते. ज्यात तुर्कस्थान, डच, पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्रज इ.चा समावेश होता. या युरोपीय सत्तांपैकी सर्वात अगोदर भारतात पोर्तुगीज आले व सर्वात शेवटी पोर्तुगीजांनीच भारत सोडला. इ.स. १५१० मध्ये पोर्तुगीजांनी पहिली वसाहत गोवा या ठिकाणी स्थापन केली. यानंतर त्यांनी आपली सत्ता दीव आणि दमण बेटापर्यंत प्रस्थापित केली. संभाजी महाराजांनी अनेक स्वाऱ्या करून

पोर्तुगीजांना सळो की पळो करून सोडले होते; परंतु मोगल मराठा, स्वातंत्र्य लढ्यामुळे त्यांना आपला प्रभाव वाढविण्याची संधी मिळाली. बाजीरावाने आपल्या कारकिर्दत पोर्तुगिजाविरुद्ध मोहिम सुरू केली. मराठा पोर्तुगीज संघर्ष सन १७३० ते १७३९ पर्यंत चालू राहिला. पोर्तुगीज देखील सिद्दीप्रमाणे आपल्या प्रदेशातील लोकांवर धार्मिक व आर्थिक अत्याचार करत होते. साष्टी, वसई, मुंबई, गोवा येथे पोर्तुगीजांची सत्ता होती.

"भारतीय पोर्तुगीजावर खालील बाबतीत नाराज होते. १) हिंदूची मंदिरे पाडून चर्च बांधणे. २) सक्तीने हिंदूंना ख्रिश्चन धर्माची दिक्षा देणे, ३) हिंदूच्या धार्मिक परंपरा रुढींना बंदी घालणे व ख्रिश्चन मिशनऱ्याकडून हिंदू धर्मावर होणारी टिका. ४) हिंदूवर पोर्तुगीजांकडून होणारे अन्याय व अत्याचार. इ."[५] बाजीरावाने कृष्णाजी महादेव व पिलाजी जाधवला मोठी फौज देऊन पोर्तुगीजावर पाठविले. त्यांनी इ.स. १७३१ मध्ये कॅम्बे येथे पोर्तुगीजांचा पराभव केला. यामुळे उभयंतामध्ये मैत्रीचा तह झाला. पुढील सहा वर्षे दोघांत संघर्ष झाला नाही.

"सन १७३७ मध्ये पोर्तुगीज - मराठा संघर्षास पुन्हा प्रारंभ झाला. त्यासाठी पुढील घडामोडी कारणीभूत ठरल्या. इ.स. १७३२ मध्ये सँडोमील या नवीन गव्हर्नरची नियुक्ती गोव्यात झाली. तो आक्रमक वृत्तीचा असल्याने त्याने मराठा विरोधी भूमिका घेतली आणि हिंदू प्रजेचा छळ सुरू केला. १७३४ साली ठाणे येथे नवीन किल्ल्याचे बांधकामही त्याने सुरू केले. पोर्तुगीजांशी सलोख्याचे संबंध ठेवून मराठ्यांचा व्यापार वाढविण्याच्या हेतूने बाजीरावने साष्टी येथे वखार बांधण्याची परवानगी मागीतली. तशी परवानगीही मिळाली. मात्र वखारीची जागा साष्टीच्या सेनापतीने निवडावी असे ठरविले गेले; परंतु साष्टीचा सेनापती याच वेळी पोर्तुगालला निघून गेल्यामुळे वखारीसाठीची जागा निवडण्याचे काम पोर्तुगीज गव्हर्नरचा पुतण्या लुई बोटेल्हो याच्याकडे आले. हा तापट आणि रागीट स्वभावाचा होता. मराठ्यांबद्दल त्याच्या मनात द्वेषाची भावना होती. बाजीराव पहिल्याचा वकिल व्यंकोजी जोशी हा वखारीची जागा ठरविण्यासाठी गोव्याला गेला. तेव्हा लुई बोटेल्हो याने त्यांना अपमानास्पद वागणूक दिली. वखारीसाठी जागा

देण्याचे त्याने नाकारलेच आणि वकिलाच्या समक्ष त्याने बाजीराव पहिल्याला निग्रो म्हणून शिवी दिली. हा वृत्तांत ऐकून बाजीराव संतप्त झाला. त्याने पोर्तुगीजांचा सुड घेण्याचे ठरविले. स्वारीची तयारी बाजीरावने अतिशय गुप्तपणे केली. यावेळी पुण्याला भवानी मातेचा उत्सव होता. यामुळे लढाईची तयारी होत आहे असा संशय ही कोणाला आला नाही. शंकराजीपंत यांची सेनापती म्हणून निवड करण्यात आली. वसईच्या स्वारीचा प्रमुख म्हणून गंगाजी नाईक आणि साष्टीच्या स्वारीचा प्रमुख म्हणून खंडोजी मानकर यांची नेमणूक करण्यात आली. अंताजी रघुनाथ व रामचंद्र जोशी यांना काही सैन्य घेऊन ठाण्याच्या किल्ल्याच्या दिशेने अगोदरच पाठविण्यात आले होते. त्यांनी ६ एप्रिल १७३७ रोजी ठाण्याच्या किल्ल्यावर अचानक हल्ला चढविला. पोर्तुगीजांनी मराठ्यांशी तीव्र लढा दिला; परंतु त्यांचा काहीही उपोयग झाला नाही. किल्ला सहजपणे मराठ्यांच्या हातात आला. यानंतर चिमाजी अप्पाने काही सरदारांना घेऊन साष्टी, धारावी व अर्नाळा ही ठिकाणे जिंकून घेतली. यानंतर मराठ्यांनी वसई जिंकण्याचा निश्चय करून ते त्या दिशेने निघाले. चिमाजी अप्पाने शंकराजीपंत आणि गंगाजी नाईक यांना वसईच्या किल्यावर देखरेख ठेवण्याकरीता नेमले आणि तो स्वतः १ जुलै १७३७ रोजी पुण्याला परत आला. या दोघांनी वसई किल्ल्याच्या भिंतीवर चढून किल्ला ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांना यश आले नाही. यावेळी बाजीराव उत्तर हिंदुस्थानच्या स्वारीवर निघून गेला. बाजीरावाने उत्तरेकडील मोहीम संपुष्टात आणून तो परत दक्षिणेत आला. परत बाजीरावाने आपले लक्ष पोर्तुगीजाकडे वळविले. नोव्हेंबर १७३८ मध्ये बाजीरावाने पोर्तुगीजाविरुद्धच्या मोहीमेस प्रारंभ केला. वसई मोहीमेचा प्रमुख सेनापती म्हणून चिमाजी अप्पाची नेमणूक करण्यात आली. याशिवाय या मोहीमेत मानाजी आंग्रे, मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे यांचा समावेश होता. व्यंकटराव घोरपडे यांने याचवेळी गोव्यावर स्वारी करून फार मोठा प्रदेश बेचिराख केला व मडगाव जिंकले. चिमाजी अप्पाने मोठे शौर्य गाजवून पोर्तुगीजांशी निकराची झुंज दिली आणि वसईचा किल्ला जिंकून मोठे यश मिळविले.''[६] याच वसईच्या मोहिमेत सेनापती चिमाजी अप्पा

बरोबर पोर्तुगीजांच्या विरुद्ध महार देखील लढले होते. ''१७३९ च्या वसई लढाईत तुकनाक नावाच्या शूर महाराने आपल्या पराक्रमाच्या बळावर 'मांडवी' येथील मोर्चा चांगल्या रितीने लढविला व पोर्तुगीजांचा पराभव करून 'वसईचा किल्ला' चिमाजी अप्पास जिंकून दिला. या नामांकित लढवय्याला त्याच्या या पराक्रमाबद्दल कंठी, कडी व तोडे अशी मोठी बक्षिसे देऊन पेशव्यांनी त्याचा मोठा गौरव केला.''७

''याच वसईच्या मोहिमेत उत्तम पोहणारे पेटेकरी महार होते. त्यांनी वसईच्या वेढ्याच्या वेळी माणसे, पत्रे आणि युद्ध सामुग्री इत्यादी सामान पाण्यामधून युद्धाच्य ठिकाणी पोहोचविण्याचे मोठे अवघड काम केले होते. त्या पराक्रमी व धाडसी महारात सिता महार, फकिरा महार, बिरा महार, याण महार व हंसा महार यांचा समावेश होता.''८

मोंगलाप्रमाणेच महार सैनिकांनी पोर्तुगीजांना देखील त्यांची जागा दाखवून देण्याचे काम केले होते. आपला जीव धोक्यात घालून पाण्यामधून सैनिकांना लागणारे सामान देखील महारांनी वाहून नेण्याचे काम केले. म्हणजेच ज्या-ज्या ठिकाणी जिवावर बेतण्याची वेळ येईल त्या-त्या वेळी महारांनी पराक्रमाची शर्थ करुन मराठा सत्ता मजबूत करण्याचा प्रयत्न केल्याचे वरील हकिकती वरून दिसून येते.

### ४.४ खंडनाक महार

केदारजी केसकर यांनी मल्हार खंडेराव चिटणीस यांना इ. स. १७५२ रोजी पत्र पाठवून शिराळे गुमट येथे झालेल्या लढाईचा वृत्तांत दिला आहे. या पत्रामध्ये तो लिहीतो की, आपल्या कडील बरेच लोक जखमी व ठार झाले आहेत. या लढाईमध्ये महार सैनिक गोळी लागून जखमी झाले होते, याचा उल्लेख सदरील पत्रात करण्यात आला आहे. यासाठी खालील पूरावा महत्वपूर्ण ठरतो.

''राजश्री मल्हार खंडेराव चिटणिस

गोसावि यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य --- श्ने ।। केदारजी केसरकर अजाहत सरदेशमुख रामराम विनंति यैसीजे. इकडील वर्तमान तरी मंगलवारी त्रितीये प्रहरी सिराले गुमट येथे हाला जाहाली. आम्हास निराली यक बाजू दिल्ही तेव्हा चालोन घेतले. हाती नेऊन गावकुसास लाविला ++ निबांजी भोसला ठार जाला. केरोजी नाईक प्यादा चाकरास गोली मांडीवर लागली. चिमाजी शामजी यास थानावरी गोली लागली. तिघे तेथेच पडिले. फार मार जाला. मुर्दे निघेनात यैसे जाले. तेव्हा लाहाने व खंडनाक याणी जोरावारीने चिमाजीस घेऊन आलो. चिमाजीची गोली पाठीवर कापून काढली. जिवंत आहेत. निंबाजी भोसला व केरोजी नाईक जागाच राहिले. हातीच्या माहातास हातावर गोली लागली. निशन बारदार यास गालावर भाला लागला व हातीस तीन च्यार भाले लागले व तरवारेच्या जखमा व गोलीच्य जखमा यैशा दाहाबारा जखमा लागल्या. संताजी व माहार प्यादे तिघे यासी गोलीच्या जखमा लागल्या. नामाजी नाईक यास धोंडा लागला व सिंग्यास तीर लागला. लक्ष्मुण रुद्र याच्या मुंडशास गोली लागली, मोंडासियाचे टुकडे जाले. वरकड लोकास धोंडा गुंडा बहुत लागला. च्यार घटका मार सोसून कुसासी लागले. सारे लस्करानी तमासा पाहिला. ते काही पत्री लिहिता पुरवत नाही. बहुतेक लोक आम्हाकडील जाया जाले ते लोक माघारे पाठवावे लागतील. याकरिता वेठे पाहिजेत. तर वेठे सुमार ५० (पनास) पाठविणे व लोकांनी काम काय केलियासी काही द्यावे लागते तरी राजश्रीस अर्ज करुन काही यैवज मागून घेणे ही विनंती.''[१]

### ४.५ माणिक महार

शिवकालखंडापासून निजाम आणि मराठे यांच्यात शत्रुत्वाचे संबंध होते. पेशवे काळात या शत्रुत्वाने रौद्र रूप घेतल्याचे दिसून येते. पेशव्यांनी निजामाच्या प्रदेशावर हल्ले करून निजामास पराभूत केले होते. निजामाने तह करून पेशव्यांना खंडणी देण्याचे मान्य केले होते; परंतु नंतर निजामानी पेशव्यांना खंडणी देणे बंद केले. याच वेळी निजामाच्या राज्यात अंतर्गत गोंधळाला प्रारंभ झाला. याचा फायदा पेशव्यांनी घेण्याचे ठरवले. ''निजामाच्या राज्यातील

गोंधळाचा फायदा घेऊन मराठ्यांनी अहमदनगर, दौलताबाद, बऱ्हाणपूर आणि विजापूर ही ठिकाणे जिंकून घेतले. यामुळे उभय पक्षात पुन्हा युद्ध भडकले. यावेळी पेशव्यांच्या सैन्याचे नेतृत्व सदाशिवरावभाऊ व विश्वासराव यांनी केले. २६ जानेवारी १७६० रोजी सदाशिवराव व विश्वासराव यांनी निजामाच्या राज्यात प्रवेश केला. बिदरपासून काही मैलावर असणाऱ्या उदगीर या ठिकाणी दोघांमध्ये निकराची लढाई झाली. यावेळी सदाशिवराव भाऊ बरोबर इब्राहिमखान गारदयाचा तोफखाना होता. त्यामुळे उदगीरच्या लढाईत निजामाच्या सैन्याचा पुरता धुव्वा उडाला.''[१०] या वेळी निजामअली हा पुरता संकटात सापडला होता. उदगीरच्या लढाईत निजामअलीस पेशव्याच्या सैन्याने घेरले होते. ''निजामअली वरील प्रकारच्या संकटात सापडला असताना माणिक महाराने निजामअलीस रणांगणातून उचलून खांद्यावर घेतले व त्यास एका चोर वाटेने गोदावरी नदी ओलांडून राक्षसभुवन येथे सुरक्षित आणले. त्यामुळेच निजामअली वाचू शकला. निजामाने माणिक महाराच्या कामगिरीवर खूश होऊन त्यास मोठे बक्षीस दिले व त्याचा गौरव केला. परंतु हाच माणिक महार ही चोरवाट आपल्या शत्रूला दाखवील असे वाटल्यामुळे निजामअलीने त्यास ठार केले. माणिक महाराने निजामअलिस उदगीरहून ज्या मार्गाने राक्षसभुवन येथे आणले तो मार्ग आजही माणिक दंड यानावाने ओळखला जातो.''[११]

वरील घटने वरून महाराच्या पराक्रमाची व धाडसाची प्रचीती येते. मालक कोणत्याही जातीचा अथवा धर्माचा असो त्याच्या प्रती जीवजाईपर्यंत इमानदारीने काम करणे ही महारांची जीवनशैली होती. पेशव्यांच्या सैन्याने निजामअलीस पूर्णपणे घेरले होते. यातून निजामअलीची सुटका होणे अशक्य गोष्ट होती; परंतु माणिक महाराने आपला जीव धोक्यात घालून निजाम अलिस मृत्यूच्या दाढेमधून सहिसलामत बाहेर काढले होते; परंतु निजामअलीने या बाबीचा विचार न करता माणिक महारास ठार केले होते. जर माणिक महारास शत्रूला मदत करण्याची इच्छा असती तर तो निजामअलीस स्वत:च्या खांद्यावर घेऊन न जाता कदाचीत रस्त्यामध्येच ठार मारुन पेशव्याकडून मोठे बक्षीस व शाब्बासकी मिळवली असती; परंतु महार हे मालकाची

सेवाचाकरी प्रामाणिकपणे करीत असत. यामुळे माणिक महार निजामाच्या शत्रूला चोरवाट दाखविणे शक्य नव्हते. या वरून एक बाब स्पष्ट होते की राज्यकर्ते लोक स्वत:चा जीव व स्वत:चे साम्राज्य आबादीत ठेवण्यासाठी कुठल्याही थराला जाऊ शकतात.

### ४.६ कोंडनाक महार

अरबी समुद्र किनाऱ्यावर असलेले बेट गंजिराचा अपभ्रंश होऊन जंजिरा या नावाने ओळखले जाते. या बेटावर इस्लाम धर्मीय सिद्दी सरदाराची सत्ता होती. सिद्दी हे मूळ आफ्रिकेतील ॲबिसिनिया या देशाचे रहिवाशी होते. भारतात ज्यावेळी अनेक पाश्चात्यांनी प्रवेश केला होता त्याच वेळी हे देखील भारतात आले होते. यांनी आपल्या वसाहती पश्चिम किनाऱ्यावर स्थापन केल्या होत्या. पाश्चिमात्या बरोबरच सिद्दीचे देखील समुद्रावर वर्चस्व मोठ्या प्रमाणावर होते. सिद्दीचे जमिनीवरील प्रमुख ठाणे दंडराजापुरी हे होते. मुंबईच्या दक्षिणेस ५० मैलावर राजापुरी खाडीच्या तोंडाशी असलेला 'जंजिरा' हा किल्ला सिद्दीच्या ताब्यात होता. जंजिरा हा किल्ला अभेद्य समजला जात होता. यावेळी सिद्दी उत्तर कोकणामध्ये आपले वर्चस्व निर्माण करण्याच्या प्रयत्नात होता. यामुळे छत्रपती शिवाजी महाराज आणि सिद्दी यांच्यात संघर्ष होणे अपरिहार्य होते. इ. स. १६५७-५८ या काळात उत्तर कोकणावर आदिलशाहीची सत्तास्थापन झाली आणि सिद्दीने तिचे उत्तर कोकणावरील वर्चस्व मान्य केले. याच कालखंडामध्ये छत्रपती शिवाजी महाराजांनी उत्तर कोकणच्या भागावर हल्ला चढवला. याचवेळी छत्रपती शिवाजी महाराजांना जाणीव झाली की, कोकणच्या प्रदेशाला सिद्दीचाच खरा धोका आहे. म्हणून महाराजांनी सिद्दीच्या ताब्यातील जंजिरा व दंडराजापुरी हे दोन ठिकाणे जिंकून घेण्याचा ठाम निश्चय केला.

उत्तर कोकणातील प्रसिद्धीस आलेल्या बाजारपेठापैकी कल्याण व भिवंडी ही शहरे होती. पश्चिम घाटमय प्रदेशानंतरचा हा सखल व आर्थिक दृष्टिने अतिशय समृद्ध प्रदेश होता. भारतातील विविध राज्यातून चालणारा व्यापार या मार्गानेही चालत असे. शिवाजी महाराज

या प्रदेशाचे महत्व ओळखून होते. छत्रपती शिवाजी महारांनी १६५७ ते ५९ या काळात वरील प्रदेशावर हल्ले करून ते प्रदेश आपल्या ताब्यात घेतले. महाराजांनी कल्याण व भिवंडी जिंकल्या नंतर त्यांच्या सिद्दीशी चकमकी होऊ लागल्या. या वेळी सिद्दीचे सैन्य छत्रपती शिवाजी महाराजांच्या सैन्याबरोबर जमीनिवर लढण्यास सक्षम नव्हते. म्हणून सिद्दीचा प्रमुख फत्तेखान हा महाराजांच्या अडचणीच्या वेळी त्यांच्या प्रदेशावर लपून-छपून हल्ले करत होता. यास प्रत्युत्तर देण्यासाठी महाराजांनी बाजी पासलकर या सेनापतीस सिद्दीचा पराभव करण्यासाठी रवाना केले. याच बाजी पासलकराने आपला पराक्रम दाखवून सिद्दीचा पराभव केला. ''याच बाजी पासलकराचे अंगरक्षक म्हणून खंड्या महार व येल्या मांग हे दोन पराक्रमी शिपाई होते.''[१२] छत्रपती शिवाजी महाराजांनी इ. स. १६५९ रोजी रघुनाथ बल्लाळ यांना सात हजार सैन्य देऊन सिद्दीविरुद्ध पाठवीले. परंतु याच काळामध्ये रघुनाथ बल्लाळांचा मृत्यू झाला. म्हणून त्याच्या जागी व्यंकोजी दत्तो यांची नेमणूक करण्यात आली. मराठे आणि सिद्दी यांच्यात झालेल्या जमिनीवरील संघर्षात सिद्दीचा पराभव झाला; परंतु मराठ्यांना जंजिरा किल्ला सर करता आला नाही. सिद्दीचा मराठ्यांकडून पराभव झाल्यामुळे सिद्दीने आपला प्रमुख ठाणे असलेला दंडराजापुरीचा भाग शिवाजी महाराजांना देऊन तात्पुरती तडजोड घडवून आणली. शिवाजी महाराजांचे अंतिमध्येय जंजिरा हा अभेद्य किल्ला जिंकणे हे होते. म्हणून त्यांनी हा किल्ला जिंकण्याचे ध्येय सोडले नाही. छत्रपती शिवाजी महाराजांनी शेवटपर्यंत म्हणजे १६६० ते १६७६ पर्यंत जंजिरा किल्ला हस्तगत करण्यासाठी सिद्दीविरुद्ध अनेक लष्करी मोहिमा काढल्या; परंतु महाराजांना जंजिरा किल्ला शेवटपर्यंत जिंकण्यात यश आले नाही.

''छत्रपती शिवाजी महाराजांच्या नंतर पहिल्या बाजीराव पेशव्याने साम्राज्य विस्ताराचे धोरण अंगीकारले होते. यामुळे परत मराठ्यांचा सिद्दीशी संघर्ष होणे अटळ बनले होते. चिपळून जवळ|'पेढ' नामक एक गाव होते. त्या गावामध्ये जुन्या काळातील एक परशुरामाचे मंदिर होते. या मंदिरात ब्रह्मेंद्रस्वामी राहत होते. ब्रह्मेंद्रस्वामींनी चिपळूनजवळच परशुरामाचे एक नविन मंदिर

उभारले. पेशवा बाळाजी विश्वनाथ हे चिपळून स्थित ब्रह्मेंद्रस्वामीस आपले गुरू मानत होते. या स्वामींचा कोकणातील सर्व सत्ताधिशांना आदर वाटत होता; परंतु अंजनदेलचा सुभेदार सिद्दी सात यास ब्रह्मेंद्रस्वामी यांच्याबद्दल आदर नव्हत. म्हणून त्यांने ब्रह्मेंद्रस्वामी यांनी बांधलेले परशुरामाचे मंदिर इ.स. १७२७ मध्ये उध्वस्त केले. सिद्दी सातच्या या कृत्यामुळे सारा महाराष्ट्र त्याच्या विरोधात खवळून उठला. याबरोबरच स्वामीनी सुध्दा मराठ्यांना विनंती केली की त्यांनी सिद्दीचा बंदोबस्त करण्यासाठी त्याच्याशी युद्ध करावे. स्वामीच्या या विनंतीस मान देऊन पहिल्या बाजीरावाने सिद्दी सात याचा पराभव करण्याचे निश्चित केले. प्रथम पिलाजी जाधव व प्रतिनिधी या दोघांना मोठी फौज देऊन सिद्दीच्या विरुद्ध पाठवीले; परंतु या दोघांना सिद्दीचा पराभव करता आला नाही. यामुळे पहिल्या बाजीरावाने यांना परत बोलावले. नंतर बाजीराव व फत्तेसिंग यांनी एप्रिल १७३३ मध्ये कोकणावर स्वारी केली. उभयतांमध्ये मोठा संघर्ष झाला. दंडराजापुरी या सिद्दीच्या प्रमुख ठाण्यामध्येच त्याचा पराभव झाला. म्हणून सिद्दी राजपुत्र जंजिऱ्याच्या किल्ल्यात आश्रयास गेला. या विजयानंतर पेशवे बाजीराव व मानाजी आंग्रे यांनी जंजिरा किल्ला जिंकण्याचा आटोकाट प्रयत्न केला; परंतु याचवेळी इंग्रज सिद्दीच्या मदतीस धावून आले, यामुळे मराठे हतबल झाले. शेवटी डिसेंबर १७३३ मध्ये पेशवा बाजीरावाने सिद्दीशी अलिबागचा तह करून तडजोड केली. हा तह झाल्यानंतरही सिद्दीने मराठ्यांच्या प्रदेशावर हल्ले करने सुरूच ठेवले होते, म्हणून छत्रपती शाहू महाराजांनी सिद्दी सात याचा पुरता बंदोबस्त करण्यासाठी सेनापती चिमाजी अप्पा यांना कोकणात पाठवीले.''[१३] चिमाजी अप्पा ससैन्य कोकणावर चाल करून गेला. उभयंतात रेवस जवळ 'शराई' या ठिकाणी युद्ध झाले. या युद्धात चिमाजी अप्पाने सिद्दी सातचा पराभव करून त्यास ठार मारले.

''जंजिऱ्याच्या या मोहिमेत कोंडनाक महार हा सिद्दी सात याच्या बाजुने म्हणजेच मराठ्यांच्या विरोधात लढत होता.''[१४]

उदगीरची लढाई व जंजिरा मोहिमेमध्ये माणिक महार व कोंडनाक महार हे दोघेही

महाराष्ट्राच्या भूमितील होते; परंतु वरील रणसंग्रामामध्ये त्यांनी मराठ्यांना मदत न करता मराठ्यांच्या शत्रूंना मदत केल्याचे दिसून येते. वरील संघर्षाचा कालखंड हा छत्रपती शाहू महाराज यांच्या काळातील आहे. शाहू महाराज स्वत: छत्रपती होते; परंतु त्यांनी आपल्या काळात म्हणजे १७१३ मध्ये 'पेशवे' पद निर्माण केले होते. पेशवा हा ब्राह्मण जातीमधला होता. याकाळात अस्पृश्यता मोठ्या प्रमाणावर पाळली जात होती. वर्णव्यवस्थेने याकालखंडामध्ये रौद्र रूप धारण केले होते. शाहू महाराज छत्रपती असले तरी त्यांच्यापेक्षा पेशवे स्वत:ला श्रेष्ठ मानत असत. यांनी अस्पृश्य जातींना मोठ्या प्रमाणावर छळल्याची अनेक उदाहरणे इतिहासात आहेत. शिवाजी महाराजांनी ज्याप्रमाणे १८ पगडजातींच्या लोकांना सोबत घेऊन स्वराज्याची स्थापना केली होती तशी स्थिती पेशवाईमध्ये आपणास दिसत नाही. म्हणून जे दुखावलेले महार होते, त्यांनी आपला उदरनिर्वाह करण्यासाठी पेशव्यांना सोडून ते त्यांच्या शत्रूला जाऊन मिळाले असतील. याठिकाणी महारांचा दोष नसून महारांना असे वागण्यास या ठिकाणची समाजव्यवस्था करणीभूत असल्याचे दिसून येते.

### ४.७ दुसरा शिदनाक महार

मराठे आणि हैद्राबादचा निजाम यांच्यात अनेक वर्षापासूनचे पारंपरिक वैर होते; परंतु पेशवा माधवरावाच्या कारकिर्दीमध्ये निजाम व पेशवे यांच्यात सख्य निर्माण झाले होते. जवळ-जवळ ३० वर्ष उभयंतात शांततापूर्ण वातावरण होते. निजामाकडे बऱ्याच वर्षापासून मराठ्यांची चौथाई व सरदेशमुखीची रक्कम थकीत होती. ही रक्कम तीन ते साडेतीन कोटीपर्यंत होती. या थकीत रक्कमेची मागणी पेशवा सवाई माधवराव याच्या काळात निजामाकडे करण्यात आली. ही रक्क्म देण्याच्या मनस्थितीत निजाम नव्हता. म्हणून तो रक्कम देण्याबाबत टाळाटाळ करत होता. यावेळी निजामाचा दिवान मुशीर-उल-मुल्क हा होता. याच वेळी सवाई माधवरावाचा कारभारी नाना फडणवीस होता. मुशीर-उल-मुल्क हा मराठे व नाना फडणीसांचा कट्टर द्वेष्टा होता. निजामाचा दिवान दरबारामध्ये नाना फडणवीसाच्या नकला करून दरबारातील लोकांना

हासवत असे. ही बाब नाना फडणवीसास कळल्यानंतर त्याने ही बाब बंद करण्याचा सल्ला निजामास दिला. जेव्हा मराठ्यांनी निजामाकडील थकबाकीची मागणी केली तेव्हा "निजामाचा दिवान मुशिर-उल-मुल्कने निजामास सल्ला दिला की, तीन कोटी रुपये चौथाईचे आणि तीस लक्ष उत्पन्नाचा प्रदेश मराठ्यांना देण्यापेक्षा तोच पैसा फौजेवर खर्च करून एक वेळ मराठ्यांशी सामना करून नशीब आजमावून पहावे. ही गोष्ट निजामाअलीस पटली. दि. २३ एप्रिल १७९३ रोजी बेदरास कायम ठाणे देऊन तेथे त्याने रेमंडच्या सल्ल्याने लष्कराची तयारी झपाट्याने चालविली."[१५]

निजाम मराठ्यांच्या विरोधात युद्धाची तयारी करत आहे व तो मराठ्यांशी लढण्यासाठी प्रचंड फौज घेऊन बेदरमध्ये तळठोकून बसल्याची माहिती पेशव्यांना कळाली. यामुळे पेशव्याने सुद्धा निजामाचा पुरता बंदोबस्त करण्यासाठी जय्यत तयारी सुरू केली. यावेळी अनेक मातबर मराठा सरदार आपापली फौज घेऊन पेशवा सवाई माधवरावाच्या फौजेत सामील झाले. "यामध्ये फत्तेसिंग गायकवाड, फत्तेसिंग भोसले, रघोजी भोसले, दौलतराव शिंदे, तुकोजी होळकर, जोत्याजी जाधव, खंडेराव जाधव, हणमंतराव जाधव, जानराव नाईक निंबाळकर, परशुराम भाऊ पटवर्धन, रघुनाथराव पटवर्धन, चिंतामणराव पटवर्धन, निळकंठराव रामचंद्र, पोवार नगरदेवळेकर, विंचुरकर, धारकर, मलठणकर, भास्कर जगन्नाथ, बाबुराव अनंत, अवधुतराव यशवंत, राजेबहादुर, बाळासाहेब मिरजकर पटवर्धन, रंगराव ओढेकर, पंत प्रतिनिधी, पंत सचिव, बहिरो अनंत, पानशे, पुरंदरे यांचा त्यामध्ये समावेश होता."[१६] याच प्रसंगी शिदनाक महार देखील आपले लष्करी पथक घेऊन पेशव्यांना मदत करण्यासाठी पेशव्यांच्या सैन्यात सामील झाला होता. सातारा जिल्ह्यात तासगाव तालुक्यामध्ये कळंबी हे एक गाव आहे. या गावाचा वतनदार शिदनाक महार होता. याच शिदनाक महाराचा आजोबा शिदनाक नावाचाच होता. मराठ्याच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या काळात त्याने मोगलांशी लढून मराठा राज्याचे रक्षण केले होते. पुढे संभाजी पुत्र शाहू हे मोगलांच्या कैदेतून सुटून स्वराज्यात आले तेव्हा महाराष्ट्रात

ताराबाईची सत्ता होती. यावेळी शाहूला गादीवर बसवण्यासाठी अंतर्गत यादवीला सुरूवात झाली होती. तेव्हा ताराबाईने शाहू विरुद्ध आपले सेनापती रवाना केले होते. यावेळी अनेक मराठा सरदार शाहूच्या बाजूने उभे होते. यातच हा शिदनाक देखील आपली फौज घेऊन शाहू महाराजांच्या पाठीमागे खंबीरपणे उभा राहिला. शेवटी शाहू महाराजांची सरशी झाली. त्यावेळी शाहू महाराज छत्रपती म्हणून मान्यता पावले. शाहू महाराज मराठा सम्राज्याचे छत्रपती झाल्यानंतर त्यांनी आपल्याला छत्रपती पदापर्यंत नेण्यासाठी ज्यांनी ज्यांनी मदत केली त्यांना-त्यांना त्यांच्या कामगिरीनूसार व योग्यतेनूसार देणग्या दिल्या. याच वेळी जो शिदनाक महार छत्रपतीच्या मदतीस धावून आला होता त्याला 'कळंबी' हे गाव इनाम म्हणून देण्यात आले होते. याच शिदनाक महाराचा नातू शिदनाक नावाचाच होता. याने ११ मार्च १७९५ मध्ये मराठे व निजाम यांच्यात झालेल्या खर्ड्याच्या लढाईत आपल्या लष्करी पथकासह मराठ्यांच्या बाजूने युद्धात भाग घेतला आणि मोठा पराक्रम गाजविला. ७ मार्च १७९५ मध्ये मराठे व निजाम या दोन्ही फौजात लहानशी चकमक उडाली. त्यात निजामाची सरशी झाली; परंतु ११ मार्च १७९५ मध्ये दोन्ही फौजात भीषण युद्ध झाले. या संघर्षात मराठ्यांनी निजामांचा मोठा दणदणीत पराभव केला. या युद्धात शिदनाक महार व त्याच्या फौजेने मोगलाप्रमाणेच निजामाच्या सैन्याला देखील आपल्या तलवारीचे पाणी पाजले. यासाठी खालील पुरावा महत्वपूर्ण ठरतो.

''खर्ड्याच्या मैदानावर जेव्हा मराठ्यांच्या फौजेचा तळ पडला. तेव्हा सरदार आपापल्या लोकांसह मिसली (मानाचा हक्क) प्रमाणे उतरले. शिदनाकच्या गोटाच्या आसपास दुसऱ्या ब्राह्मण व मराठा सरदारांचे गोट होते. पेशवाईत सोवळ्या-ओवळ्याचा विचार बराच फाजील वाढत चालला होता, त्यामुळे कित्येकांनी सवाई माधवराव कचेरीच्या डेऱ्यात बसले असता विनंती केली की, महारांचा गोट मध्येच आहे. तो बाजूस काढावा. पेशव्यांनी विनंती ऐकून आपल्या बाजूस बसलेल्या हिरोजी पाटणकर नावाच्या वयोवृद्ध सरदाराकडे पाहिले. तेव्हा तो मराठा सरदार बोलली की, ही काही जेवणाची पंगत नव्हे, म्हणून मध्येच महाराचा गोट

असल्यास हरकत नाही. ही तरवार धरणाऱ्या शूरांची पंगत आहे. येथे जातीचा विचार नाही. 'ज्याची तलवार खंबीर तो हंबीर' पाटणकराचे बोलणे ऐकूण पेशव्यांनी मान डोलावली.

पुढे लढाईचे दिवशी सरदार लोक पेशव्यास मुजरे करून लढाईस चालले. तेव्हा शिदनाक ही मुजऱ्यास आला. मुजरा करून हात जोडून पेशव्यास म्हणाला ''महाराज मी शिदनाक महार आहे. मी महार म्हणून काही लोक माझा तिरस्कार करीत आहेत. आज आपल्या पायाचा दास कामगिरी कशी करितो ती पहावी असे म्हणून निघून गेला. पुढे लढाई चालू झाली. परशुराम भाऊवर पठाणांनी मोठी गर्दी करून भाऊस घोड्यावरून खाली आणिले. त्यावेळी मराठे व पठाण ह्यांची जी चकमक झाली तीत शिदनाकने अप्रतिम शौर्य दाखविले. त्याची पटवर्धन मंडळीने मोठी तारीफ केली. पेशवाई बुडाल्यावरही हा शिदनाक बरीच वर्षे होता.'[१७]

शिदनाकाने आपला झालेला अपमान विसरून आपणही शूर व पराक्रमी आहोत हे इतर सवर्णांना दाखवून देण्यासाठी देहभान विसरून विद्युत गतीने परशूरामभाऊ पटवर्धनावर पडलेल्या पठाणांच्या क्षणार्धात खांडोळ्या केल्या व परशुराम भाऊस सहिसलामत बाहेर काढले. येवढा मोठा पराक्रम गाजवून देखील ''शिदनाकास त्याच्या पराक्रमाच्या मोबदल्यास खास दरबारात केवळ एक सोन्याचा कडा देण्यात आला.''[१८]

दरबारात जरी शिदनाकास म्हणावा तसा मान पेशव्याकडून मिळाला नसला तरी पटवर्धन घराण्यामध्ये मात्र शिदनाकाबद्दल मोठा आदर निर्माण झाला होता. कारण परशुराम भाऊ पटवर्धन यांना मृत्युच्या दाढेमधून जीवंत बाहेर काढण्याचे काम शिदनाकाने आपला जीव धोक्यात घालून केले होते. शिदनाकामुळेच परशुराम भाऊ त्यांच्या कुटुंबात परत आला होता. अन्यथा पठाणांनी परशुरामभाऊचा कायमचा काटा काढला असता. शिदनाकाचे हे उपकार पटवर्धन कुटुंब कधीच विसरू शकले नाहीत. ''पेशवाई बुडाल्यानंतरही पटवर्धन मंडळींना पुढच्या काळात शिदनाकाची नेहमी आठवण यायची. कारण पेशवाई बुडाल्या नंतरही शिदनाक जिवंत होता. चिंतामणराव आप्पासाहेब पटवर्धन जे या खर्ड्याच्या लढाईत मराठ्यांच्या बाजूने

लढले होते. त्यांनी हा सर्व प्रकार स्वत:च्या डोळ्यांनी पाहिला असणारच. ते एक वेळ आजारी पडले. ही बातमी शिदनाकास कळताच तो त्यांना भेटण्यासाठी गेला. ही बातमी चिंतामणरावास कळताच त्यांनी सांगितले की, तो तरवार बहाद्दर आहे म्हणून त्यास इतमामानेच भेटले पाहिजे. त्या प्रमाणे भेट झाली. त्यावेळी पटवर्धनाने दरबार भरवून शिदनाकास वस्त्रालंकार देऊन, त्याचा सत्कार करण्यात आला. तसेच खर्ड्याच्या लढाईतील शिदनाकाच्या पराक्रमाचा वृत्तांत कथन करण्यात आला. त्यावेळी सारा दरबार भारावून शिदनाकाचे गोडवे गात होता.''[११]

वरील वृत्तांतावरून एक बाब प्रकर्षाने लक्षात येते ती ही की, पेशवाईच्या कालखंडामध्ये जातीवाद मोठ्या प्रमाणावर वाढला होता. प्रत्येक व्यक्ती हा गुणाने श्रेष्ठ नव्हता तर तो जातीने श्रेष्ठ होता. छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळात हे प्रमाण कमी असल्याचे जाणवते. मात्र पेशवाईच्या काळत पेशव्यांनी जातीवाद कमी करण्यासाठी कसल्याच प्रकारचे उपाय केल्याचे दिसून येत नाही. उलट या कालखंडातील इतिहास पाहिला असता जातीवाद मोठ्या प्रमाणावर बोकाळल्याचे दिसून येते. तरी महारांनी पेशव्यांना मदत केल्याचे दिसून येते; कारण पेशवे हे महाराष्ट्रातील सत्ताधिश होते. व महारांना आपल्या मातृभूमिचा मोठा अभिमान होता. म्हणूनच महारांना 'भूमिपुत्र' ह्या नावाने देखील ओळखले जाते. होता होईलतोपर्यंत महारांनी मूळ महाराष्ट्रीय सत्ताधिशांना मदत केल्याचे दिसते; परंतु उत्तर पेशवाईत या महारांवर खूपच धार्मिक बंधने लादल्यामुळे त्यांना नाविलाजास्तव परकिय सत्तांचा सहारा घ्यावा लागला. या मोबदल्यात परकियांनी त्यांच्या ताकदीचा व पराक्रमाचा फायदा आपली सत्ता मजबूत करण्यासाठी घेतल्याचे दिसून येते.

### ४.८ **रायनाक महार :**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळापासूनच मराठेशाहीत किल्ल्यांना फार महत्वाचे स्थान होते. किल्ला हा मराठेशाहीचा आत्मा मानला जात होता. कारण एका किल्ल्यामुळे परिसरातील जवळ-जवळ पन्नास मैलाच्या भागावर लक्ष केंद्रीत करून त्यावर ताबा ठेवता येत

होता. तसेच शिवाजी महाराजांच्या शासन काळाप्रमाणेच पुढे पेशवाईमध्ये देखील गनिमीकावा ही पद्धत सुरूच होती. या पद्धतीच्या युद्धामध्ये किल्ल्याची भूमिका फार महत्वाची होती. ज्या वेळी शत्रूची ताकद आपल्यापेक्षा जास्त आहे असे वाटे त्यावेळी किल्ल्याचा आधार फार मोठा होता. किल्ल्याच्या संरक्षणामुळे शत्रू पक्षाला चढाई करणे कठीण जात असे. कारण एक तर त्यांना किल्ल्याची पूर्ण माहिती नसे व किल्ल्यावरून मोठ्या प्रमाणात हल्ला करणे सोपे जात होते. म्हणून शत्रू सहसा किल्ल्याच्या जवळ येऊन मराठा सैन्यावर चाल करत नसत.

किल्ला हा महत्त्वपूर्ण घटक असल्यामुळे शिवकालखंडापासूनच किल्लेदार म्हणून अत्यंत विश्वासू मानसाचीच नेमणूक केली जात होती. अनेक किल्यापैकी रायगड हा किल्ला अत्यंत महत्त्वपूर्ण मानला जात होता. कारण या किल्ल्याची निर्मिती करते वेळीच तो अभेद्य राहील याची काळजी घेण्यात आली होती. हा किल्ला पूर्ण बांधल्यानंतर त्याचे सर्व दरवाजे बंद करून जो कोणी चोरवाटेने किल्ला सर करेल त्यास मोठे बक्षीस शिवाजी महाराजांनी जाहीर केले होते. हे बक्षीस पटकावण्याचे काम महारांनी केले होते हे आपण मागील प्रकरणात पाहिले आहे.

याच किल्ल्याबद्दलची दुसरी एक महत्त्वपूर्ण घटना अशी सांगता येईल की, छत्रपती संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रावर दु:खाची छाया पसरली होती. याच वेळी मराठ्यांचा मोगलांसोबत मोठा संघर्ष सुरू होता. ९ फेब्रुवारी १६८९ मध्ये राजारामास छत्रपती पदावर बसविण्यात आले होते. याचवेळी बादशहाने वजीर असदखानाचा पुत्र ईतिकदखान यास रायगडचा किल्ल हस्तगत करून राजारामास पकडून आणण्याचा आदेश दिला. या आदेशाची खानाने ताबडतोब अंमलबजावणी करून २५ मार्च १६८९ रोजी रायगडास वेढा घातला. यामुळे रायगडामधील लोक मोठ्या संकटात सापडले. यावेळी किल्ल्यातील सर्व मातबर एकत्र येऊन यावर उपाय शोधू लागले. या प्रसंगी मराठ्यांची स्थिती अत्यंत वाईट बनली होती. कारण तिजोरीत पैसा नव्हता, अनुभवी माणसे मरून गेली होती, मोगली फौजा मराठा राज्यात सर्वत्र

घुसून नंगा नाच करत होत्या. यामुळे शत्रूस उघड-उघड टक्कर देणे शक्य नव्हते. यामुळे येसूबाईनी सल्ला दिला की, सर्व सरदार मंडळीनी एक मनाने विचार करावा व राजारामांनी बायकोसहित किल्ल्याबाहेर पडावे. मला मुलाला घेऊन राहण्यासाठी रायगडाशिवाय दुसरी जागा नाही. त्यामुळे राजाराम ५ एप्रिल १६८९ ला रायगडावरून प्रतपगडावर गेले. इकडे रायगडास वेढा घालून आठ महिने झाले तरी किल्ला खानाला सर करता येत नव्हता. यावेळी खानाने कपट नितीचा वापर केला. सूर्याजी पिसाळ हा रायगड किल्ल्याच्या बचावासाठी होता. यास खानाने असे आमिष दाखवीले की, तू जर आम्हाला किल्ल्यात प्रवेश दिला तर त्या मोबदल्यात तुला वाईची देशमुखी देऊत. या खानाच्या आमिषाला सूर्याजी पिसाळ बळी पडला. त्यामुळे त्याने ३ मार्च १६८९ रोजी किल्ल्याचे दरवाजे उघडून मोगलांना आत प्रवेश दिला. यानंतर मोगलांनी रायगडचा पाडाव केला व येसुबाई, संभाजी महाराजांचा मुलगा शाहू व इतर त्यांच्या नातेवाईकांना मोगलांनी कैद केले. ही बाब पेशव्यांना चांगलीच माहिती होती म्हणून रायगड किल्ल्यावर अत्यंत विश्वासू व्यक्ती नेमणूकीवर असणे अत्यंत आवश्यक होते.

या काळात अत्यंत विश्वासू व जीव गेला तरी मालकाशी हरामखोरी कधीही न करणारी एकच जात होती ती म्हणजे महार होय. म्हणून महारांच्या शौर्याची कल्पना पेशवा बाजीराव दुसरा याला देखील होती. यावेळी मोठ्या प्रमाणावर अस्पृश्यता होती; परंतु महाराशिवाय पेशव्यांना विजय प्राप्त करणे किंवा स्वत:चे संरक्षण करणे शक्यत नव्हते. म्हणून पेशवा बाजीराव दुसरा याने 'रायनाक' या महाराची नेमणूक रायगड किल्याचा किल्लेदार म्हणून केली होती. ''पेशवा बाजीराव दुसऱ्याच्या कालखंडामध्ये 'रायनाक' महार हा रायगड किल्ल्याचा प्रमुख रखवालदार (किल्लेदार) होता. याचवेळी ब्रिटीशांची फौज जी की अत्यंत प्रशिक्षित, शस्त्रसज्ज व मोठा तोफखाना असणारी होती. अशा ब्रिटीशांनी रायगड किल्ल्यावर तोफांचा मोठा मारा चालविला; परंतु रायनाक महार व त्याच्या फौजेने न डगमगता, ब्रिटीशांच्या फौजांना कसल्याही प्रकारची भीक न घालता सतत पंधरा (१५) दिवसपर्यंत इंग्रज सैन्याचा धुव्वा उडवत रायगडचे

रक्षण केले; पण रायगडाचे रक्षण करत असतानाच तो धारातीर्थी पडला."[२०] या रायनाक महाराने आपला प्राण सोडला; परंतु किल्ला शत्रूच्या हाती पडू दिला नाही. यावरून ही जात पराक्रमीतर होतीच; परंतु तितकीच ती इमानदार देखील होती. पेशव्यांबद्दल महारांच्या मनात आदर नव्हता. कारण पेशव्यांनी महारांना अत्यंत हीन वागणूक दिली होती. तरी रायनाकावर विश्वासपूर्ण मोठी जबाबदारी या वेळी होती म्हणून त्याने स्वत:च्या त्रासापेक्षा आपल्या कर्तव्याला जास्त महत्त्व देऊन आपली जबाबदारी पार पाडली. यालाही सूर्याजी पिसाळासारखे करता आले असते; परंतु ह्या जातीच्या रक्तातच असे काही रसायन होते की त्यांनी 'ज्याचे खावे मीठ त्याचे करावे नीट' या म्हणीप्रमाणे वर्तन केले. "म्हणूनच आज रायगड किल्ल्यावर रायनाक महाराचे असलेले थडगे त्याच्या पराक्रमाची साक्ष देते."[२१]

यावेळी ब्रिटीशांना १५ दिवस महारांनी फार मोठा निकराचा लढा दिला. रायनाक महार व त्याचे साथीदार या संघर्षात संपले; परंतु त्यांनी हा किल्ला ब्रिटीशांच्या हातामध्ये जाऊ दिला नाही; परंतु ब्रिटीशांना कोणत्याही परिस्थितीमध्ये हा किल्ला हवा होता. "ब्रिटीशांनी आपल्या पराभवाच्या कारणांची योग्य मिमांसा केली, आणि परत दुसऱ्या वेळी ब्रिटीशांनी तो किल्ला जिंकण्याचा निश्चय केला. त्यांनी रायगड किल्याचा अत्यंत बारकाईने अभ्यास करण्याचे ठरवले. त्यानूसार त्यांनी अत्यंत काळजीपूर्वक आपल्या पराभवाची कारणे शोधली. तेव्हा त्यांना जाणवले की, जोपर्यंत महार सैनिक या किल्ल्याच्या रक्षणासाठी आहेत, तोपर्यंत आपणास हा किल्ला जिंकणे अशक्य आहे. म्हणून इंग्रजांनी आपल्या धोरणात बदल केला. त्यांनी महारांना सोबत घेऊन हा किल्ला परत दुसऱ्या वेळेस जिंकण्याचे ठरवले. कारण महारांनाच या रायगड किल्याचे खाच-खळगे माहिती होते. ब्रिटीशांना पूर्णपणे माहित झाले की महारांच्या मदती शिवाय आपण किल्ला जिंकणे अशक्य आहे. म्हणून इंग्रजांनी महारांची मदत घेऊन पुन्हा दुसऱ्या वेळेस रायगडावर हल्ला केला. तेंव्हा ब्रिटीशांना सहज यश प्राप्त झाले व किल्ला ब्रिटीशांच्या ताब्यात आला"[२२]

### ४.९ महारांचे इतर पराक्रमी कार्य

#### ४.९.१ पथकदार महार :

छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळापासून महार ही जात एकनिष्ठपणे मराठा साम्राज्याची सेवा करत होती. शिवाजी महाराजांनी आठरा पगड जातीच्या लोकांना आपल्या सैन्यामध्ये समाविष्ट केले होते. भारतातील सर्व जातींना आपला उदरनिर्वाह करण्यासाठी काहीना काही उद्योग व्यवसाय होते; परंतु महारांना असा एकही उद्योग किंवा व्यवसाय नव्हता कीं, ज्यामुळे त्याच्या उदरनिर्वाहाचा प्रश्न सुटेल.

महार जात यावेळी 'अस्पृश्य' म्हणून ओळखली जात होती. अस्पृश्य म्हणजे स्पर्श करण्यास अयोग्य असा त्याचा अर्थ होता. या अस्पृश्य जातीमध्ये महाराबरोबरच मांग चांभार ह्या जाती देखील होत्या. अस्पृश्य जातीपैकी या वेळी महाराष्ट्रात महार, मांग व चांभार ह्या प्रमुख जाती होत्या. यांतील "महार हे महाराष्ट्रातील मूळचे रहिवाशी लोक असल्याने मूळची बहिष्कृत झालेली अशी ती अस्पृश्य जात होती. महार हे राजकीय पराभवातून अस्पृश्य बनले. मांग व चांभार हे अस्पृश्य बनण्यामागे मांस भक्षण व घाणेरडे व्यवसाय हे कारण आहे. उदाहरणार्थ मांग व चांभार मेलेल्या जनावराच्या कातड्यापासून निरनिराळ्या वस्तू बनवत."[२३]

मांग व चांभार हे चामड्यापासून वस्तू बनवत होते. तसेच मांग दोरखंड वळून ते विकत व उपजीविका चालवत असत; परंतु महार ही अशी जात होती ज्यांना स्वत:चा कोणताच व्यवसाय किंवा उद्योग नव्हता. यामुळे यांना इतर सवर्ण जातीवर अवलंबून रहावे लागे. गावातील सवर्ण जे सांगेल ती कामे महारांना करावी लागत. "महारांच्या कामाचे नियम नव्हते, त्याची खाते नियमित नव्हते, माणसे नियमित नव्हते. त्याचबरोबर कामाचे तास देखील नियमित नव्हते, महारास २४ तास कामावर हजर रहावे लागे. कोणत्यावेळी कोण येईल आणि काय काम सांगेल याची शाश्वती नव्हती."[२४] "ही कामे फक्त पुरुष महारच करत नव्हता तर पुरुष हजर नसेल तर त्याची बायको, बायको नसेल तर मुलगा किंवा मुलगी, तेही हजर नसतील तर म्हातारा

किंवा म्हातारी. म्हणजेच कुटुंबातील कोणीतरी बदली म्हणून काम करण्यास एका पायावर तयार असलेच पाहिजे. मग ते काम कोणत्याही वेळी यवो. रात्र म्हणता येणार नाही, आजारी आहे म्हणता येणार नाही, घरी कोणी मयत झाले असे म्हणता येणार नाही, हाक मारली की तडक निघालेच पाहिजे. जर का उशीर झाला तर अधिकारी मग तो फाटका का असेना महाराच्या आईबहिणीच्या लेकीबेटीच्या नावाने लाखोली वाहण्यास केव्हाच मागे पुढे पाहात नव्हता. अन् हे सर्व महारलोक मात्र निमुटपणे सहन करित.''[२५]

वरील बाबींवरून आपल्या एक बाब लक्षात येईल की, महार ह्या जातितील लोक माणस असून देखील त्यांना माणसासारख वागवल जात नव्हत. तर त्यांची आवस्था पशू पेक्षा देखील वाईट होती. महारांना उदरनिर्वाहासाठी कोणताही उद्योग किंवा व्यवसाय करण्याची परवानगी या ठिकाणच्या समाजव्यवस्थेने दिली नव्हती. त्यांच्यावर अनेक बंधने लादली होती; परंतु त्यांच्या पराक्रमावर, बुद्धीमत्तेवर व इमानदारीवर या ठिकाणच्या समाजव्यवस्थेला कसलीही बंधने घालता आली नाहीत. म्हणून महारांनी वरील बाबींचा उपयोग करून आपला उदरनिर्वाह केला. म्हणजेच त्यांनी आपल्या मधील प्रचंड अशा ताकदीचा उपयोग शौर्य गाजविण्यासाठी केला. त्यातूनच अनेक शौर्यवान महारांनी आपल्या सारख्याच शूर, धाडशी व निधड्या छातींच्या महारांना एकत्र करून आपली पथके निर्माण केली. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

''प्रसिद्ध इतिहास संशोधक आबा चांदोरकर यांनी नुकत्याच केलेल्या शोधावरून असे सिद्ध होते की, पेशव्यांच्या फौजेत महार लढवय्ये अगर शिपाई तुरळकच होते असे नव्हे, तर त्यांच्या जातीचे कित्येक पथकदार असत. त्या पथकदाराची नावे खालील प्रमाणे सांगता येतील.

'पेशव्यांचे काही महार पथकदार'

| | | |
|---|---|---|
| १) आपनाक | २) उमनाक | ३) उपनाक |
| ४) कालनाक | ५) कुसनाक | ६) कारूनाक |
| ७) केरनाक | ८) खंडनाक | ९) गोमनाक |

| | | |
|---|---|---|
| १०)गोंदनाक | ११) चांगनाक | १२) चिमणनाक |
| १३)चिदनाक | १४) जाननाक | १५) झुकनाक |
| १६)तुकनाक | १७) दमेनाक | १८) दसनाक |
| १९)दादनाक | २०) देवनाक | २१) धावनाक |
| २२)धूलनाक | २३) धोंडनाक | २४)नागनाक |
| २५)पदनाक | २६) पुजनाक | २७)बदनाक |
| २८)बागनाक | २९) मालनाक | ३०) मायनाक |
| ३१)मेघनाक | ३२) भेमनाक | ३३) येसनाक |
| ३४)रामनाक | ३५) राजनाक | ३६) राणनाक |
| ३७)लहालनाक | ३८) वामनाक | ३९) सटवानाक |
| ४०)संभनाक | ४१) सिवनाक | ४२)सुकनाक |
| ४३)सुबनाक | ४४) सिदनाक''[२६] | |

### ४.९.२ जखमी सैनिकास रणांगणातून आणणे

महाराष्ट्रातील एकंदरीत गावांचे चित्र आपण जर पाहिले तर प्रत्येक गावामध्ये महारांची घरे आढळून येतातच. म्हणून 'गाव तेथे महारवाडा व जिथपर्यंत महार तिथपर्यंत महाराष्ट्र'|असे म्हटले जाते. याच महारास गावातील '|हरकाम्या' म्हणून देखील ओळखले जाते. याच बरोबर हा सरकार व रयतेचा राबता होता. राबता म्हणजे{ "The Practice of exacting work, on the public service, from the Mahar" किंवा "The Mahar upon whom certain work or service is imposed on the public account."[२७] महारास राबता म्हणण्या मागचे कारण तो चोवीस तास राबत होता. त्याला रात्र किंवा दिवस असा ठरावीक वेळ नव्हता. जेंव्हा आदेश मिळेल तेव्हा त्यास काही न बोलता सरळ सांगितलेले काम करावे लागे. यावेळी त्याची अडचण किंवा इतर बाबींचा विचार केला जात नव्हता. म्हणून

यास राबता असे म्हटले आहे. शिवकाळात, शुद्रांना वेठबिगारीची कामे करावी लागतच होती; परंतु पेशवाईच्या कालखंडामध्ये महारांवर वेठबिगारीची सक्ती असल्याचे दिसून येते. म्हणूनच सरकारने आदेशच काढले होते की, "माहार बाधले खोलेचा बारमाही अष्टोप्रहर राबता असावा."[२८] "राबते माहार पंधरा दिवस सालीना राबवून पोटास देणे."[२९] "महाराने देशपांड्याच्या घरी पंधरवाडा राबावे."[३०] "राबते महार दोन महिने राबवावे जाजणी न घेणे."[३१] "गावगन्ना दर गावास राबता महार एक महिना घ्यावा."[३२] एवढ्यावरच सरकारी आदेश थांबला नव्हता, तर "महाराला सर्व वतनदाराकडे वेठबिगारी म्हणून राबावे लागे."[३३]

"महार हे फक्त राबते म्हणूनच काम करीत होते असे नाही, तर ते लढाईत जखमी झालेल्या सैनिकांना परत आणण्याचेही काम करीत असत."[३४]

यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो. "रघुनाथरावास पेशवेपदाची मोठी लालसा होती. ही लालसा त्यास स्वस्थ बसू देत नव्हती. या लालसेपोटी तो नाना प्रकारच्या उचापती व खटपटी करत होता; परंतु त्यात त्याला यश मिळत नव्हते. म्हणून तो आपले स्वप्न पूर्ण करण्यासाठी शेवटी ब्रिटीशांच्या दरबारी शरण गेला. ब्रिटीश देखील मराठ्यांना संपविण्यासाठी संधीची वाट पाहात होता आणि ही संधी त्यांना रघुनाथरावाच्या माध्यमातून आली. त्या संधीचे ब्रिटीशांनी सोने करण्याचे ठरविले. रघुनाथरावास पेशवेपदावरून हाकालण्यासाठी मराठा साम्राज्यातील बारा प्रमुख व्यक्ती एकत्र आल्या होत्या. त्यांनाच बारभाई यानावाने ओळखत होते. हे बारभाई रघुनाथरावास सत्तेपासून दूर ठेवण्यासाठी एकत्र आले होते. म्हणून रघुनाथराव इंग्रजांची मदत घेऊन आपली सत्ता पूर्ववत निर्माण करण्याचा प्रयत्न करत होता. इंग्रजांनीही या संधीचा फायदा उचलून मोरोबाच्या मार्फत बारभाई मंत्रीमंडळा विरुद्ध कट रचला; परंतु तो फसला. तरी सुद्धा वॉरन हेस्टिंग्जने रघुनाथरावाला लष्करी मदत देऊन पुण्याला आणण्याचा आणि पेशवा बनविण्याच्या योजनेत मात्र कोणताही बदल केला नाही. जितक्या मार्गांनी मराठ्यांची सत्ता नष्ट करता येईल तितक्या मार्गानी वॉरन हेस्टिंग्जला ती नष्टकरावयाची होती.

साताऱ्याचा मराठ्यांचा राजा राजाराम हा यावेळी मृत्यूशय्येवर होता. त्यावेळी नागपूरच्या मुधोजी भोसलेला त्याच्या गादीवर बसवावे असे कारस्थान वॉरन हेस्टिंग्जने रचले. यावर उपाय म्हणून नाना फडणीसाने मुधोजीच्या मुलाला म्हणजे दुसऱ्या रघुजीला आपल्या बाजूने वळवून घेतले. विठोजी भोसले याला रामराजाला दत्तक देण्यात आले. आणि अशा रितीने वॉरन हेस्टिंग्जच्या छत्रपतीची सत्ता उलथवून टाकण्याच्या प्रयत्नाला उधळवून लावण्यात आले. महादजी शिंद्यालाही वॉरन हेस्टिंग्जने सर्व मार्गाचा अवलंब करून आपल्या बाजूला वळवून घेण्याचा याचवेळी प्रयत्न केला. याकरिता वॉरज हेस्टिंग्जने अनेक लोकांशी आणि शासकांशी पत्रव्यवहार केला. या पत्रव्यवहारावरून वॉरन हेस्टिंग्जची कुटील बुद्धीच दिसून येते; परंतु शिंदे वॉरन हेस्टिंग्जच्या या कोणत्याही आमिषाला बळी पडले नाहीत. इकडे २४ नोव्हेंबर १७७८ रोजी रघुनाथराव इंग्रजी मदत घेऊन मुंबईहून पुण्यास येण्यास निघाला. या मुंबईच्या सैन्याला वॉरन हेस्टिंग्जने कलकत्याहून जनरल ईगरटन याच्या नेतृत्वाखाली पाठविलेले सैन्य येऊन सामील होणार होते. मुंबईच्या इंग्रजी सैन्याचे नेतृत्व कर्नल ईगरटन याने स्विकारले होते आणि त्याने वॉरन हेस्टिंग्जच्या या योजनेला संमती दिली होती. मुंबईहून निघालेल्या इंग्रज सैन्याला खंडाळा घाटात येण्यास जवळजवळ एक महिना लागला. नाना फडणिसाने आणि पुण्याच्या मंत्रिमंडळाने या आक्रमणाला तोंड देण्याची जय्यत तयारी केली होती. हा संपूर्ण प्रदेश मराठ्यांना पूर्णपणे माहीत होता. त्याचबरोबर इंग्रजासमोर समोरासमोरच्या लढाईत आपला टिकाव लागणार नाही, हेही मराठ्यांना चांगले माहित होते आणि म्हणून मराठ्यांनी गनिमीकाव्यांचा आश्रय घेतला होता. मराठ्यांनी इंग्रजावर सर्व बाजूंनी हल्ल चढविला. इंग्रज ज्या मार्गाने येत होते. त्या मार्गावरील सर्व बाजारपेठा आणि खेडीपाडी मराठ्यांनी संपूर्ण जाळून टाकली. पुणे शहर पूर्णपणे रिकामे करण्यात आले. इंग्रजांना कुठूनही रसद मिळणार नाही, असा पक्का बंदोबस्त मराठ्यांनी केला. शरण जाऊन पुणे शहर इंग्रजांच्या स्वाधीन करण्यापेक्षा ते पूर्णपणे जाळून टाकण्याची तयारी मराठ्यांनी केली. यातच ४ जानवोरी १७७९ रोजी कॅप्टन स्टुअर्ड हा कार्ल्याजवळ

झाडावर बसून भोवतालच्या परिस्थितीचे निरीक्षण करीत असतांना अचानक एक गोळी लागून ठार झाला. कर्नल के हाही अशाच प्रकारे जखमी झाला. इंग्रजांच्या दुर्दैवाने कर्नल इगरटन हा एकाएकी आजारी पडला आणि त्यामुळे इंग्रजांना कॉकबर्न नावाचा नवीन सेनापती नेमावा लागला. या सर्व परिस्थितीमुळे इंग्रजांची परिस्थिती अत्यंत कठीण झाली. मराठ्यांचा एक सेनापती भिमराव पानसे याने फार मोठा पराक्रम करून शेकडो इंग्रजी सैनिकांना ठार मारले. विजयी मराठा सैन्य इंग्रजी सैन्याच्या पाठलागावरच होते. अतिशय कष्टाने शेवटी इंग्रज सैन्य तळेगांव या ठिकाणी येऊन पोहोचले. मराठ्यांनी भोवतालचा सर्व मुलूख जाळून टाकल्यामुळे इंग्रजांना पिण्याचे पाणीही मिळणे कठीण झाले. शेवटी सतत दोन दिवसपर्यंत आपसात सल्लामसलत केल्यानंतर इंग्रजांनी मुंबईला परत जाण्याचे ठरविले; परंतु मराठ्यांनी तोही मार्ग बंद केला. अशारितीने संपूर्ण इंग्रजी सैन्य मराठ्यांच्या वेढ्यात सापडले. त्यामुळे इंग्रजांसमोर शरणांगतीशिवाय दुसरा मार्ग राहिल नाही. इंग्रजांच्या वतीने जनरल फार्मर याने मराठ्यांची भेट घ्यावी आणि तह घडवून आणावा असे तळेगांवास हजर असलेल्या इंग्रज सेनापतींनी ठरविले. यावेळी महादजी शिंद्यावर सर्वांचाच विश्वास होता आणि म्हणून इंग्रजांनी प्रथम महादजशी आणि नंतर नाना फडणीसाशी वाटाघाटी केल्या. परिणामी इंग्रज आणि मराठ्यांनी १६ जानेवारी १७७९ रोजी एक तह केला. त्या तहालाच 'वडगावचा तह' या नावाने ओळखले जाते.''[३५]

इंग्रज आणि मराठे यांच्यामध्ये तळेगांव या ठिकाणी १७७८ रोजी जे युद्ध झाले हे युद्ध सुरू असताना 'तळेगावाहून लष्करातील जखमी लोक पुण्याला आणण्यासाठी पाठविलेल्या फलटणीत महारांना ही पाठवीले होते.''[३६]

### ४.९.३ महारास उद्धत रुमाल पदवी

प्राचीन काळापासूनच महार ही जात शूर व लढवयी म्हणून प्रसिद्ध होती. त्यांनी आपल्या शूरतेची परंपरा हजारो वर्षे कायम ठेवली होती. याला शिवकाळ व पेशवाईकाळ देखील अपवाद नाही. ज्याप्रमाणे शिवरायाच्या कालखंडामध्ये महारांनी आपल्या ताकदीच्या व शौर्याच्या

जोरावर स्वराज्याच्या स्थापनेत शिवाजी महाराजांना पूर्ण सहकार्य केले. त्याप्रमाणेच महारांनी पेशवे काळातसुद्धा मोठे शौर्य व पराक्रम गाजविला. शिवकाळाप्रमाणेच पेशवाईमध्ये देखील मोठ्या प्रमाणावर महार लष्कर म्हणून होते. इतकेच नाही तर या कालखंडामध्ये शिदनाका सारख्या पराक्रमी महारांनी महार लोकांना एकत्र करून स्वतंत्र लष्करी पथके निर्माण केले होते. हे पथके पेशव्यांच्या सेवेत कार्यरत होते. पेशवाईच्या काळात एका नवीन पद्धतीची सुरूवात झाली होती. त्यात 'जो व्यक्ती फार मोठा पराक्रम गाजवील त्यास 'उडत रुमाल' ही बहुमानाची पदवी देण्याचा प्रघात असे 'उडत रुमाल' हाशब्द मुळामध्ये मानपद्धतीचा द्योतक आहे. ज्या व्यक्तीने फार मोठे शौर्य गाजविले असेल त्याला ही पदवी म्हणजेच हा अधिकार देण्यात येई. त्या शूरवीरांच्या भोवती लोकांनी उभे राहावयाचे व त्याचा जयजयकार करीत त्याच्या डोक्यावर मोर्चेला प्रमाणे पांढरे रुमाल उडवायचे असा हा बहुमान असे हा मान फक्त महार शूरांनाच असे, असे इतिहास संग्रहात म्हटले आहे; पण केवळ महारांच्या साठीच हा नवा हलका मान काढला होता असे नाही, ''जंजिऱ्याच्या स्वारीच्या प्रसंगी बीरवाडीकडील नावजी मराठे व होनाजी लकवडे या मराठावीरांनाही हाच मान दिला होता.''[३७] वरील बाबी संदर्भात मत सांगत असताना 'इतिहास संशोधक श्री शंकररावजी जोशी म्हणतात की, 'उडत रुमाल' हा मान महाराबरोबरच मराठ्यांना देखील दिला जात होता.''[३८]

महारांच्या शौर्याची गुणपारख व त्या शौर्याला साजेसा बहुमान मराठी अंमलात कसा होई ते दाखविण्यास 'जंजीरावर स्वारी' चा उल्लेख करता येईल. ''शाहू महाराजांची' जंजिरावर स्वारी ही लडाई सुरू असताना एका अमावस्येच्या रात्री १०० (शंभर) शूर महारांनी चिपळूणची खाडी पार करून अचानक हल्ला केला व कोवळे कोट किल्ला (चिपळून) रातोरात फत्ते केला आणि त्या किल्ल्यावर भगवा फडकविण्याचा मान पटकविला. त्यांच्या या अतुलनीय शौर्याबद्दल त्यांना त्यावेळी प्रचलित असलेली 'उडत रुमाल' ही बहुमानाची पदवी देण्यात आली. आज याच किल्ल्याच्या पायथ्याशी असलेली वस्ती त्या शूरवीरांच्या वंशजांचीच आहे.''[३९]

''इ.स. १७३९ मध्ये 'वसई' येथे पोर्तुगिज व पेशवे यांच्यात मोठी लढाई झाली. या लढाईत तुकनात या शूर महाराने आपल्या पराक्रमाच्या बळावर मांडवी येथिल मोर्चा चांगल्या रितीने लढविला व पोर्तुगीजांचा पराभव करून वसई किल्ला चिमाजी अप्पास जिंकून दिला. या नामांकित लढवय्याला त्याच्या या पराक्रमाबद्दल चिमाजी आप्पाने कंठी-कडी तोडे बक्षिस देऊन पेशव्यांच्या दरबारात जाहीर गौरव केला व महारांना 'उडत रुमाल' ही बहुमानाची पदवी सुद्धा देण्यात आली.''[४०]

### ४.९.४ पेशवेकालीन महारांचे हुलपथक

छ.शिवाजी महाराजांनी स्वराज्याच्या स्थापनेचे स्वप्न उराशी बाळगून आपल्या सवंगड्यांना एकत्र केले. लहानपणापासूनच शिवाजी महाराजांना सवंगडी जमवणे व त्याचा नेता बणून अनेक खेळ खेळणे हा छंद होता. या छंदाचेच रूपांतर भविष्यात मोठा राजा या पदापर्यंत पोहोचल्याचे दिसून येते. छत्रपती शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रातील परकियांची जुलमी, अत्याचारी राजवट जवळून पाहिली होती. त्यांचे पिता देखील परकियांच्या दरबारी चाकरीस होते. म्हणून छ. शिवाजी महाराजांनी स्वतःचे राज्य निर्माण करण्याचा ध्यास घेतला व त्याच्या पूर्तीसाठी त्यांनी आपल्या परिसरातील सर्व जाती धर्माच्या तरूणांना एकत्र करून एक लष्करी फौज निर्माण केली. या फौजेस शत्रूला नामोहरम करण्यासाठी वेगवेगळे शारीरिक व्यायाम शिकविले युद्धविषयक कवायतीचे प्रशिक्षण दिले. यावेळी महाराष्ट्रातील व्यक्ती हा दनकट शरीराचा उंचापुरा व चपळ वृत्तीचा होता. याचा फायदा महाराजांनी स्वराज्याची स्थापना करण्यासाठी करून घेण्याचे ठरविले; परंतु महाराजासमोर एक प्रश्न मोठा होता. तो म्हणजे शिवाजी महाराजांच्या लष्करापेक्षा शत्रूचे लष्कर कितीतरी पटीने जास्त होते. त्यांच्याकडे मोठे शस्त्रास्त्रे होती. त्या तुलनेत महाराजांची शस्त्रे व लष्कर हे कमी होते. यातून मार्ग काढण्यासाठी महाराजांनी महाराष्ट्राच्या भौगोलीक स्थितीचा उपयोग करून गनिमीकावा या पद्धतीचा अवलंब करण्याचे ठरविले. कारण कमी लष्कराच्या जोरावर त्यांच्या पेक्षा कितीतरी पटीने जास्त

असलेल्या शत्रूला पराभूत करावयाचे होते. गनिमी कावा म्हणजे "शत्रू चाल करून आल्यास माघार घेणे, शत्रूने माघार घेताच त्याच्यावर हल्ला करणे, लपून छपून शत्रूवर हल्ले करणे, शत्रूची रसद तोडणे, शत्रू विश्रांती घेत असेल-थकला असेल तेव्हा हल्ला करणे, शत्रूच्या हालचालीवर बारीक नजर ठेवणे."[४१]

वरील गनिमीकावा पद्धतीमध्येच हुलस्वार ही पद्धत मोडत होती व हुलस्वार म्हणून पेशवाईच्या काळात महारांचा वापर केल्याचे दिसून येतो. "लढाऊ सैन्याची विशेषतः दोन दालने दिसून येतात. पायदळ व घोडदळ लढावू घोडेस्वाराच्या आघाडीची तुकडी महारांची होती. ही तुकडी हुलस्वार या अर्थपूर्ण नावाने संबोधली जात असे. सैन्यास 'हुल' दाखवून त्यांचा मोर्चा बदलून आदळून टाकण्याचे प्राणावरचे काम महार लोकांनीच केलेले आहे."[४२]

छ. शिवाजी महाराजांनी सुरू केलेली गनिमीकावा ही पद्धती पेशवाईमध्ये देखील सुरू होती. शत्रूच्या सैन्यास हुलकावणी देऊन आपले व आपल्या साम्राज्याचे, राजाचे रक्षण या पद्धती द्वारे केले जात असे. या पद्धतीमुळे शत्रूची फार मोठी हानी होत असे व शत्रूसैन्य मोठ्या संकटात सापडत असे. ही मोठी जबाबदारी महार पार पाडत असे.

### ४.९.५ पेशव्यांच्या जनानखान्याचे रक्षक महार

महाराष्ट्रातील महार हे धाडधिपाड व अंगापिंडाने मजबूत व पिळदार शरीराचे होते. त्यांच्या शरीरयष्टीकडे पाहूनच शत्रू अर्धा गर्भगळीत व्हावा अशी त्यांच्या शरीराची ठेवण होती. त्याच्या शरीरयष्टीप्रमाणेच तो शूर, कर्तबगार व इमानदार होता; परंतु समाजव्यवस्थेने त्याला सर्व अधिकारापासून दूर ठेवले होते. महाराच्या स्वातंत्र्यावर बंधने आणून त्यास फक्त हरकाम्या बनविण्यात आले होते. हरकाम्या म्हणजेच ज्याने जे काम सांगितले ते निमुटपणे कसलीही तक्रार न करता करणे, महारांच्या या वृत्तीचा फायदा महाराष्ट्रातील सत्ताधाऱ्यांनी वेगवेगळ्या क्षेत्रात करून घेतला. महार हा पराक्रमी जसा होता तसाच तो इमानदार देखील होता. मोठ्या विश्वासाने तो मालकानी सांगितलेली कामे करत असे. मालकाचे काम करत असताना स्वतःचा

जीव जरी द्यावा लागला तरी तो मागे पुढे पाहत नसे. स्वतःच्या जीवाचे बलिदान देऊन तो मालकाचे किंवा मालकाने सोपविलेल्या जबाबदारीचे रक्षण करत असे. म्हणून अनेक जीवावर बेतणारी पराक्रमी कामे महारांनी केल्याची उदाहरणे आहेत. ज्यात विश्वास आणि पराक्रम या दोन्ही बाबींचा अंतर्भाव असल्याचे दिसून येते. यासाठी खालील काही संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतात.

''गावच्या पाटलाची,| आसामीची व जमीनदाराची मुलगी किंवा सून परगावी जाणार असेल तर तिच्या संरक्षणासाठी तिच्या सोबत मुऱ्हाळी म्हणून महार जात असे. अशावेळी त्या स्त्रिवर चोर दरोडेखोरांनी हल्ला केला तर जीवाची पर्वा न करता त्या स्त्रिच्या संरक्षणाकरीता तो चोराशी सामना देत असे. जोपर्यंत स्वतःचा जीव आहे तोपर्यंत महार त्या स्त्रिला धोका होऊ देत नसे. ही अवघड कामगिरी महार यशस्वीपणे पार पाडत असे.''| [४३] ''छत्रपती शिवाजी महाराजांची मुलगी सखुबाई ही बाबाजी निंबाळकरांच्या मुलाला दिली होती. तिच्यावर एकदा संकट गुदरले. त्याप्रसंगी वाल्हे येथील महार तिच्या उपयोगी पडले.''|[४४]

महारांच्या इमानदारी व पराक्रमाबरोबरच त्याच्या विश्वसनियतेचे दुसरे उदाहरण खालील प्रमाणे सांगता येईल. महारांची महसूल व्यवस्थेतील भूमिका अत्यंत महत्त्वाची होती. ''पाटील हा गावचा प्रमुख सरकारी अधिकारी होता. तसेच तोच महसूल अधिकारी सुद्धा होता. गावचा महसूल गोळा करून सरकार दरबारी सादर करण्याची जबाबदारी पाटलाचीच होती.''[४५] परंतु महाराच्या मदतीशिवाय पाटलाचे हातपाय हलत नसत. प्रत्येक गावात महार चावडी व गावची चावडी असे. गावच्या चावडीतच सर्व सरकारी कामकाज चालत असे. ''गोळा झालेला महसूल पाटील महाराकडे देत असे आणि महार तो महसूल डोक्यावर घेऊन तालुक्याच्या ठिखाणी घेऊन जात असे व त्याचा भरणा सरकार दरबारी करून त्याची पावती पाटील कुलकर्ण्याला आणून देत असे.''[४६] पाटील सर्व जमा झालेला गावातील महसूल जागल्या महाराच्या हवाली करत असे; तो महार एकटा ती सर्व रक्कम तालुक्याच्या गावी घेऊन जात असे; परंतु त्या रकमेतील एक आणा देखील काढून घेण्याची हरामखोरी महाराच्या मनात किंवा

स्वप्नात देखील कधी आली नाही. प्रामाणिकपणाचे जसे बाळकडू महारास पूर्वीपासून पाजले होते; परंतु यांच्या प्रामाणिकपणाची सरकारने कधीच कदर केली नाही.'

"महार हा जनतेचा आणि सरकारी अधिकाऱ्यांचा वाटाड्या आणि मार्गदर्शक म्हणून देखील काम करत होता. महार म्हणजे खेडेगावचा डोळा होता."[४७] महार हा वाटसरुंना घनदाट जगंलातून पुढील गावी नेऊन सोडणे व मार्गदर्शन करीत असे. कारण नवीन वाटसरूंना मार्ग माहित नसे. या बरोबच घनदाट जंगल असल्यामुळे जंगली हिंस्त्र प्राण्याची भिती वाटत असे. त्यांच्या सोबत महार दिल्यास जंगली प्राण्याची भीती राहत नसे. "जर एखाद्या प्रवाशाला पुढच्या खेड्यात जाण्याचा मार्ग ठाऊक नसला तर पाटलाकरवी महाराला बोलावून त्याच्याकडे तो वाटाड्याचे काम करवून घेऊ शकतो. त्या खेड्यात पोहोचल्यावर दुसऱ्या महाराकडून सेवा मिळविली जाऊ शकते. असे झाले म्हणजे प्रवाशाला मार्गदर्शनाबरोबच संरक्षणही प्राप्त होते."[४८]

महारांच्या वरील विश्वसनियता व पराक्रमाचा उपयोग शिवपूर्वकाळात, शिवकाळात व पेशवाईच्या काळात देखील घेण्यात आला. शिवकाळानंतर पेशवाईला प्रारंभ झाला. पेशवे हे ऐशआरामाचे भोक्ते होते. आशा या पेशव्यांच्या दरबारामध्ये मोठा जनानखाना असे. जनानखान्यात त्या पेशव्यांच्या राण्या राहात असत. पेशव्यांच्या राण्या ह्या दिसण्यास अतिशय सुंदर असत. या कालखंडामध्ये बरेच वेळा शत्रुसैनिक आक्रमण प्रसंगी जनानखान्यात घुसून तेथील स्त्रियांना ठार मारत. त्यांची बेअब्रु करत असत. यामुळे या स्त्रियांच्या रक्षणासाठी शूर, पराक्रमी व विश्वासू लोकांची पेशव्यांना आवश्यकता होती. या काळात या सर्व गोष्टीत बसणारी महार ही एक जात होती. म्हणून "पेशव्यांच्या दरबारात त्यांच्या जनानखान्याचे रक्षक म्हणून महारांची नेमणूक केली जात असे."[४९]

### ४.१० समारोप:

वरील बाबींचा विचार करता एक बाब लक्षात येते की, महार हे खरोखरच पराक्रमी तर होतेच; परंतु विश्वासू देखील होते. यांच्या पराक्रमाच्या तुलनेत यांना मोबदला मात्र फार कमी

मिळत असे. पराक्रम गाजवत असताना अनेक महारांना आपले प्राण ग्मवावे लागले आहेत; परंतु त्या महाराच्या मृत्यूनंतर त्यांच्या कुटुंबाची आबाळ व्हायची, यावर सत्ताधाऱ्यांनी कोणतीही उपाय योजना केली नव्हती. हा मोठा अन्याय या जातीवर झाल्याचे दिसून येते. महारांनी दिलेला शब्द पूर्णपणे पाळला; परंतु त्याचे मोल सरकार दरबारी झाल्याचे दिसून येत नाही. महाराच्या वाट्याला सतत हालअपेष्ठा अन्याय, अत्याचार, तहानभूक व मृत्यू आल्याचेच दिसून येते.

# संदर्भग्रंथ सूची


१. देशमुख मा. म., युगप्रवर्तक शिवराज आणि मराठ्यांची शौर्य गाथा, पृ. ६९

२. दीक्षित आवळे, नागवंशीय अंबेडकरी चळवळीत महारांचे योगदान, पृ. ४५

अ. मोरे चिंतामण, रणझुंजार शिदनाक, पृ. २७,२९

३. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक ६२, १-४, पृ. १४१

अ. खरात शंकरराव, महाराष्ट्रातील महारांचा इतिहास, पृ १५७

ब. खांबे सुधाकर, शौर्य आणि पराक्रमाचे प्रतिक भिमा कोरेगावचा विजयस्तंभ, पृ. १९

४. नवलकर ह. ना., शिवराम जानबा कांबळे चरित्र, पृ. ७७

५. डॉ. गाठाळ साहेबराव, मराठ्यांचा इतिहास (१६३० ते १८१८), पृ. २८०

६. Sardesai G.N., New History of the Maratha Vol.02, P. 181 to 186

अ. डॉ. कोलारकर श.गो., मराठ्यांचा इतिहास, पृ. २१६ ते २१९

७. खैरमोडे चा. भ., डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र खंड - ०१, पृ. १८९

अ. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. १६२

८. सोमवंशी बी. सी., भारतीय जातीसंस्थेत मातंगाचे स्थान व महार-मांग संबंध, पृ. ७८

अ. सरदेसाई गो.स., (संपा.) पेशवे दप्तर खंड - ३, नोंद २०९

९. पवार अप्पासाहेब, (संपा.) ताराबाई कालीन कागद पत्रे, खंड-३, पृ. ७०,७१

१०. डॉ. कोलारकर श. गो., उपरोक्त, पृ. २७७

११. डॉ. कठारे अनिल, शिवकाळ व पेशवाईतील महारांचा इतिहास, पृ. १९६

१२. खैरमोडे चा. भ., उपरोक्त, खंड - १, पृ. १८९

१३. Dighe V.G., Peshwa Bajirao I[st] and Maratha Expansion, P. 43 to 85

अ. प्रा. ढवळे, प्रा. बारगळ, मराठ्यांचा इतिहास, पृ. ४७,४८

१४. पेशवे सनदा, प्रकरण १७ वे, पृ. ३०४

अ. पारसनिस द. ब. (संपा.) , ब्रह्मेंद्रस्वामी धवडशीकर चरित्र व पत्रव्यवहार लेख - २७०

ब] खैरमोडे चा. भ. ,|उपरोक्त, खंड - १ , पृ. १८८

१५. राजवाडे वी. का. ,(संपा.) मराठ्यांचा इतहासाची साधने खंड - २२ , लेख २३२

अ. सरदेसाई गो. स. , (संपा.) मराठी रियासत उत्तर विभाग , पृ. ४५३

१६. सोहनी कृष्णाजी / का. ना. साने , (संपा.) पेशव्याची बखर , पृ. १६५

१७. शिंदे विठ्ठल रामजी , भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न , पृ. १५८

अ. गुरू गोपाळ चक्रनारायण , एकच समाज महार - मराठा , पृ. ४७

ब] मोरे चिंतामण , उपरोक्त ,|पृ. ३७, ३८

१८. दीक्षित आवळे , उपरोक्त , पृ. ४७

अ. मोरे चिंतामण , उपरोक्त , पृ. ४२, ४३

१९. नवलकर ह. ना. , उपरोक्त|, पृ. ७६

अ. दीक्षित आवळे , उपरोक्त , पृ. ४८

ब] मोरे चिंतामण , उपरोक्त , पृ. ४६, ४७

२०. भा. इ. सं. मं. पुणे , त्रै ६२, १-४ पृ. १४१

अ. प्रदिप गायकवाड , (संपा.)अग्रलेख , बहिष्कृत भारत व मुकनायक , पृ. २८

२१. खांबे सुधाकर , उपरोक्त ,|पृ. २३

२२. Kamble N.D. , Deprived Castes and Their struggle for equality,| P. 118

२३. गवळी पी. ए. , पेशवेकालीन समाज व जातीय संघर्ष , पृ. १२२

२४. प्रदिप गायकवाड , (संपा.) ,|उपरोक्त ,|पृ. ६५

२५. कित्ता , पृ. ६५

२६. खरात शंकरराव ,|उपरोक्त , पृ. १६३

२७. मोल्सवर्थ, मराठी - इंग्रजी शब्दकोश , पृ. ६९३

२८. ओतूरकर रा. वि., पेशवेकालिन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार , लेख ४६ , पृ. ३२

२९. बाड ग. चि. / पारसनिस द. बा. , (संपा.) खंड - ०६ , नोंद ७३२

३०. ओतूरकर रा. वि. , उपरोक्त, लेख - ९४ , पृ. ४५

३१. बाड ग. चि./ पारसनिस द. बा. , (संपा.) उपरोक्त , खंड - ०३ , नोंद ३३४

३२. बाड ग. चि./पारसनिस द. बा.,(संपा.) शाहू महाराज यांची रोजनिशी, पृ. १४३, १४५

३३. भा. इ. सं. मं. पुणे , शिवचरित्र साहित्य खंड-१, लेख -३१, पृ. ५३

३४. बाड ग. चि. / पारसनिस द. बा. / साने, मराठे, जोशी , (संपा) सवाई माधवराव रोजनिशी, खंड -२ , पृ. ४३

३५. डॉ. कोलारकर श. गो. , मराठ्यांचा इतिहास , पृ. ३६७, ३६८

३६. बाड ग. चि. / पारसनिस द. बा. , उपरोक्त , पृ. ४३

३७. खैरमोड चा. भ. , डॉ. भी. रा. आंबेडकर, चरित्र खंड-१ , पृ. १८९

३८. खरात शंकरराव , उपरोक्त , पृ. १६२

३९. खांबे सुधाकर , उपरोक्त , पृ. २०

४०. कित्ता , पृ. २०,२१

४१. डॉ. गाठाळ साहेबराव , मराठ्यांचा इतिहास (१६३० ते १८१८) , पृ. २६

४२. पेशवेसनद , प्रकरण - १७ , पृ. ३०४

अ. खरात शंकरराव , उपरोक्त , पृ. १७०

४३. अत्रे त्र्य. ना. , गावगाडा , पृ. ३५, ६८

४४. खैरमोडे चा. भ. , उपरोक्त खंड - १ , पृ. १८८

४५. Edi. J.P. Guha. (Grant Duff.) History of Maratha Vol. I , P. 16

A. Sen S.N. , Administration System of the Maratha , P.129,

४६. भा. इ. सं. मं. पुणे, त्रैमासिक, ६२, १-४, पृ. १२७

४७. Elphinstone Mountstuart, Territories conquered from paishwa, A report , P. 23

४८. भिक्षु सिवली बोधी, (अनु.) (आलेक्झांडर रॉबर्टसन), महारलोक, पृ. ३०, ३१

४९. कित्ता, पृ. २६

*प्रकरण पाचवे*

# ब्रिटिश कालखंड आणि महार (इ.स.१८१८ पर्यंत)

५.१ प्रस्ताविक

५.२ ब्रिटिशांच्या घरी महार

५.३ ब्रिटिशांच्या सैन्यात महार का सामील झाले.

५.४ ब्रिटिश सैन्यातील महारांचे पराक्रम

५.४.१ आर्काटची लढाई (इ.स. १७५१) व महार

५.४.२ प्लासीची लढाई (इ.स.१७५७) व महार

५.४.३ दुसरे इंग्रज मराठा युद्ध (इ.स. १८०२-०३) व महार

५.४.४ हवालदार सुभनाक वाहनाक व मदनाक येसनाक

५.४.५ हवालदार धोंडनाक पुंडनाक

५.४.६ खडकीची लढाई व महार

५.५ कोरेगावची लढाई व महारांचा पराक्रम

५.६ ब्रिटिश कालीन महार लष्कर अधिकारी

५.७ समारोप

## ५.१ प्रस्ताविक :

महार जात ही शूर व पराक्रमी असल्यामुळे त्यांना रणझुंजार म्हणूनही संबोधले जात होते. त्यांनी आपल्या तलवारीचे पाणी भल्याभल्यांना पाजल्याचे आपण मागील प्रकरणात पाहिलेले आहे. शिवकाळ आणि पेशवेकाळात महारांनी रणांगणावर अप्रतिम शौर्य गाजविले; परंतु त्यांच्या अप्रतिम शौर्याची, पराक्रमाची व इमानदारीची कदर त्या काळच्या राज्यकर्त्यांनी केल्याचे दिसून येत नाही. शिवपूर्वकाळात महार जात ही गावकुसाच्या बाहेर होती. तिला गावकुसाच्या आत घेण्याचे काम छत्रपती शिवाजी महाराजांनी केले त्यांच्यातील क्षात्रवृत्तीचा उपयोग हिंदवी स्वराज्याची स्थापना करण्यासाठी केला; परंतु ज्या महारांनी छत्रपती शिवरायासाठी आपल्या प्राणांचे बलिदान दिले, त्यांच्या उद्धारासाठी महाराजांनी ठोस उपाययोजना केल्याचे दिसून येत नाही. ही बाब महार जातीसाठी दूर्दैवी म्हणावी लागेल. शिवकालखंडामध्ये एका शूर महाराने मोठा पराक्रम गाजविला होता. रायगड किल्ल्यास औरंगजेबाने वेढा दिला असता; महाराजांनी किल्ल्यात दवंडी दिली की जो कोणी किल्ल्याबाहेर जाण्यासाठीची चोर वाट सांगेल त्यास बक्षिस दिले जाईल. तेव्हा हे काम एका महाराने केले. एक गुप्त वाट त्याने महाराजास सांगितली; परंतु महाराजांनी त्यास बक्षिस देण्याऐवजी ही वाट त्याने इतरांना दाखवू नये म्हणून त्याचे पाय मागितले. महाराने देखील राजाच्या सुखासाठी स्वतःचे पाय दिले.

या सारख्याच अनेक महारांनी आपले प्राण गमावले. प्राण गमावलेल्या महारांच्या कुटुंबाची नंतर वाताहात झाली. तरी महारांनी इमाने इतबारे काम करण्याचे सोडले नव्हते. महारांच्या या इमाने इतबारे काम करत राहाण्याच्या वृत्तीचा पेशवाईत मोठा गैरफायदा घेण्यात आला. शिवकालखंडाप्रमाणेच पेशवाईत देखील महारांच्या ताकदीचा उपयोग पेशव्यांनी आपली सत्ता मजबूत करण्यासाठी करून घेतला. पेशवेकाळात जातीयतेने मोठे थैमान घातले होते. याच काळामध्ये खडर्याच्या लढाईत शिदनाक महार हा आपले लष्करी पथक घेऊन पेशव्याच्या

मदतीस हजर झाला होता; परंतु त्याचा गोट हा मराठे व ब्राह्मण यांच्या गोटा जवळच होता. याबद्दलची तक्रार करण्यात आली होती. यावेळी मोठा अपमान महारांना सहन करावा लागला; पण महारांनी सर्व बाबी सहन केल्या. यामुळे पेशव्यांनी या महारांच्या मजबुरीचा फायदा घेत अन्यायाचा कळस गाठला.

पेशवाईतील अस्पृश्यतेची दाहकता व्यक्त करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात, ''महाराष्ट्रात पेशव्यांच्या शासन काळात रस्त्याने येणाऱ्या एकाद्या हिंदूवर कदाचित सावली पडून त्याला विंटाळ होऊनये म्हणून सार्वजनिक रस्त्यावरून जाण्यास अस्पृश्यांना मनाई करण्यात आली होती. नजरचुकीने अस्पृश्याला स्पर्श होऊन एखादा हिंदू विंटाळू नये यासाठी प्रतिबंधक उपाय म्हणून प्रत्येक अस्पृश्याने आपल्या गळ्यात किंवा मनगटावर काळा धागा बांधलाच पाहिजे असा नियम करण्यात आला होता. पेशव्यांची राजधानी असलेल्या पुण्यामध्ये रस्त्यावरून उमटलेल्या अस्पृश्यांच्या पदचिन्हांचा स्पर्श होऊन अजानता एखादा हिंदू भ्रष्ट होऊनये म्हणून ही पदचिन्ह पुसून टाकण्यासाठी अस्पृश्यांच्या कमरेला लोंबता झाडू बांधवालागत असे. अस्पृश्यांना जेथे जायचे असेल तेथे जाताना त्याने आपल्या गळ्यात एक मडके बांधावे असे बंधन होते. कारण त्याच्या तोंडातील थुंकी जमिनीवर पडली आणि अजानता एखादा हिंदू त्यावरून गेला तर तो अपवित्र होत असे.त्याला पुन्हा घरी जाऊन स्नान करावे लागत असे.''[१] अशा प्रकारची मानवतेला काळीमा फासणारी वागणूक पेशवाईच्या काळात महारांना मिळत होती. या अत्याचारास महार कंटाळले होते. म्हणून कांही महारांनी आपला मूळचा हिंदू धर्म सोडून मुस्लिम धर्म स्वीकारण्याचे ठरवले. काहींनी स्वीकारला देखील. कारण महार एकदा मुस्लिम झाला की, तो बादशहाच्या खूप जवळचा समजला जातअसे. यामुळे अनेक शूर व पराक्रमी महार मुस्लिम बनले. ''वऱ्हाडातील जळगाव येथील सुमारे पाच हजार महार लोकांनी मुस्लिम धर्म स्वीकारण्याची घोषणा केली होती व त्याची सुरूवात म्हणून १२ (बारा) महारांनी मुस्लिम धर्म स्वीकारला होता. ''[२] महारांच्या या धाडसी निर्णयामुळे हिंदूमध्ये मोठी

खळबळ माजली व जळगावच्या हिंदूंनी आपले धोरण काही प्रमाणात सौम्य केले; परंतु म्हणतात ना. 'कुत्र्याची शेपूट नळकांडीत असेपर्यंत सरळ राहते, नळकांडी काढल्यानंतर पुर्ववत ती वाकडी होते' याप्रमाणे पुन्हा पूर्व परिस्थिती निर्माण झाली. पेशवे कालखंडामध्येच मुस्लिम आक्रमकांनी भारतात धुमाकूळ घातला होता. यामध्ये मुस्लिमशासक अहमदशहा अब्दाली हा प्रमुख होता.

अब्दालीने भारतामधील संपत्ती लुटण्यासाठी भारतावर अनेक वेळा स्वाऱ्या केल्या व प्रत्येक स्वारीच्या वेळी तो मोठा खजीना घेऊन आपल्या मायदेशी जात असे. प्रत्येक वेळी अब्दाली भारतीय शासकांचा पराभव करून मोठी संपत्ती घेऊन जात होता. यामुळे त्यास संपत्तीचा मोठा मोह झाला. म्हणून तो वारंवार भारतावर आक्रमण करत होता. पहिल्या काही स्वाऱ्याच्या वेळी अब्दालीने पेशव्यांसोबत बचावात्मक धोरण अवलंबिले होते. याचवेळी पेशवे देखील उत्तर भारतामध्ये आपली सत्ता स्थिरकरण्याचा प्रयत्न करत होते. याच प्रयत्नामधून अब्दाली आणि मराठे यांच्यामध्ये संघर्षाची ठिणगी पडली. उभयतांनी एकमेकांच्या विरोधात संघर्ष करण्यासाठी सैन्याची मोठी जमवाजमव केली. शेवटी उभयंतातील संघर्षाचा दिवस जवळ आला आणि तो दिवस म्हणजेच १४ जानेवारी १७६१ होय. ज्या दिवशी पेशवे व अब्दाली यांच्यामध्ये तिसरे पानिपतचे युद्ध झाले. हे युद्ध इतके भयंकर होते की, यापूर्वी मराठ्यांच्या सैन्याची एवढी वाताहत कधीच झाली नव्हती. एवढा मनुष्य संहार केंव्हाच झाला नव्हता. म्हणून ही घटना म्हणजे मराठ्याच्या इतिहासातली पहिली घटना असावी. पानिपतच्या नरसंहाराबद्दल गो.स.सरदेसाई असे म्हणतात की, ''पानिपतच्या रणभूमीवर लढाऊ व बिनलढाऊ मिळून पाऊणलाख (७५,०००) माणसे मारली गेली असावीत''[3] म्हणजेच तिसऱ्या पानिपत युद्धामध्ये एक कर्तबगार पिढीच गारद झाली होती. या युद्धामुळे पेशवाईला मोठा धक्का बसला. या धक्क्यामधून पेशवाई म्हणावी तशी सावरू शकली नाही. एवढा मोठा नरसंहार झाला असताना देखील पेशव्यांनी आपल्या वृत्तीत तीळमात्र देखील बदल केल्याचा दिसून येत नाही. आपले साम्राज्य सावरण्यासाठी पेशव्यांनी अस्पृश्यांना जवळ केले नाही. उलट त्यांच्यावरील अन्याय अत्याचार

वाढतच होता. म्हणतात ना 'सुंब जळाले तरी पीळ कायम असतो' अशीच काही स्थिती पेशवाईची होती.

पानिपतच्या युद्धामुळे पेशवाईची मोठी वित्त व जिवितहानी झाली होती. या बरोबरच उत्तर भारतातील पेशव्यांची सत्ता देखील संपुष्टात आली होती. यामुळे उत्तर भारतात सत्तेची पोकळी निर्माण झाली. याच काळात भारतात इतर परकीय सत्ता नांदत होत्या. ज्यात पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज ह्या त्या परकीय सत्ता होत्या. हे परकीय भारतामध्ये व्यापाराच्या दृष्टीने आले होते; परंतु व्यापार करत असताना त्यांनी ज्या ज्या ठिकाणी वसाहती केल्या तेथील राजकीय सत्ता संपवून आपले अधिराज्य निर्माण केले. या सर्व परकियांमध्ये इंग्रज हे बुद्धीमान, चतूर व दूरदृष्टी असणारे होते. ब्रिटिशांनी भारतात इ.स. १६०० मध्ये इस्ट इंडिया कंपनीची स्थापना करून व्यापार करण्याच्या उद्देशाने त्यांनी भारतात प्रवेश मिळवला. ते तराजू घेऊन व्यापार करण्यासाठी भारतात आले होते; परंतु व्यापार करीत करीत त्यांनी भारताच्या समाजव्यवस्थेचे व राजकारणाचे अवलोकन करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा त्यांना दिसून आले की, भारतीय समाज हा राजकारणापेक्षा धार्मिक कर्मकांडामध्ये मोठ्याप्रमाणावर गुंतला आहे. ज्या भारताचा प्राचीन इतिहास पाहिला तर तो अत्यंत गौरवशाली व राजकीय दृष्ट्या अत्यंत समृद्ध व सशक्त होता. तोच भारत मध्ययुगीन कालखंडात कर्मकांड व अंधश्रद्धेच्या दलदलीत फसत चालला होता. ही बाब जेव्हा चाणाक्ष ब्रिटीशांच्या लक्षात आली तेव्हा त्यांनी आपल्या हातातील तराजू बाजूला ठेवला व हातात शस्त्र घेतले.त्याच शस्त्राच्या बळावर त्यांनी भारतातील एक एक राज्य बळकावून शेवटी ते सर्व भारताचे सत्ताधीश बनले.

भारताची सत्ता ब्रिटीशांनी हातात घेतल्यानंतर त्यांनी प्राचीन भारताचा गौरवशाली इतिहास पूर्णपणे अभ्यासला. यावरून त्यांना एक बाब लक्षात आली की, प्राचीन काळात भारत देश हा विस्ताराने फार मोठा होता आणि एवढ्या मोठ्या देशाची प्रशासन व्यवस्था देखील तितकीच चांगल्या प्रकारची होती. या बरोबरच या देशामध्ये परकीयांचा शिरकाव होऊ नये

म्हणून मोठी फौज कार्यरत होती. या फौजेच्या जोरावर भारत मोठा विकसीत व सुरक्षित देश म्हणून त्या काळात ओळखला जात होता. अशा या भारतात काही जाती होत्या. ज्या जातींनी स्वतःच्या लढवयी व पराक्रमी वृत्तीने भारतास समृद्ध व सशक्त बनविले होते. त्यांच्या पराक्रमामुळेच शत्रू या देशाकडे वाकडी नजर करून पहात नव्हता. सर्व प्रथम ब्रिटीशांनी या पराक्रमी जातींचा शोध घेण्यास प्रारंभ केला. कारण ब्रिटीशांना भारतावर राज्य करण्यासाठी मोठ्या लष्कराची गरज होती आणि ते लष्कर ते इंग्लंडमधून आणू शकत नव्हते. कारण त्यांचा खर्च न झेपणारा होता. या पराक्रमी जातींचा शोध घेत असातना ब्रिटीशांना जाणवले की, प्राचीन काळात ज्या जाती अत्यंत पराक्रमी म्हणून गणल्या गेल्या होत्या त्या जातींना सध्या अस्पृश्य म्हणून संबोधले जाते. त्यांचा स्पर्श देखील या ठिकाणच्या सत्ताधाऱ्यांना अग्नी पोळल्यासारखा वाटतो.या बरोबरच भारतात मोठ्या प्रमाणावर अंधश्रद्धा आहे. भारतीय समाज अंधश्रद्धेमध्ये व रूढी परंपरामध्ये पूर्ण बुडालेला आहे. या विरुद्ध ब्रिटीश हे विज्ञानवादी होते. जातपात यापासून कोसोदूर होते. म्हणून सद्यस्थिती ब्रिटीश सत्ता भारतात स्थिर होण्यास अनुकूल होती याची जाणीव ब्रिटीशांना झाली.

महार ही जात त्या अस्पृश्यांमधील प्रमुख आहे. या जातीचा इतिहास अत्यंत पराक्रमी आहे. याची जाणीव ब्रिटीशांना झाली. महारांच्या शूरतेबद्दल मध्ययुगीनकाळात ताम्रपट लिहिल्याचेही आढळते. ही बाब चतुर ब्रिटीशांच्या नजरेतून चुकने कठीण आहे. १३ व्या शतकात सांगली जिल्ह्यातील बोरगाव येथील माहिती आहे. त्यात असे म्हटले आहे की, **''महार हे मुळचे अस्पृश्य नसून लढाऊ वृत्तीचे, निर्भय, आणि रणधुरंधर असल्याचे ताम्रपटात म्हटले आहे.''**[४] हा ताम्रपट कोल्हापूर जिल्हा परिषदेतील समाजकल्याण खात्याचे निरिक्षक श्री नानासाहेब पाटील यांच्या घरातील जुन्या कागदपत्रात सापडला.

महारांच्या गौरवशाली, पराक्रमी व इमानदार वृत्तीची माहिती ब्रिटीश शासकास नक्कीच झाली असणार म्हणूनच ब्रिटीशांनी महारांच्या पराक्रमाचा इतिहास धुंडाळला व त्यानूसार जे

महार हिंदू असून देखील हिंदूंनी त्यांना जवळ केले नाही त्यांना माणूस म्हणून न वागविता जनावरापेक्षाही हीन वागणूक दिली. त्या महारांना ब्रिटीशांनी जवळ केले व त्यांच्या शुरतेचा फायदा आपली सत्ता प्रबळ करण्यासाठी करून घेतला.

## ५.२ ब्रिटीशांच्या घरी महार :

ब्रिटीश भारतामध्ये येण्यामागचा मुख्य हेतू व्यापार हा होता. व्यापार करत करत अनेक ब्रिटीश कुटूंबे भारतात स्थिरावली.ब्रिटनमधून भारतात येणाऱ्या ब्रिटीशांचा ओघ मोठ्या प्रमाणावर वाढला. कारण त्यांना भारतात मोठ्या प्रमाणात सुरक्षितता वाटत होती. त्यांनी व्यापार करत असताना अगोदरच ज्या शहरात व्यापार करावयाचा असेल त्या ठिकाणच्या शासकांशी करार करून त्या शहरात मुक्तपणे व्यापार करत असत. यामुळे त्यांच्या मनातील त्या शासकाबद्दलची भीती कमी होऊन ते निर्धोकपणे व्यापार करू लागले. नंतर त्यांनी आपली कुटूंबे भारतात स्थिर केली. ब्रिटीश हे कामामध्ये इतके गुंतून राहात की, त्यांना घरच्या दैनंदिन कामासाठी जास्त वेळ देता येत नसे. म्हणून त्यांना आता नोकराची गरज भासू लागली. ब्रिटीश व्यक्तीच्या बोयकोस कामास मदत करण्यासाठी घरगड्याची आवश्यकता भासू लागली. यावेळी भारतामध्ये अस्पृश्येतेने मोठे थैमान घातले होते. अस्पृश्य गणलेल्या महार, मांग, चांभार या जातींचा स्पर्शदेखील या ठिकाणच्या भारतीयांना सहन होत नसे. त्यामध्ये महारांची तर सावली देखील सवर्णांना जमतनसे. महारांच्या सावलीचा स्पर्श देखील त्यांना विंटाळ वाटत होता. म्हणून या समाजव्यवस्थेने महारांना बाहेर फिरण्याच्या वेळा देखील ठरवून दिल्या होत्या. ''महारांना सकाळी नऊच्या अगोदर व दुपारी तीनच्या नंतर ब्राह्मणांच्या परिसरात फिरू देत नसत कारण त्यांची सावली कुणावर पडू नये.''[५] वरील वेळेत म्हणजे सकाळी नऊच्या पूर्वी व दुपारी तीनच्या नंतर व्यक्तीची सावली लांब पडते. यामुळे हा मज्जाव करण्यात आला होता. एवढ्यावरच हे सवर्ण थांबले नव्हते तर या पुढची घटना अशी आहे की, ''जर एखादा महार आपल्या गावातील विहीरी जवळून बाहेरच्या गावात सकाळच्या वेळी जात असेल तर त्याला

पायी न चालता गुडघ्यावर रांगत जावे लागे, नाही तर त्याची सावली पाणी भरणाऱ्यावर पडेल आणि तो विटाळेल!''[६] अशा प्रकारची मानवतेला काळीमा फासणारी समाजव्यवस्था भारतात होती. अशा स्पृश्यांच्या प्रतिकूल स्थितीमध्ये विज्ञानवादी विचारांच्या ब्रिटीशांचा प्रवेश झाला होता. ह्यांना जेव्हा घरगड्यांची गरज भासली तेव्हा त्यांना जाणीव होती की घरगडी म्हणून ब्रिटनमधून माणसे आणणे तर अशक्य होते. कारण त्यांना द्यावा लागणारा मोबदला फार जास्तीचा होता आणि तो त्यांना परवडणारा ही नव्हता. म्हणून ब्रिटीशांनी भारतातीलच अस्पृश्य जातीच्या लोकांना घरगडी म्हणून कामास ठेवले. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

''आपले गृहकार्य चालविण्यासाठी ब्रिटीश गृहीणीला मदतीची आवश्यकता भासली तेव्हा त्या मदतीसाठी तिरस्कृत महार धावून आला व तो कार्यदक्ष घरगडी आढळला आणि घरची लहान मुले सांभाळण्यासाठी त्या महाराची बायको कुशल व विश्वासपात्रबाई सिद्ध झाली.''[७] ब्रिटीशांच्या या धोरणामुळे महारांना मोठा दिलासा मिळाला. कारण त्यांना सवर्णांच्या घरी दिवसभर राबून देखील मोबदला म्हणावा तसा मिळत नव्हता. बरेच वेळा त्यांना मोफत मध्येच कामे करावी लागत असत. त्यांच्या कामाची कदर हिंदू करत नसत. उलट त्यांना त्रास देण्यात व त्यांचे हाल करण्यात त्यांना आनंद वाटत असे. ''पेशव्यांनी त्यांच्या काळात जो मोठ्या प्रमाणात जातीवाद केला तसा ब्रिटीशांनी केला नाही. उलट ब्रिटीश कंपनीने शिस्तीने जातीवाद कमी केला हे विशेष होय. ''[८]

''इंग्रज लोक जेव्हा हिंदुस्थानात आले, तेव्हा हिंदू-मुसलमांनापासून अलग असलेल्या अस्पृश्याकडे त्यांची दृष्टी वळली. त्यांनी अस्पृश्यांना आपल्या दिमतीला ठेवले. गळ्यात मडके आणि कमरेला बोराटीची फेस लावून फिरणाऱ्या महारांना पेशव्यापेक्षा इंग्रज जास्त जवळचे वाटू लागले. म्हणून त्यांनी (महारांनी) इंग्रजांचे साम्राज्य हिंदुस्थानात स्थापण्यासाठी पिढ्यानपिढ्या खतम केल्या.''[९]

महारांनी ब्रिटीशांचे मिठ खाल्ले त्याप्रमाणे त्यांनी ब्रिटीश साम्राज्य स्थिर करण्यासाठी

मोठी मदत केली. आपल्या प्राणांची बाजी देऊन इंग्रजाचे रक्षण केले व स्वतःचा ही विकास साधण्याचा प्रयत्न केला. ब्रिटीशांमुळेच महारांना माणूसपण प्राप्त झाले असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही.

**५.३ ब्रिटीश सैन्यात महार का सामील झाले ? :**

भारतामध्ये हजारो वर्षापासून गुलामीचे व प्राण्यापेक्षाही हिन जीवन जगणारा अस्पृश्यांचा वर्ग होता. माणूस असूनही या ठिकाणच्या समाजव्यवस्थेने त्यांना माणुसकीला कलंकीत करणारी वागणूक दिली. प्राण्यांना माणसाचे अन्न दिले; परंतु अस्पृश्य हे माणसे असून देखील त्यांना प्राण्यापेक्षाही हीन वागणूक दिली. प्राणी खाणार नाहीत असे अन्न व पाणी पिऊन अस्पृश्यांना गुजराण करावी लागली. हिंदू असून हिंदू कडूनच त्यांचा अतोनात छळ केला जात होता. परंतु प्रत्येक गोष्टीला एक सीमा असते व त्या सीमेपलीकडे गेल्यास प्रत्येक व्यक्तीला काही सुखद अनुभव उपभोगण्यास मिळतात. त्याप्रमाणेच अस्पृश्यांच्या जीवनात देखील एक आशेचा किरण उगवला, तो ब्रिटीशांच्या रूपाने म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेकर म्हणतात की, "ज्या दिवसांपासून मुंबईत इंग्रजांचा पाय पडला त्या दिवसापासून आपल्या महार समाजाला नशीब काढायला वाव मिळाला. इंग्रजांच्या राज्यामुळे आपल्याला नशीब काढण्याचा मार्ग मोकळा झाला. इंग्रज परदेशातून आले. त्यांच्या जवळ सैन्य शिपाई नव्हते व सैन्य उभे केल्याशिवाय राज्य मिळविण्याची आशा नव्हती. पेशव्यांच्या राज्यात वरच्या वर्गांना मोठेपणा व सुखसंपत्ती मिळू शकत असल्यामुळे इंग्रजांच्या सैन्यात वरचा वर्ग जात नव्हता. अस्पृश्यादी पददलीत वर्गाला पेशवाईत अगदी अमानुषपणे वागविले जात होते. मनुष्य म्हणून जगण्याचा त्यांना जणू काय हक्कच नव्हता. शूरांची जात असून पददलितपणामुळे त्यांचे चीज पेशवाईत झाले नाही. इंग्रजांच्या सैन्य भरतीमध्ये शिरण्याशिवाय महार, मांग व चांभारांना गत्यंतर नव्हते."[१९] महारांनी स्वाभिमानाने जीवन जगण्यासाठी पेशवाईला लाथ मारून ते ब्रिटीश सैन्यात सामील झाले. डॉ. आंबेडकर पुढे जाऊन असे म्हणतात की, "हिंदुस्थनात इंग्रजांनी राज्य कमावले ते महार

मांग, चांभारादी अस्पृश्य वर्गीय शूर सैनिकांच्या मदतीनेच.''[११]

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांप्रमाणेच महात्मा ज्योतीराव फुले देखील म्हणतात की, ''इंग्रज लोक आज आहेत, उद्या नाहीत, ते आपल्या जन्मास पुरतील म्हणोन कोणाच्याने खास करून सांगवत नाही. यास्तव त्या लोकांचे राज्य या देशात आहे, तोच आपण सर्व शुद्रांनी जलदी करून भटांच्या वडिलोपार्जित दास्यत्वापासून मुक्त व्हावे, यामध्ये मोठा शहानपणा आहे.''[१२]

महार मूळचे भारतीय होते. या बरोबरच ते हिंदू म्हणून ओळखले जात होते; परंतु या ठिकाणच्या सवर्ण हिंदूंनी त्यांना आपले मानले नाही. म्हणून त्यांनी नाविलाजास्तव परकीय सत्तेस मदत केली व त्यांची सत्ता स्थिर करण्यास मोठी मदत केली. खर्ड्याच्या लढाईत ज्या शिदनाकाने पराक्रम गाजविला होता. त्याच शिदनाकास बाजीराव दुसऱ्याकडून मोठा अपमान सहन करावा लागला होता. महार सैनिक इंग्रज सैन्यात सामील होणार ही गोष्ट शिदनाकास कळल्यानंतर तो बाजीरावास भेटला त्यावेळी त्याला कोणत्या प्रसंगास सामोरे जावे लागले ते खालील उदाहरणावरून कळेल.

''पेशव्याविरुद्ध इंग्रजासोबत महार सैनिक लढणार ही वार्ता महारांचा सरदार व प्रमुख सेनापती शिदनाक याच्या कानावर पडली. तेव्हा ही मंडळी प्रत्यक्षात श्रीमंत बाजीराव पेशव्यास भेटली. शिदनाकाने महारांची भूमिका स्पष्टपणे मांडली व म्हणाले आमच्या अस्पृश्यांची इंग्रजांच्या बाजूने लढण्याची कदापिही इच्छा नाही. तथापि आम्हाला आपल्या हिंदू बांधवाचे विरुद्ध लढण्याची इच्छा नाही. आम्हाला ते आवडतही नाही, आम्ही महारांनी तुमच्या बाजूने लढून इंग्रजांचा पराभव करून हिंदुस्थानातून त्यांना कायमचे हाकलून लावले तर तुमच्या राज्यात आणि लष्करात आमचे स्थान काय राहील? यावर श्रीमंत बाजीराव पेशवे यांनी अतिशय तिरस्काराने उत्तर दिले, तुम्हा महारांना सुईच्या आग्रावर थरथरत उभ्या राहणाऱ्या धुळीच्या कणा एवढेही स्थान या पेशवाईत मिळणार नाही. तुम्हा महारांना बजावून ठेवतो तुमचे स्थान

आहे तसेच कायम राहील. हिंदुधर्मातील चातुर्वर्ण पद्धतीच्या सिद्धांतानुसार आणि स्मृती ग्रंथानूसार धर्मशास्त्रात महारांना जसे वागविण्यास सांगीतले आहे. अशाच पद्धतीने आणि नियमाने वागवू. त्यात तिळमात्र बदल केला जाणार नाही. तुमचे स्थान खालच्या दर्जाचे आहे तेच कायम राहील.''[१३] अशा प्रकारच्या बाजीराव पेशव्याच्या अपमानास्पद बोलण्यामुळे शिदनाकाचे रक्त सळसळायला लागले. त्याचा स्वाभिमान जागा झाला आणि निर्वाणीच्या वाणीत बाजीराव पेशव्यांना निक्षूण तो म्हणाला ''श्रीमंत आजपर्यंत आम्ही तुमचे हजारो अपराध सहन केले आहेत. आता मात्र प्रत्येकवेळ तुमची जीवन मरणाची सीमारेषा खेचून जवळ आणीत आहे. सावध व्हावा आणि संयम करा, आम्ही महारांनी हाती शस्त्र धरली म्हणजे धरतीला भारभूत झालेली तुमची अन्यायी द्वेषयुक्त स्मृती ग्रंथ आणि तुमच्या उच्चवर्गीयांची माजलेली उन्मत शरीर, तिच्याच मातीत एकरूप केल्याशिवाय राहणार नाही. युद्धाची भाषा आम्हा बरोबर करू नका. ज्या मातीतून जन्माला आलो त्या मातीच्या अन्नाची जाणीव आहे, आम्हाला आपल्याच धरतीच्या लेकरांबरोबर हाती शस्त्र घेऊन लढण्यात आम्हाला आवडत नाही. ते तुमच्या म्हणण्यानूसार पाप होईल न्यायासाठी आपल्या हक्कासाठी युद्ध करणे म्हणजे पाप नव्हे ते एक सत्य होय आणि वेळ प्रसंग आलाच तर आम्हालाही तुमच्या विरुद्ध युद्ध करावे लागेल हीच आमची युद्धाची अंतिम घोषणा.''[१४]

पेशवाईतील पेशव्याच्या या उर्मट आणि जहाल आव्हानामुळे महारांचे रक्त उसळले आणि पेशवाईचे समूळउच्चाटन करण्यासाठी महारांनी ब्रिटीश फौजेत उघड उघड प्रवेश केला.

पेशवाईच्या या उर्मट धोरणाविरुद्ध धोरण ब्रिटीशांचे होते. ब्रिटीशांनी महारांचा प्राचीन व मध्ययुगीन काळातील पराक्रम अभ्यासला होता. त्यांची जिद्द, चिवटपणा व इमानदारीचे अनेक दाखले इंग्रजांनी तपासले होते. त्यापैकी एक उदाहरण असे सांगता येईल की, ''इस्ट इंडिया कंपनी जेव्हा भारतात आली तेव्हा मशीनगण चालविण्याकरीता भारतीयांची त्यांनी चाचणी घेतली. तेव्हा महारच मशिनगन पेलण्यास समर्थ आहेत, असे त्यांना आढळून आले.''[१५]

महारांनी ब्रिटीश लष्करात प्रवेश केला होता. त्यामुळे त्यांच्या माथी अस्पृश्यतेचा जो कलंक लागला होता. तो बराच धुवून निघाल्याचे दिसून येते. याचे श्रेय खऱ्या अर्थाने ब्रिटीशांना जाते. यासाठी खालील संदर्भ महत्वपूर्ण ठरतो. "ईस्ट इंडिया कंपनीच्या वखारी व कारखाने यांच्या संरक्षणासाठी, लष्करी अधिकारी, हिंदू धर्मातील भरती होण्यास येतील त्या लोकांची आपल्या लष्करात भरती करीत. त्यांच्या बळावर वखारी व कारखान्यांना सुरक्षितता मिळत असे. त्यांच्या लष्करात जातिभेद फार काटेकोरपणे पाळला जात नसे. मराठे व ब्राह्मण शिपाई, महार शिपायाच्या पंक्तिला बसून जेवत. अंथरुणाला अंथरून लावून झोपत. कंपनीच्या लष्करात मराठे व ब्राह्मण शिपायापेक्षा महार शिपायाचा भरणा अधिक होता. महार शिपाई इतरांपेक्षा जास्त लढाऊ वृत्तीचे होते, असे त्यावेळच्या लष्करी अधिकाऱ्यांनी लेखी मते प्रगट केली होती."[१६]

'The rise of Maratha power under the leadership of Shivaji (1645) coincides with the rising of the first bodies of sepoy troops by the East India company for the defence of their factories, whilst the Maratha power embraced all castes and creeds in their army. Writing in the eighteenth Century JOHN JACOB could say, 'In the Bombay Army, the Brahmin stands shoulder to shoulder in the ranks, nay, sleeps in the same tent with his purwariee fellow soldir and dreams not of any objection to this arrangement. If this subject be mentioned to a Brahmin sepoy, the ready answer is, 'What do I care? Is he not the soldier of the state?" The early Bombay Army of the eighteenth and ninteenth Centuries was not predominantly composed of Marathas but of MAHARS, RICH-

ARD BURTON himself an officer in a Bombay Regiment at the turn of eighteenth Century, took the parwaree as the typical sepoy''[१७]

वरील बार्बीचा विचार केल्यास एक गोष्ट स्पष्ट होते की, हिंदूंनी अस्पृश्यांवर केलेल्या पराकोटीच्या अन्याय व अत्याचारामुळे नाविलाजास्तव महारांना ब्रिटीशांचे दार ठोठवावे लागले. मुळात महार स्वकियाविरुद्ध लढण्यास तयार नव्हते. परंतु स्वकिय हिंदूंनीच त्यांना असे करण्यास भाग पाडल्याचे वरील उदाहरणावरून लक्षात येईल. महार जसे शूर, पराक्रमी व इमानदार होते तसेच ते स्वाभिमानी देखील होते; परंतु मजबुरीमुळे त्यांना हिंदूंचा अन्याय हजारोवर्षे सहन करावा लागला; म्हणून त्यांना ब्रिटीशांच्या माध्यमातून पर्याय मिळाल्याबरोबर त्यांनी आपले धोरण बदलले व हजारो वर्षांपासूनची गुलामगिरी त्यांनी झुगारून दिली.

### ५.४ ब्रिटीश सैन्यातील महारांचे पराक्रम :

पेशवाईत महारांना नानाविध समस्यांना व अत्याचारांना सामोरे जावे लागत असल्यामुळे महारांनी पेशवाईला लाथ मारून आधुनिक विचार सरणीच्या ब्रिटीशांना जवळ केले. महारांच्या शौर्याचे गोड कौतुक मोठ्या प्रमाणावर इंग्रजांनी केले होते. भारतातील अस्पृश्य जातीपैकी, महार ही एकच जात मशिनगन पेलू शकते हे खात्रीलायकपणे ब्रिटीशांनी सांगीतले. यामुळे महारांचा पुन्हा आत्मविश्वास वाढला व नव्या जोमाने व नवीन प्रेरणा घेऊन महार आपले काम बजावण्यास तत्पर झाला. महारांचे अनेक पराक्रम इंग्रजांनी माहीत करून घेतले होते. त्यापैकीच एक प्रसंग असा सांगीतला जातो की, ''महार हा खरोखरीच पराक्रमी आहे. योद्ध्यांना व शिल्पकारांना तो आव्हान करू शकतो तसाच तो निर्भय शिकारी दिसतो. जिवाजी नायकाने आपल्या सहकाऱ्यासह, राजाला मदत करून प्रतापगडाच्या सुभानखानाचे व बेदरच्या अब्दुल शहाचे बंड शमविले व राजगडचे बांधकाम राजाचे समाधान करून कार्यक्षमतेने उरकले. दुसरे एके प्रसंगी आपल्या सहकाऱ्यांसह एका पिंजऱ्यात बंगालचा वाघ बंद करून आणला. ह्या

बहादुरीच्या कामासाठी त्याला आठ परगण्याची सरनायिकी देण्यात आली. सामाजिक प्रतिष्ठेचे अग्रस्थानाचे हक्क व अठरा लक्ष सोमरशीचे नेतृत्त्व दिले.''[१८]

महारांच्या अशा पराक्रमा बद्दलची अनेक उदाहरणे ब्रिटीशांना ज्ञात होती. म्हणून त्यांनी कसलाही संकोच न बाळगता आपली सत्तास्थिर करण्यासाठी व भारतातील सत्ताधिशांना संपविण्यासाठी महारांच्या ताकदीचा उपयोग घेतला. म्हणजेच ब्रिटीशांनी काट्याने काटा काढला, असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही.

### ५.४.१ अर्काटची लढाई (इ.स. १७५१) व महार :

महार आणि इतर अस्पृश्य जातींनी पेशवाईला झुगारल्यानंतर ब्रिटीश सैन्यात प्रवेश केला. सामाजिकदृष्ट्या अस्पृश्य जातीचे लोक अतिशय वाईट रितीने ग्रस्त झाले होते. तसेच ते कोणत्याही राज्यकर्त्याने ठेवलेल्या सैनिकापैकी सगळ्यात स्वस्त होते. याबरोबरच अस्पृश्य जाती सुद्धा आनंदी होत्या. कारण ब्रिटीश सैन्यातील नोकरीमुळे त्यांना नियमित उत्पन्न आणि दैनंदिन जीवनात सवर्णांकडून होणाऱ्या त्रासापासून मुक्ती मिळाली होती. ब्रिटीशांकडून अस्पृश्यांना मिळणारे वेतन कमी असले तरी सवर्णांकडून मिळणाऱ्या मजुरीपेक्षा निश्चितच जास्त होते. पूर्वी त्यांना मोठ्या मुश्किलीने मजुरी मिळत असे म्हणून ब्रिटीश सैन्यामध्ये राहून महार व इतर अस्पृश्यांनी जे आर्काटचे युद्ध लढले हे युद्ध जसे काही स्पृश्य आणि अस्पृश्य यांच्या मधील युद्ध होते. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

'Confidence of East India Company increased when Loard Clive Won the battle of Arcot (Presently in Tamil Nadu) with the help of Pariya, Mahars and untouchable Tailiar castes. Socially they were the Worst affected people and they were the cheapest battle soldiers to be hired by any ruler in the world during these days. At the same time, the pariyas, the mahars and the untouch-

able castes were also happy because of the regular income though meagre and freedom from day to day tortures of the high castes. These low payments in army were higher than the payments received by them for their day and day out services in their villages. During those days, it was their good fortune if they received any wages at all in the villages. In fact, they fought the battle of Arcot in 1751 as if it was battle against local high castes rather than the battle between the East India Company and native rulers. For them it was the war for their liberation from their own torturous native masters."[१९]

वरील घटनेवरून एक बाब स्पष्ट होते की, आर्काटची लढाई हे युद्धनसून महारांच्या जीवंतपणाचे लक्षण होते, असे म्हणता येईल. कारण हे युद्ध महारांनी सवर्णांना आव्हान म्हणून लढल्याचे दिसून येते. या युद्धातून महारांनी उच्चवर्णीयांना त्यांची जागा दाखवून देण्याचे काम केल्याचे दिसून येते.

**५.४.२ प्लासीची लढाई (इ.स. १७५७) व महार :**

ब्रिटीशांनी भारतीय अस्पृश्यांना हाताशी धरून स्थानिक राज्यकर्त्यांविरुद्ध वेगवेगळ्या युद्धात विजय मिळवत होते. यामुळे त्यांचा आत्मविश्वास मोठ्या प्रमाणावर वाढत होता. ब्रिटीशांना आपले साम्राज्य वाढविण्यासाठी त्या त्या भागातील सत्ताधिशांना आपल्या अंकित आनावयाचे होते. यासाठी ब्रिटीशांनी महार व इतर अस्पृश्य जातींचा पुरेपूर उपयोग करून घेतला. आर्काटच्या युद्धानंतर एक एक प्रांत ब्रिटीश आपल्या साम्राज्यात विलीन करत होते. यावेळी भारताचा गव्हर्नर जनरल रॉबर्ट क्लाईव्ह हा होता. क्लाईव्ह हा साम्राज्यविस्तारवादी विचारांचा होता. त्यास ब्रिटीश साम्राज्य मोठ्या प्रमाणावर बळकट देखील करावयाचे होते. ब्रिटीशांनी

कलकत्ता काबीज केल्यानंतर त्याने आपली नजर बंगाल प्रांताकडे वळवली. बंगाल प्रांत अत्यंत सुपीक व संपन्न प्रदेश होता. येथे इंग्रजाबरोबरच फ्रेंच व डचांच्याही वखारी होत्या; परंतु इंग्रज हे तेथे सर्वश्रेष्ठ होते. ब्रिटीशांनी बंगालमध्ये व्यापार करण्यासाठी मोगल बादशहाकडून विशेषाधिकार प्राप्त करून घेतले होते. यांना जकात नव्हता. यामुळे बंगाल सरकारची मोठी आर्थिक हानी होत होती. ब्रिटीशांना जकात मुक्तीचे पास होते. त्याचा ते गैरवापर करत. या ब्रिटीशांच्या धोरणास पुढे बंगाल नबाब सिराजउद्योलाने विरोध केला. यामुळे ब्रिटीशांची मोठी गळचेपी झाली. आता ब्रिटीशांपुढे युद्धाशिवाय दुसरा पर्याय नव्हता. यामुळे ब्रिटीशांनी आपल्या कटकारस्थानास प्रारंभ केला ते खालील उदाहरणावरून कळेल.

''बंगालचा नबाब सिराज ऐवजी क्लाईव्हला अनुकूल शासक हवा होता. म्हणून सिराज ऐवजी त्याचाच सेनापती मीर जाफर यास नबाबपदी बसविण्यासाठी क्लाईव्ह धडपडत होता. यासाठी सिराजउद्यौलाच्या दरबारातील रायदुर्लभ हा सेनाधिकारी व जगतशेठ सावकार या दोघांना क्लाईव्हने हाताशी धरले. मीर जाफरची बंगालच्या नबाबपदी नियुक्ती केल्यानंतरच्या व्यवहाराचा निर्णय घेण्यात आला. यावेळी जाफर व क्लाईव्ह यांच्यामध्ये मध्यस्थ म्हणून उमीचंद हा होता. अशा प्रकारे सिराजउद्यौलाच्या विरोधामध्ये कट रचला जात होता; परंतु याची माहिती बरेच काळ सिराजला नव्हती. सिराजला ही माहिती जेव्हा कळली तेंव्हा त्याने जाफरला पाठिंब्याची याचना केली. मीर जाफरनेही यास नाटकी होकार दिला. उभयतांनी युद्धाची पूर्ण तयारी केली. रॉबर्ट क्लाईव्हने वेळ न घालविता आपल्या सैन्यास बंगालवर आक्रमण करण्याचा आदेश दिला. ब्रिटीश सैन्याच्या प्रखर हल्ल्याने कटव्याचा किल्ला रॉबर्ट क्लाईव्हला विनासायास मिळाला. यावेळी नबाबाकडे ५०,००० पायदळ व १८,००० घोडदळ एवढे प्रचंड सैन्य होते; परंतु सिराजच्या अंतर्गत शहकटशहामुळे त्यांचे सैन्य हातबल झाले. ब्रिटीशांच्या माऱ्यापुढे व सिराजच्या सैन्यातील अंतर्गत बंडाळ्यामुळे सिराज पराभवाकडे झुकू लागला. यावेळी त्याने जाफरचा सल्ला घेतला तेव्हा जाफरने शांतपणे माघार घेण्याचा सल्ला दिला. नबाबाने माघार

घेताच त्याचे सैन्य सर्व दिशेने पळूलागले आणि थोड्यावेळातच सर्व छावणी रिकामी झाली. नबाबाची सर्व युद्ध सामुग्री इंग्रजांच्या हातात पडली. या युद्धात ब्रिटीशांचे फक्त दोन (२) सैनिक मारले गेले व ५० (पन्नास) जखमी झाले.'[२०]

प्लासीच्या विजयामुळे ब्रिटीशांना आपली सत्ता भारतात स्थिर करण्यास मोठे बळ मिळाले हा विजय ब्रिटीशांनी महार, परिया व अस्पृश्य जातींच्या मदतीने मिळविला होता. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

'Ambition of the Britishers was growing because their success in various battles against the native rulers. They took advantage of the desparate and unhappy untouchable castes. Like other battlers, the battle of plassy was also won on 22 June 1757 by them with the help of the Pariya, the Mahar and untouchable caste slodiers.'[२१]

ब्रिटीशांनी जरी मीर जाफरला फितूर केले असले तरी हा विजय संपादन करण्यासाठी अस्पृश्य व महार जातीने ब्रिटीशांना जी सैनिकी ताकद दिली होती. यामुळे अवाढव्य सैन्य नबाबाकडे असून देखील त्याला रणांगणातून पळ काढावा लागला. कारण ब्रिटीश सैन्यातील महार व अस्पृश्यांचा पराक्रम नबाबास ज्ञात होता.

**५.४.३ दुसरे इंग्रज – मराठा युद्ध (इ.स.१८०२–०३) व महार :**

इंग्रज आणि मराठे यांच्यात एकूण तीन युद्धे झाली. पहिल्या युद्धात मराठ्यांचा विजय होऊन ब्रिटीश पराभूत झाले होते. त्यांना माघार घ्यावी लागली होती. ब्रिटीशांची निती ही आक्रमक होती. त्यांना आपले वर्चस्व सर्व भारतावर निर्माण करावयाचे होते. पश्चिम भारतात ही प्रादेशिक विस्तार करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. यामुळे मराठ्यांच्या अंतर्गत कारभारात ब्रिटीश लुडबूड करत होते. या बाबी मराठ्यांनी रोखण्याचा प्रयत्न केला. या

प्रयत्नातूनच पहिले इंग्रज-मराठायुद्ध उद्‌भवले. तिसऱ्या पानिपत युद्धातील मराठ्यांच्या पराभवामुळे इंग्रजांना मोठा आनंद झाला होता. कारण मराठ्यांच्या दुबळेपणातच त्यांचे हित होते. पानिपत युद्धानंतर पेशवाईत मोठ्या घडामोडींना ऊत आला. पानिपत युद्धानंतर थोरला माधवराव सत्तेवर आला. याने मराठा सत्ता सावरण्याचा प्रयत्न केला; परंतु हा अल्पजिवी ठरला. याच्या मृत्यूनंतर म्हणजेच १७७२ नंतर मराठ्याच्या राजकारणात दुहीच्या रूपाने कली शिरला. तो कली होता पेशवा माधवरावांचा चुलता रघुनाथराव याला पेशवा बनण्याची मोठी महत्त्वाकांक्षा होती; परंतु "माधवरावानंतर त्याचाच भाऊ नारायणराव हा गादीवर आला. हा अनुभवशून्य होता. यामुळे रघुनाथरावांची पेशवा बनण्याची आसुरी महत्त्वाकांक्षा पुन्हा उफाळून आली. त्याची परिणती ऑगस्ट १७७३ मध्ये रघुनाथरावाच्या पुढाकाराखाली नारायणरावाची हत्या होण्यात झाली."[२२] परंतु या हत्येनंतर ही रघुनाथरावांचे स्वप्न पूर्ण झाले नाही. नारायणरावाच्या मृत्यूनंतर सवाई माधवराव गादीवर आला. यामुळे पुन्हा रघुनाथरावांच्या स्वप्नावर पाणी पडले; परंतु त्याने आपली महत्त्वाकांक्षा सोडली नाही. यासाठी त्याने इंग्रजाचा आश्रय घेण्याचे ठरविले. "पेशवा बनण्याची आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण करून घेण्याच्या प्रयत्नात रघुनाथरावाने मदती करीता मुंबईकर इंग्रजाकडे धाव घेतली.तो इंग्रजाच्या आश्रयाला गेला. पश्चिम भारतात प्रादेशिक विस्तार करता यावा याकरीता मुंबईकर इंग्रज योग्य संधीची वाट पहातच होते. रघुनाथरावाने मदतीची केलेली याचना म्हणजे मराठ्यांच्या राजकारणात ढवळाढवळ करण्याकरीता व त्याद्वारा प्रादेशिक विस्ताराची महत्त्वाकांक्षा पूर्ण करून घेण्याकरीता एक सुवर्ण संधीच आहे हे मुंबईकर इंग्रजांनी ओळखले. याची परिणती रघुनाथराव व मुंबईकर इंग्रज यांच्यात ६ मार्च १७७५ रोजी सुरतचा करार घडून येण्यात झाली. त्या अन्वये पश्चिम किनाऱ्यावरील ठाणे, साष्टी,वसाई ही नाविक दृष्ट्या अत्यंत महत्वाची ठाणी व सुरत जवळील जंबुसर व ओलपद हे तालुके रघुनाथरावाने कायमचे इंग्रजांना द्यावे व त्या मोबदल्यात इंग्रजांनी रघुनाथरावाला पुण्याला पेशवेपदी बसवावे असे ठरले.त्यानुसार ब्रिटीश फौज रघुनाथरावाला

घेऊन पुण्याच्या रोखाने निघाली. याचे पर्यावसान पहिले इंग्रज - मराठे युद्ध सुरू होण्यात झाले.''[२३] वरील माहिती वरून स्पष्ट होते की, पहिल्या इंग्रज मराठा युद्धाला दुसरे तिसरे कोणीही कारणीभूत नसून पेशवे घराण्यातील रघुनाथराव हाच कारणीभूत होता. या घरभेदी व्यक्तीमुळे इंग्रजांना मोठी संधी घरबसल्या चालून आली. रघुनाथरावाच्या इच्छापूर्तीसाठी ब्रिटीश फौज मराठ्यांच्या विरुद्ध रवाना झाली. उभयंतात मोठा संघर्ष झाला; परंतु या संघर्षात ब्रिटीशांना अपयशाचे तोंड बघावे लागले. हेस्टिंग्जने ताबडतोब कर्नल अप्टनच्या मध्यस्थिने मराठ्या सोबत तह करून युद्ध थांबविले; परंतु तरीही उभयंतामध्ये संघर्ष सुरूच होता. शेवटी मे १७८२ मध्ये सालबाईच्या तहानूसार पहिल्या इंग्रज-मराठा युद्धाचा शेवट झाला.

पहिल्या इंग्रज-मराठा युद्धात इंग्रजांचा पराभव झाल्यामुळे ब्रिटीशांनी बचावात्मक भूमिकेचा अंगीकार केला.पहिल्या युद्धातील पराभवामुळे ब्रिटीशांनी चांगलाच धडा घेतला होता. म्हणून पुढे त्यांनी आपल्या इतर शत्रुंचा बंदोबस्त करण्याचे धोरण अवलंबिले. याबरोबरच त्यांनी आपल्या सैन्यात त्या-त्या प्रदेशातील दुखावलेल्या व बहिष्कृत केलेल्या लोकांना सामावून घेण्याचा सपाटा सुरू केला. आपले लष्कर मजबूत करण्यावर ब्रिटीशांनी मोठा भर दिला. कारण भक्कम लष्कराशिवाय सत्ता काबीज करणे शक्य नाही. याची जाणीव त्यांना झाली होती. याच वेळी भारताचा गव्हर्नर जनरल म्हणून वेलस्ली हा भारतात आला होता ''यावेळी ब्रिटीशांना आव्हान देऊ शकेल अशी शतकाच्या अखेरीस भारतात एकमेव सत्ता ठरली होती ती मराठ्यांची. भारतात ब्रिटीश सत्ता सार्वभौम असावी हे वेलस्लीचे मुख्य उद्दिष्ट होते. यातच १८ व्या शतकाच्या शेवटी मराठा राज्यात माजलेला गोंधळ, यादवी व आराजक ही परिस्थिती वेलस्लीच्या साम्राज्यवादी धोरणाला जणू आमंत्रण देणारी ठरली. पहिल्या इंग्रज मराठा युद्धाच्या अखेरीलाच इंग्रज मराठ्यापेक्षा शक्ति सामर्थ्यांत फारसे उणे नाहीत हे उघड झाले होते. त्या नंतरच्या वीस वर्षाच्या काळात तर इंग्रजांच्या स्थितीत चांगलाच बदल घडून आला होता. या उलट मराठा राज्याचे चित्र अतिशय चिंताजनक बनले होते. सवाई माधवराव वयाने लहान असल्यामुळे सर्व

सत्ता नाना फडणवीसाच्या हाती केंद्रित होती. याचवेळी शिंदे व होळकर यांच्यामध्ये कमालीचा वैरभाव होता. यांच्यात ऐक्य घडवून आणण्याचे काम नानाकडून झाले नाही. यामुळे राजकीय, आर्थिक व लष्करी ह्या सर्वच बाजूंनी मराठ्यांची घसरण झपाट्याने झाली. यातच सवाई माधवरावांचा मृत्यू झाला. यानंतर वारसा हक्काच्या कारणावरून मराठा सरदारातील यादवी विकोपाला गेली. याचा फायदा वेलस्लीने घेतला. सवाई माधवरावानंतर बाजीराव दुसरा हा सत्तेवर आला; पण याला कोणीही विचारत नव्हते हा सर्व बाजूंनी संकटाने घेरला होता. १७९८ पासून मराठा राज्यातील सर्वच लहान मोठ्या प्रमुखातील अंतस्थ कलहांना पारावार उरला नाही. यावेळी शिंदे व होळकर यांच्यातील वादाने कळस गाठला होता. या सर्व बाबींचा फायदा वेलस्लीने घेऊन बाजीराव दुसऱ्यास तैनाती फौज स्वीकारण्याचे फर्मावले; परंतु सुरुवातीस पेशव्याने या बाबीकडे दुर्लक्ष केले; परंतु होळकराकडून पेशवे व शिंदेच्या फौजांचा पराभव झाल्यामुळे याचा फायदा वेलस्लीने घेऊन बाजीरावास तैनाती फौज स्वीकारण्यास भाग पाडले. शेवटी नाईलाजाने ३१ डिसेंबर १८०२ रोजी बाजीरावाने वसई येथे करारावर स्वाक्षरी केली. या करारामुळे ब्रिटीशांना मोठा आर्थिक फायदा झाला. या करारानूसार अनेक जाचक अटी वेलस्लीने पेशव्यावर लादल्या. बाजीरावाने करार केला; परंतु या बरोबरच पेशव्याने शिंदे व भोसलेंना पुण्यातून इंग्रजांना हाकलून लावण्यासाठी फौजेसह पुण्याला येण्याचे आदेश दिले. मराठ्याविरुद्धच्या युद्धाची शक्यता वेलस्ली धरूनच चालत होता. यासाठी त्याने पूर्ण तयारी केली होती. पेशव्याच्या सूचनेप्रमाणे शिंदे व भोसले आपल्या फौजेसह सज्ज होता. ही बाब चाणाक्ष ब्रिटीशांच्या नजरेतून चुकने शक्य नव्हते. वेलस्लीने कर्नल कॉलिन्सला शिंदे सोबत वाटाघाटी करण्यासाठी पाठविले; परंतु उभयंतातील वाटाघाटी निष्फळ ठरताच कर्नल कॉलिन्स वेलस्लीच्या आदेशानूसार शिंदेच्या छावणीतून माघारी वळला आणि लागलीच ब्रिटीशांनी शिंदे व भोसले यांच्याविरुद्ध युद्धाची तोफ डागली. उभयंतात मोठा संघर्ष झाला. शेवटी या युद्धात मराठे पराभूत झाले.''[२४]

वरील युद्धात पेशव्यांच्या विरोधात व ब्रिटीशांच्या बाजूने अनेक महार व अस्पृश्य जातींनी संघर्ष करून आपला पराक्रम दाखविला. अनेक शतके महार, मराठा सैन्यात असल्यामुळे त्यांना मराठा सैन्याचे सर्व डावपेच माहिती होते. म्हणून महार सैन्यांनी त्यांचे सर्व डावपेच उधळवून लावून ब्रिटीशांना विजय मिळवून दिला.यासाठी खालील संदर्भ उपयुक्त ठरतो.

'During the second Maratha battle between the Marathas and the British in 1802-1803 untouchable Soldiers particularly from Madras (Present Tamil Nadu) and Maharashtra under the Command of Arthur Wellesely defeated the Marathas. The Mahar soldiers from Maharashtra for Centuries were in the Maratha armies. Hence, they knew the ins and outs of the Maratha army, So they could defeat army without much difficulty.''[२५]

दुसऱ्या इंग्रज-मराठा युद्धात ब्रिटीशांची बुद्धी व महार आणि इतर अस्पृश्यांचा पराक्रम या दोघांच्या मिलापामुळे ब्रिटीशांना यश संपादन झाल्याचे दिसून येते. पहिल्या युद्धातील अपमानाचा बदला ब्रिटीशांनी दुसऱ्या युद्धात घेतल्याचे दिसून येते.

### ५.४.४ हवालदार सुभनाक वाहनाक व मदनाक येसनाक

पेशवाईत महारांना अपमानीत व घृणास्पद वागणूक मिळाल्यामुळे त्यांना स्वकियांपेक्षा परकीय ब्रिटीश कितीतरी जवळचे वाटत होते. ब्रिटीशांनी महारांना आपली सत्ता भारतात स्थापन करण्यासाठी जवळ केले हे जरी सत्य असले तरी ब्रिटीशांनी महारांना माणूस म्हणून स्वतःच्या बरोबरीने वागविले होते. हे विसरता येत नाही. त्यांच्या स्पर्शामुळे किंवा सावलीमुळे ब्रिटीश कधीच बाटले नाहीत किंवा महारांच्या स्पर्शामुळे त्यांना कोणता रोग अथवा हानी देखील झाली नाही. उलट महारांना त्यांनी जवळ केल्यामुळे त्यांचे साम्राज्यमात्र बळकट झाले.एवढेच नाही

तर महाराव्यतिरिक्त मराठे,मुस्लिम व इतर धर्मिय लोक देखील ब्रिटीश सैन्यात होते. हे सर्व जातीधर्माचे लोक ब्रिटीश सैन्यात असताना एका पंगतीमध्ये जेवन करत होते. एकमेकांच्या अंथरुणास अंथरुण लावून झोपत होते. युद्ध मोहीमेवर जात असताना एकत्र जात होते. या ठिकाणी मात्र ते अस्पृश्यता पाळत नव्हते, पेशवाईतीलच हिंदू ब्रिटीश सैन्यात आल्यानंतर ह्या सर्व बाबी का पाळत नव्हते. हा प्रश्न पडतो. यावरून एक बाब स्पष्ट होते की, राज्यकर्त्यांतच स्पृश्य-अस्पृश्य असा भेद नसेल तर प्रजा देखील त्याप्रमाणे आचरण करते. हे ब्रिटीश धोरणावरून लक्षात येईल. म्हणून ज्या ब्रिटीश सैन्यात महारांनी प्रवेश केला होता. त्यांच्या साठी महारांनी तहान, भूक, ऊन, वारा, पाऊस या सर्व बाबींवर मात करून शेवटच्या क्षणापर्यंत ब्रिटीशांना साथ दिली.त्या मोबदल्यात ब्रिटीशांनीही महारांचा वेळोवेळी बक्षिसे व बढती देऊन सन्मान केला.यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

''इ.स. १७८७ मध्ये 'व्हायपर' नावाचे जहाज ( जे पुढे हिंदी आरमारात गणले गेले) ब्रिटीश नौका गल्फऑफ कच्छ हे मरीन बटालियनच्या एका तुकडीसह इराणच्या आखातात कामगिरीस असताना भूशीर पार करीत होते या जहाजावर महार सैनिक होते व ते जेवायला बसले होते. अशावेळी काही सूचना नमिळताच या जहाजावर १३ जानेवारी १७८७ रोजी एकाचवेळी लढाऊ बोटींनी हल्ला केला. त्यावेळी जहाजावरील महार सैनिकांनी केलेल्या कडव्या प्रतिकारामुळे चारही हल्लेखोर बोटींना पळून जावे लागले. जहाजावरील ६५ शिपाई अतिशय शौर्याने व जिद्दीने लढले. त्यापैकी ३२ जण मरण पावले.या शौर्याची ब्रिटीशांनी दखल घेतली.''[२६]

''हिंदुस्थानच्या तत्कालीन सर सेनापतीने जनरल ऑर्डरसमध्ये या बहादर मरीन बटालियनच्या तुकडीला खालीप्रमाणे धन्यवाद दिले. व्हायपर जहाजावरील मरीन बटालीयनच्या तुकडीने अतिशय कठीण परिस्थितीमध्ये हल्ला झाला असता आपल्या जहाजाचे संरक्षण करताना जो खंबीरपणा व शौर्य दाखविले त्याचे सरकारला अतिशय सन्माननीय असे वाटते हे त्या शिपायांना कळविण्यास सरसेनापतीला विशेष आनंद होत आहे. याबद्दल त्या

तुकडीतील प्रत्येकाला योग्य वेळी जाहीर समारंभात एक महिन्याचा भरपगार बक्षिस म्हणून देण्यात येईल आणि हवालदार सुभनाक वाहनाक, याला चांदीची साखळी आणि बॅच देण्यात येत आहे. हवालदार मदनाक येसनाक याला सुद्धा याच लढाईत मर्दुमकी गाजविण्याबद्दल जमादार करण्यात आले''[२७]

### ५.४.५ हवालदार धोंडनाक पुंडनाक

ब्रिटीश सैन्यामध्ये राहून अनेक महारांनी गौरवपूर्ण कामगिरी केली होती. ज्याप्रमाणे सुभनाक वाहनाक व मदनाक येसनाक या महारांनी स्वतःच्या जीवाची पर्वा न करता शत्रूस नामोहरम केले व ब्रिटीशाकडून गौरव प्राप्त करून घेतला. त्याप्रमाणेच १८१० मध्ये धोंडनाक पुंडनाक व त्याच्या सहकाऱ्यांनी अतोनात छळ सहन केला; परंतु त्यांनी मालकाशी गद्दारी करून शत्रूशी हातमिळवणी केली नाही. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

''फ्रेंच अधिकारी इंग्रजांच्या सैनिकांना कैदेत चांगले वागवीत. त्यांना चांगले अन्न, कपडे व पैसे देत आणि इंग्रजांची नोकरी सोडून फ्रेंचाची नोकरी पत्करा म्हणून मने वळविण्याचा प्रयत्न करीत. मराठ्यांच्या दुसऱ्या युद्धाच्या वेळी फ्रेंचाच्या या अमिषाला पुष्कळ ब्रिटीश सैन्यातील कैदी बळी पडले. आरमारातील आयरीश, मद्रासी व बंगाली लोकही त्याला बळी पडले; पण मुंबईचे महार शिपाई पाघळले नाहीत. उलट जे फ्रेंचाचे हस्तक होऊन चांगले कपडे घालून फ्रेंचाचे सैनिक म्हणून मिरवीत होते. त्यांना हे मुंबईचे महार कैदी सैनिक उघडपणे शिव्या देत असत. हे स्वाभिमानाचे महार कैद्यांचे वर्तन पाहून फ्रेंचांनी त्यांचा खूप छळ केला.तेव्हा त्यातील बरेचसे महार सैनिक फ्रेंचाच्या तुरुंगातच मेले. फक्त बारा (१२) कैदी जिवंत राहिले. ब्रिटीशांनी जेव्हा फ्रेंचाचा पाडाव केला तेव्हा हे बारा महार सैनिक त्यांना परत मिळाले. ब्रिटीशांनी नंतर त्यांचा जाहीरपणे गौरव केला.''[२८]

''याच फ्रेंचाबरोब्र १८१० मध्ये इंग्रजाचे आरमारी युद्ध हिंदी महासागरात झाले होते. यात मरीन बटालीयनमधील धोंडनाक पुंडनाक याने मोठे शौर्य दाखविले म्हणून त्याला रूप्याचे (चांदीचे) पदक बक्षिस दिले तसेच त्याला लेफ्टनंट हवालदार म्हणून बढती देण्यात आली.''[२९]

वरील माहिती वरून स्पष्ट होते की, ज्यांच्या नोकरीत महार लोक असत त्या धन्याशी ते अत्यंत इमानदारीने वागत, प्राण संकटात असले तरी ते धन्याशी बेईमान होत नसत. ज्याचे आपण मीठ खातो त्यांच्या करीता वेळ प्रसंगी आत्मसमर्पण करण्याची तयारी अस्पृश्यांच्या अंगी बाणलेली आहे. याचे वरील घटना ज्वलंत उदाहरण आहे. महार शत्रूचे कैदी झाले आणि त्यांना कितीही मोठे आमिषे दाखविली किंवा त्यासाठी त्यांचा कितीही छळ केला तरी महार लढवये शत्रूंना सामील होत नसत किंवा शत्रूला शरण जात नसत हे वेळो-वेळीच्या प्रसंगावरून सिद्ध झाले आहे.

### ५.४.६ खडकीची लढाई व महार (१८१७) :

५ नोव्हेंबर १८१७ रोजी पेशवा बाजीराव दुसरा आणि इंग्रज यांच्यात खडकीची लढाई झाली आणि फारच अल्पावधीत पेशव्यांची सत्ता संपुष्टात आली. इंग्रज आणि पेशवे यांचे सलोख्याचे संबंध असताना या लढाईची कारणे काय होती हे पहाणे आवश्यक आहे. शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले या महाराष्ट्रातील मोठ्या-मोठ्या राजांनी एकत्र येऊन मराठा कॉन्फिडरसी स्थापन केली होती व तिच्यात मराठ्यांचे खरे सामर्थ्य होते, हे सामर्थ्य कमी करणे हे इंग्रजाचे राजकारणातील मुख्य धोरण होते आणि हे धोरण सिद्धीस नेण्याला ३१ डिसेंबर १८०२ रोजी झालेला वसईचा तह हे प्रमुख कारण ठरले. पेशव्यांनी इतर मराठे राजांशी स्वतंत्रपणे कोणताही संबंध ठेवूनये, काही बोलणी करावयाची असतील तर, ती इंग्रजामार्फतच करावी, तसेच सदरच्या मराठे राजांशी, काही भांडणे उपस्थित झाली तर ती भांडणे इंग्रजामार्फतच मिटवावी म्हणजेच त्यांना सर्व अधिकार असल्यामुळे त्याचे निकाल इंग्रजच देतील ही फार महत्त्वाची अट इंग्रजांनी बाजीराव पेशव्याशी केलेल्या तहामध्ये समाविष्ट करून घेतली आणि त्यामुळे मराठ्यांची मराठा कॉन्फिडरसी आपोआप नष्ट झाली आणि पेशव्यांचे वर्चस्व कमी होऊन इंग्रजांशी वैमनस्य निर्माण झाले. या वैमनस्यातूनच खडकीची लढाई झाली. या लढाईचा घटनाक्रम खालीलप्रमाणे स्पष्ट करता येईल.

''बडोद्याच्या गायकवाडापाशी पेशवे सरकारचा काही देण्या-घेण्याच्या संबंधाने वाद सुरू होता व यासाठी इंग्रजांच्या संरक्षणाखाली पेशव्यांशी बोलणी करण्याकरीता गंगाधर शास्त्री हे वकील म्हणून पुण्यास आले; परंतु त्यांचा पंढरपूर येथे खून झाला. हा खून बाजीरावाच्या मसलतीने त्रिंबकजी डेंगळे यांनी केला असे गायकवाडांच्या वतीने इंग्रजांनी आपले म्हणने मांडले व त्रिंबकजी डेंगळे यांना पकडून आमच्या स्वाधीन करण्याची बाजीरावांकडे मागणी केली. त्याप्रमाणे त्याला पकडून ठाण्याच्या तुरुंगात ठेवण्यात आले होते. तेथून तो पळाला. त्यामुळे बाजीराव या कामी टाळाटाळ करीत आहेत. या सबबीवर ८ मे १८१७ रोजी इंग्रजांनी पुण्याला आपल्या सैन्याचा वेढा दिला. त्यावेळी नाईलाजास्तव बाजीरावास इंग्रजाशी दि. १३ जून १८१७ रोजी तह करून त्यांच्या सर्व अटी मान्य कराव्या लागल्या. या तहास 'पुण्याचा तह' असे नाव आहे. या तहाने पेशव्याचा फार मोठा मुलूख इंग्रजांच्या ताब्यात गेला. इंग्रज अधिकाऱ्यांकडून प्रशिक्षण घेतलेली पेशव्यांसाठीची फलटण इंग्रजांनी आपल्या ताब्यात घेतली. अशा प्रकारच्या इंग्रजांशी झालेल्या तहामुळे इंग्रजांची सत्ता वाढत गेली व पेशव्यांची सत्ता कमी होऊ लागली ही बाब बाजीरावांच्या मनाला लागून राहिली. त्यासाठी ते मार्ग शोधू लागले या कामी त्यांनी हैद्राबादवरून भेटण्यास आलेले सर जॉन मालकम यांचा सल्ला घेतला. त्यांनी त्यांना इंग्रजांशी इमानेइतबारे वागून नेहमी मदत व सहकार्य करावे असा सल्ला दिला. त्याप्रमाणे उत्तर हिंदूस्थानातील पेंढाऱ्याचे बंड मोडून काढण्यासाठी इंग्रजांना सैनिकांची मदत म्हणून बाजीराव सैन्य ठेवू लागला; परंतु पुण्याच्या दरबारातील इंग्रजांचे रेसिडंट एलफिन्स्टन साहेब यांचा बाजीरावावर विश्वास नव्हता आणि त्यामुळे बाजीराव नवीन सैन्याची जमवाजमव करून कदाचित आपल्यावर हल्ला करण्याची शक्यता आहे. असा त्यांचा समज झाला. याच सुमारास उत्तर हिंदुस्थानातील पेंढारे लोकांचे बंड मोडून काढण्यासाठी म्हणून इंग्रजांचे जे एक मोठे सैन्य ठिकठिकाणी जमा होत होते. त्यापैकी ब्रिगेडियर जनरल स्मिथ यांच्या ताब्यातील फोर्थ डिव्हीजनमधील लष्कर खानदेशातून कूच करीत हळूहळू अहमदनगरकडे येत होते व मुंबईची

एक युरोपीयन फलटण, मद्रास नेटिव्ह घोडेस्वाराची दुसरी फलटण आणि मद्रास नेटिव्ह इन्फन्ट्रीच्या पंधराव्या रेजिमेंटमधील दुसरी फलटण अशा प्रकारचे सैन्य मुंबईहून पुण्याकडे चाल करून येत होते. मुंबईकडून येणारे सैन्य आणि अहमदनगरकडे येणारे स्मिथ साहेबांच्या हाताखालचे सैन्य एकत्र व्हायचे होते, या इंग्रजी लष्कराला 'आर्मी ऑफ दी डेक्कन' असे नाव देण्यात आले होते. अशा प्रकारे दोन्हीकडून आपआपल्या बाजूच्या सैन्याची जमवाजमव सुरू होती. तरी या वेळी पेशव्यांनी इंग्रजांशी लढाई करावी किंवा करू नये या महत्त्वाच्या प्रश्नावर बाजीरावाने सरदारांशी सल्ला मसलत करण्याचा निर्णय घेतला, त्यावेळी फारच कमी सरदारांनी लढाई करण्याचा सल्ला दिला. कारण इंग्रजांची फौज आपल्यापेक्षा सरस असल्याने त्यांच्याशी आता लढाई करून यश मिळणार नाही, असे त्यांचे मत होते. बाजीरावांना सरदारांचा सल्ला न पटल्यामुळे त्यांनी लढाईची जोरदार तयारी केली, पुण्यात सरदार जमा झाले, त्यात निपाणकर, भोसले (अक्कलकोटवाले), निंबाळकर,घोरपडे, जाधव, विंचुरकर, पटवर्धन, बापू गोखले, भोईटे, पुरंदरे इत्यादी व नवीन फौज मिळून लाख, सव्वा लाख घोडे मिळाले, याशिवाय पायदळ, अरब, रोहिले, पठाण, सिद्दी, गोसावी, रजपूत, रांगडे, मुसलमान असे ५०,००० पायदळ असा सरंजाम तयार झाला.या सगळ्या लष्कराचे नेतृत्त्व बापू गोखले यांच्याकडे देण्यात आलेले होते. बाजीरावाच्या सैन्याची छावणी गारपीरच्या बाजूला पडू लागली. परंतु गारपीरावर कर्नल बर यांच्या हुकुमतीखाली इंग्रजाच्या फलटणी पुष्कळ दिवसापासून तळ ठोकून होत्या. या इंग्रजी लष्करात नेटिव्ह इन्फन्ट्रीच्या सहाव्या आणि सातव्या रेजीमेंटमधील मिळून १२०० शिपाई होते व त्यांच्याकडे 'दोन तोफाही होत्या. हे इंग्रजी लष्कर सध्या जेथे जिल्हाधकिारी कार्यालय आहे, ज्याचा सभोवतालचा परिसर म्हणजेच गारपीरवर होते. इंग्रजांच्या या छावणीच्या सभोवताली पेशव्यांच्या लष्करी छावण्या येऊन पडल्या व गोसावी लोकांच्या छावण्या वानवडीच्या मैदानावर उतरल्या. त्याचप्रमाणे संगमावरीलर रेसिडेंट मि. एल्फिस्टन यांचा बंगला आणि भांबुर्डेगाव याच्या दरम्यानच्या मैदानावर विंचुरकरांचे घोडेस्वार, पायदळ आणि तोफखाना

याचा तळ येऊन पडला, अशाप्रकारे इंग्रजांची फौज ही पेशव्यांच्या लष्कराकडून चोहोबाजूने हळूहळू वेढली गेली. अशा रितीने मराठ्यांच्या सैन्याची संपूर्ण तयारी झाल्यानंतर इंग्रजांच्या छावणीवर ताबडतोब हल्ला करावा असे मराठा सरदारांचे मत होते. परंतु बाजीरावाने हा बेत रहित केला. बाजीराव पेशव्यांचे सैन्य केव्हाही आपल्यावर हल्ला करतील, म्हणून मि. एल्फिस्टन साहेबांनी मुंबई व अहमदनगरच्या युरोपियन फलटणींना ताबडतोब मदतीला यावे असा हुकूम पाठवीला. त्यापैकी मुंबईचे सैन्य ताबडतोब म्हणजे ३० ऑक्टोबर १८१७ रोजी खडकीस येऊन पोहोचले. कर्नल बर यांच्या अधिपत्याखालील गारपीरावरील इंग्रजांचे सैन्य सुरक्षिततेमुळे ताबडतोब खडकी येथे हलवण्यिात आले हे सैन्य होळकर पुलाच्या जवळपास व खडकी गावापर्यंत जाऊन पोहोचले. पेशव्यांनी मेजर फोर्ड यांच्या नेतृत्त्वाखाली जी फलटण तयार केली होती. तिचे वास्तव्य दापोडी येथे होते. वेळप्रसंगी ती इंग्रजांच्या खडकीतील सैन्याच्या मदतीला येऊ शकणार होती.''।[३०]

वरील परिस्थितीचा आढावा घेत असे दिसते की, 'वसईचा तह' बाजीराव दुसऱ्याने मान्य केला असला तरी ब्रिटीशाबद्दल त्याच्या मनात मोठा आकस होता. सरदारांनी ब्रिटीशांसोबत युद्ध करण्यास नकार दिला असतानाही विनाकारण बाजीराव दुसऱ्याने इंग्रजांना आव्हान दिले. ही बाब ब्रिटीश पूर्वीपासून ओळखून होते म्हणून त्यांनी बेसावध न राहता बाजीराव सोबत दोन हात करण्याची तयारी केली होती. उभयंतातील युद्ध सज्जता हेच पुढे खडकीच्या युद्धास कारण ठरले.या खडकीयुद्धाचा वृत्तांत पुढीलप्रमाणे सांगता येईल.

'५ नोव्हेंबर १८१७ रोजी पेशव्यांचे सैन्य इंग्रजावर हल्ला करण्यासाठी दुपारी ३.०० वाजता पुण्याहून बाहेर पडले. एल्फिन्स्टन साहेब संगमावरील रेसिडेन्सीमधून आपल्या ५००- सैन्यासह होळकर पुलावरून खडकीला सुरक्षित पोहोचले व त्यांनी ताबडतोब लढाईस सुरूवात करण्याचे आदेश दिले. दापोडी येथे मेजर फोर्ड यालाही ताबडतोब फलटण घेऊन खडकीच्या सैन्याला येऊन मिळण्याबाबत निरोप पाठविण्यात आले. मराठ्यांचे पायदळ, घोडेस्वार, तोफा

वगैरे सर्व लष्कर चतुर्शिंगीच्या जवळ गणेश खिंडीच्या डोंगरापासून संगमावरील रेसिडेन्सीच्या जागेपर्यंतच्या मधल्या मैदानात चोहोकडे पसरले होते. त्यात बापू गोखले, मोरे, दीक्षित, चिंतामणराव आप्पा पटवर्धन, तासगावकर, मिरजकर, आप्पाजी पाटणकर, घोरपडे, पुरंदरे, राजेबहाद्दर व अक्कलकोटवाले इत्यादी राजे व सरदार होते. पेशव्यांची फौज फार मोठी होती. त्या मानाने इंग्रजांचे लष्कर खुपच लहान असून ते कर्नल बर यांच्या नेतृत्त्वाखालील पेशव्यांच्या सैन्याला खडकीच्या मैदानावर तोंड देण्यासाठी सज्ज होते. इंग्रज सैन्याच्या मध्यभागी युरोपीयन फलटण, रेसिडेंटने आपल्या बरोबर आणलेले शिपाई आणि सहाव्या रेजिमेंटच्या दुसऱ्या बटालियनपैकी एक तुकडी, तसेच मुळानदीच्या बाजूला सातव्या रेजिमेंटची पहिली बटालीयन होती आणि खडकी गावाजवळ पहिल्या रेजिमेंटपैकी दुसरी बटालीयन होती आणि दोन्ही टोकाला एक एक तोफ होती. दापोडीहून, खडकीकडे आगेकूच करीत असलेल्या कर्नल फोर्डच्या सैन्याला खडकीपर्यंत जाऊ न देण्यासाठी पेशव्यांचे मोठे प्रधान, मोरे, दीक्षित व रास्ते त्या दिशेला वळले, त्यांनी मेजर फोर्डवर हल्ला करण्याचे ठरविले. मोरे, दीक्षिताचे घोडेस्वार मेजर फोर्ड यांच्या उजव्या बाजूच्या शिपायाजवळ येत आहेत. असे पाहून पेशव्यांचे स्वार आपल्या माऱ्याच्या आटोक्यामध्ये येण्याइतके जवळ आल्यावर मेजर फोर्डयांनी आपल्या बटालियनला तोफातून गोळे व बंदुकातून गोळीबार सुरू करण्याविषयी हुकूम दिला. त्यामुळे मोरे दीक्षितांचे सैन्य खडकीच्या बाजूला वळले. तेथेही यांच्यावर तोफांचा भडीमार सुरू झाला. त्यात मोरे, दिक्षितांना एक गोळा लागून ते मरण पावले, त्यामुळे त्यांच्या सैन्यात धादल उडाली व सैन्य माघारी फिरले, मेजर फोर्डच्या मार्गातील अडथळा दूर झाल्यामुळे तो कर्नल बर यांच्या सैन्याला येऊन मिळाला. पेशव्यांकडील अरब व गोसावी यांनी सातव्या रेजिमेंटची पहिली बटालियन व सहाव्या रेजिमेंटची दुसरी बटालियन यांच्यावर हल्ला चढविला. या हल्ल्याचे नेतृत्त्व पेशव्यातील पोर्तुगीज सेनापती डी.पीटो यांच्याकडे होते; परंतु तो या हल्ल्यात मरण पावला. इंग्रज सैन्यही हल्ल्यासाठी पुढे सरसावले; पण कर्नल बर याने त्यांना थांबविले गोळीबार करण्याचा आदेश

दिला. बापू गोखले हा यशस्वीरित्या पुढे घुसला; पण त्यांच्या घोड्याला जखम झाल्यामुळे त्याला माघार घ्यावी लागली, परंतु त्याच्यामागे असलेले दुसरे सरदार पुढे सरसावले व त्यांनी आपल्या सैन्याची दौड चालूच ठेवली. पुढे त्यांना दलदल असलेला एक खोल ओढा लागला त्यामुळे ते दलदलीच्या चिखलात एका पाठोपाठ एक येऊन पडले. अशा प्रकारे या लढाईत हल्ले-प्रतिहल्ले सुरू होते. दोन्हीकडचे अनेक सैनिक धारातीर्थी पडले. बरेच जखमी झाले. लढाई चालू असताना हळूहळू अंधार पडू लागला त्यामुळे संध्याकाळी सातच्या दरम्यान ही लढाई संपली व पेशव्यांचे सैन्य पूणे शहराकडे माघारी गेले. मराठ्यांचे सैन्य माघारी फिरल्यानंतर मेजर फोर्ड देखील आपले सैन्य घेऊन दापोडीला परतला आणि कर्नल बर हा ब्रिगेडसह कूच करून रात्री आठ वाजता खडकी येथील आपल्या छावणीत परतला. या लढाईत पेशव्यांचा पराभव झाला.'।[३१]

खडकीच्या युद्धामध्ये इंग्रजाच्या छोट्यासैन्याने प्रचंड अशा पेशव्यांच्या सैन्याचा दारुण पराभव केला. या खडकीच्या लढाईत अनेक महारांनी आपल्या तलवारीचे पाणी पेशव्यांना पाजले. म्हणून ही लढाई ब्रिटीशांच्या वतीने महारांनी लढली होती. ही भारतीय इतिहासातील अतिशय महत्त्वपूण घटना मानली जाते. खडकीच्या लढाईत महार पेशव्यांच्या विरुद्ध लढण्यास अनेक कारणे कारणीभूत आहेत. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

'Relationship of Bajirao peshwa with British rule strained which lead to the battle of khadki (presently khadki is in pune). The Battle of Khadki of 1817 was fought by the Mahar soldiers on behelf of the Britishers. Itis striking event in the Indian history for following reasons,|

(a) the Mahars helped in establishing, protecting and continuing the Maratha rule in Maharastra.

(b) The Mahars not only disliked the Peshwa rule, the off spring of Maratha rule but bent upon destroying it.
(c) Surprisingly in the Battle of khadki in 1817, they joined hands with foreign rule against native rule.
(d) in the Battle of khadki only a few suppressed Mahar soldiers fought the battle with large organised and trained army of Bajirao Peshwa at khadki and badly defeated him'।[१४]

खडकी युद्धाचा वृत्तांत पहाता एक बाब कळते की, महारांनी पेशव्यासोबत युद्ध केले, नव्हते तर त्यांच्या प्रवृत्ती विरुद्ध युद्ध केले होते. कारण पेशव्यांनी महारांना कधीच माणूस म्हणून वागणूक दिली नव्हती तर त्यांचा गुलामाप्रमाणे वापर करून घेतला होता. महारांजवळ उदरनिर्वाहाचा कोणताच पर्याय नव्हता म्हणून पेशव्यांचा तोंड दाबून बुक्यांचा मार सहन केला; परंतु जेव्हा महारांना इंग्रजांच्या माध्यमातून पर्याय मिळाला. तेव्हा महारांनी वेळोवेळी सिद्ध करून दाखविले की पेशवाईस आतापर्यंत जिवंत ठेवण्यात महारांनी मोठा हातभार लावला होता. म्हणून खडकीची लढाई महारांसाठी भारतीय इतिहासातील अतिशय महत्त्वपूर्ण घटना आहे.।

## ५.५ कोरेगावची लढाई व महारांचा पराक्रम :

५ नोव्हेंबर १८१७ च्या खडकीच्या लढाईत पेशव्यांच्या फौजेचा इंग्रज सैन्याकडून मोठा पराभव झाला होता. या युद्धापूर्वी पेशवे व इंग्रज यांच्यातील मैत्री तह हा नावा पुरता होता. हे या घटनेवरून स्पष्ट होते. खडकीच्या युद्धातील पराभव पेशव्यासाठी मोठा अपमानास्पद प्रसंग होता. म्हणून पेशवा आणि इंग्रज यांच्यात पुन्हा संघर्ष होण्याची मोठी शक्यता होती. पेशव्यांना पत्करावा लागलेला दारुण पराभव स्वस्थ बसू देत नव्हता तर ब्रिटीशांना पेशवाईचे समूळ उच्चाटन करून महाराष्ट्रात आपले स्थान प्रबळ करावयाचे होते. म्हणून उभयंतामध्ये

संघर्षमय वातावरण होते.शेवटी १ जानेवारी १८१८ रोजी उभयतांमध्ये युद्धाचा भडका उडाला आणि हे युद्ध पेशव्यासाठी मृत्यूघंटा ठरले. या युद्धानंतर महाराष्ट्रातील पेशवाईस कायमची मुठमाती मिळाली. या पेशवाईच्या मुठमातीस महाराष्ट्रातीलच दुखावले गेलेले व अनेक वर्षापासून पेशव्यांचा अन्याय अत्याचार सहन करणारे महार कारणीभूत होते. यासाठी पुढील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो.

''इ.स. १८१७ च्या नोव्हेंबर महिन्यात पेशव्याच्या सैन्याने पुण्यामधील ब्रिटीशांच्या वकिलातीवर हल्ला केला. हा हल्ला परतवून लावण्यासाठी कर्नल बर याने निकराचा प्रयत्न केला; परंतु कर्नलबर पेशव्यांच्या प्रचंड सैन्यापुढे हतबल झाला. या संधीचा फायदा घेऊन पेशव्याने परत कर्नलबरच्या सैन्यावर हल्ला केला. यावेळी सेकंड बटालियन फर्स्ट रेजिमेंट बॉम्बे नेटिव्ह इंन्फन्ट्री हिचा मुक्काम पुण्याच्या वायव्येस ३८ मैलावर अलेल्या शिरूर गावात होता. तिचा प्रमुख कॅप्टन फ्रान्सीस स्टॉटन हा होता. पेशव्यांच्या प्रचंड सैन्यास दुसऱ्यांदा तोंड देणे कर्नल बर यास शक्य नसल्यामुळे त्याने कॅप्टन स्टॉटनला पुण्याच्या वकिलातीच्या संरक्षणाकरीता मदतीस येण्याबद्दल तातडीने संदेश पाठविला. यानुसार कॅप्टन स्टॉटन शिरूरहून पुण्याकडे जाण्यास सेकंड बटालियनला घेऊन ३१ डिसेंबर १८१७ रोजी रात्री आठ वाजता निघाला. या बटालियनमध्ये बहुसंख्य सैनिक महार होते. कॅप्टन स्टॉटन बरोबर ५०० पायदळ, ३०० घोडदळ, पाच बटालियन ऑफिसर्स, २०६ पौऊंडर तोफा आणि त्या चालविणारे २४ ब्रिटीश सैनिक, एवढा लवाजमा होता. यासर्व अधिकारी व सैनिकांनी २५ मैलाचा रात्रभर प्रवास केला. एवढा लांबचा प्रवास करून ही बटालीयन पहाटेला भीमा नदीच्या तीरावर आली. कोरेगावच्या टेकडीवरून सभोवताली पाहिल्यानंतर पेशव्यांचे प्रचंड सैन्य नदीच्या दुसऱ्या तीरावर लढाई करीता सज्ज असलेले दिसले. यावेळी पेशव्याच्या सैन्यात ५ हजार पायदळ व २५ हजार घोडदळ होते. पेशव्यांच्या सैन्याने आपणास खतम केले तर कर्नलबरला देखील ते संपवून टाकतील आणि हे पाहून मध्य हिंदुस्थानातील शिंदे, होळकर व भोसले हे जनरल स्मिथला मोडून

टाकतील यामुळे ब्रिटीश राज्याचा हिंदुस्थानातील पायाच उखडला जाईल. हे भविष्य इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांना दिसत होते. म्हणून कॅप्टन स्टॉर्टन पेशव्यांच्या सैन्याचा कसा पाडाव करता येईल याची व्यूहरचना करत होता. कॅप्टन स्टॉटनने पेशव्यांच्या सैन्यास हुलकावण्या देऊन कोरेगाव या खेड्यात प्रवेश केला. या गावाला मातीचे कुसू होते. हे कुस आणि गावातील घरे यामुळे पेशव्याच्या घोडदळाला गावात शिरून लढाई करणे कठीण होते, हे कॅप्टन स्टॉटने हेरून गाव आपल्या ताब्यात घेतला आणि भीमा नदीच्या किनाऱ्यावर शिरूरला जाणाऱ्या रस्त्यावर जेथून पेशव्यांच्या सैन्यावर अचूक मारा करता येईल अशा ठिकाणावर त्याने दोन तोफा डागल्या, गावाच्या मध्यभागी जी गढी होती तिच्यावर त्याने तोफ डागली नाही. त्यामुळे पेशव्याचे सैन्य गावात शिरताना, त्यावर तोफेचे गोळे झाडून तो सैन्याचा गावातील प्रवेश थांबवू शकला नाही. त्यामुळे गावातील चकमकीत त्याला आपले बरेचसे सैन्य गमवावे लागले. पेशव्याच्या प्रचंड सैन्यापुढे इंग्रजांचा निभाव लागतो की नाही अशी परिस्थिती निर्माण झाली त्यातच भरीस भर म्हणून इंग्रजांचा तरुण तडफदार अधिकारी लेफ्टनंट पॅटिन्सन आणि लेफ्टनन्ट चिशोल्म हे या लढाईत मारले गेले. लेफ्टनन्ट चिशोल्म याला खूप निर्दयपणे मारण्यात आले. कॅप्टन स्टॉटने आपल्या सर्व सैनिकाचे लक्ष या घटनेकडे केंद्रीत केले व प्राणपणाने पेशव्यांना टकर देण्याचे आव्हान केले. मरण पत्करा; पण शरण जाऊ नका, यानंतर इंग्रज लष्कराने मोठ्या हिंमतीने हल्ले चढविले. महार सैनिकांनी पेशव्याच्या सैन्याला फुलगावच्या दिशेला पळवून लावले. खुद्द बाजीराव दुसऱ्यांनी या अगोदरच पळ काढला होता. त्रिंबकजी डेंगळे, विंचुरकर, शिंदे व होळकर यांनीसुद्धा अपयशी होऊन फुलगावच्या दिशेने पलायन केले. सकाळी नऊ वाजता सुरू झालेली ही लढाई अखेर रात्री नऊ वाजता संपली. १ जानेवारी १८१८ रोजी रात्री नऊ वाजता पेशव्यांच्या सैन्याने पळ काढला. इंग्रजांच्या सैन्याने त्यांचा पाठलाग केला तो भीमा नदीपर्यंत. नदीतील पाणी पिऊन त्यांनी आपली २५ तासांची तहान भागविली. पेशव्यांच्या सैन्याला पळ काढावयास लावणारी जी प्रमुख तुकडी होती ती सर्व महार

सैनिकांची होती. त्यांनी आपल्यापेक्षा ४० पट संख्येने जास्त असेलल्या पेशव्यांच्या सैन्याचा पराभव केला. इंग्रजांच्या सर्व सैनिक व अधिकारी लढवय्यापैकी २७५ लढवय्ये जखमी अगर मरण पावले आणि पेशव्यांचे ६०० लोक कामास आले. इंग्रजांच्या सैन्यातील २० महार सैनिक ठार झाले तर ३ जखमी झाले.''[३३] १ जानेवारी १८१८ रोजी झालेले कोरेगावचे युद्ध महार सैनिकासाठी अत्यंत भुषणावह बाब होती. पेशवाईत फक्त महारांनाच ते पराक्रमी, शौर्यवान व बुद्धीमान असतानाही पशुतूल्ये जीवन जगण्यास भाग पाडत असल्यामुळे महार दुखावलेले होते. या घृणास्पद वागणूकीस त्रस्त झालेले होते. त्यामुळे पेशव्यांच्या सत्तेविरूद्ध ते भडकले होते. या युद्धापूर्वी महारांचा सरदार शिदनाक दुसरा याने स्वाभिमान प्रकट करून श्रीमंत बाजीराव पेशव्यांना पेशवाईतील आपली अस्मिता बदलण्याबाबत विनंती करून त्यासाठी महार सैनिक आपले प्राण मायभूमीसाठी देण्यास तयार असल्याचे जाहीर केले. तरीही त्यांनी ही विनंती अतिशय तिरस्काराने अमान्य केली होती आणि म्हणून महारांची संख्या अल्प असली तरी ते अत्यंत शौर्याने, त्वेषाने व प्राणपणाने लढले. आपल्या प्राणांची आहुती दिली आणि अस्पृश्यतेची अत्युच्चपरिसीमा गाठलेल्या पेशव्यांच्या राज्यसत्तेविरुद्ध हे एक प्रकारे बंडच पुकारले असे म्हणणे वावगे ठरणार नाही. कोरेगावची लढाई इंग्रज बहाद्दरांनी मोठ्या इर्षेने मारली. ज्या भिमा नदीच्या तिरावर ही लढाई झाली तेथेच एक रणस्तंभ उभारला आहे.

कोरेगावच्या लढाईत कामास आलेल्या शेकडो शिपायांची नावे ह्या स्तंभावर कोरलेली आढळतात. त्यामध्ये २३ महारांची नावे आहेत. या २३ पैकी २० शिपाई ठार झाले होते व शेवटचे तीन जखमी झाले होते. ती नावे खालीलप्रमाणे आहेत.

१) सोमनाक कमलनाक - नाईक

२) रामनाक येमनाक - नाईक

३) गोदनाक कोठेनाक - शिपाई

४) रामनाक येसनाक - शिपाई

५) भागनाक हरनाक - शिपाई

६) अंबनाक काननाक - शिपाई

७) गणनाक बाळनाक - शिपाई

८) बाळनाक कोंडनाक - शिपाई

९) रूपनाक लखनाक - शिपाई

१०) वपनाक रामनाक - शिपाई

११) विटनाक धामनाक - शिपाई

१२) राजनाक गणनाक - शिपाई

१३) वपनाक हरनाक - शिपाई

१४) रैनाक वाननाक - शिपाई

१५) गणनाक धरमनाक - शिपाई

१६) देवनाक आननाक - शिपाई

१७) गोपाळनाक बाळनाक - शिपाई

१८) हरनाक हिरनाक - शिपाई

१९) जेठनाक दैनाक - शिपाई

२०) गणनाक लखनाक - शिपाई

पुढील तीन शिपाई जखमी झाले.

२१) जाननाक हिरनाक - शिपाई

२२) भिकनाक रतननाक - शिपाई

२३) रतननाक धाकनाक - शिपाई [३४]

कोरेगावच्या पराभवानंतर पेशव्यांचे सैन्य कधीच सावरू शकले नाहीत. पेशव्यांचे सैन्य पूर्णपणे निष्प्रभ बनले. त्यांना आपल्या संरक्षणासाठी सतत भटकंती करावी लागली. त्यातच

"इ.स. १८१८ मध्येच इंग्रज सेनापती जनरल स्मथिच्या नेतृत्त्वाखाली महार सैनिकांनी सोलापूर व आष्टीच्या लढाईत पेशव्यांच्या सैन्याचा परत एकदा धुवा उडवीला."[३५] या पराभवामुळे पेशव्यांच्या सैन्यात दहशत निर्माण झाली. यामुळे लवकरच पेशव्यांचा कायमचा पराभव होऊन मराठा सत्तेचा अस्त झाला.

कोरेगावच्या युद्धामुळे पेशव्यांना धडा शिकविण्याची नामी संधी इंग्रजांच्या माध्यमामधून महारांना मिळाल्याचे दिसून येते. इंग्रजांनी अस्पृश्यतेकडे लक्ष न देता महारांच्या शौर्य गुणाकडे लक्ष दिले. आपल्या लष्करात महारांना मोठ्या प्रमाणात प्रवेश दिला. त्यांना लष्करी शिक्षण दिले आणि ब्रिटीशांनी शूर महारांच्या अभूतपूर्व पराक्रमानेच कोरेगावचे युद्ध जिकले. महारांच्या या पराक्रमाला इतिहासात तोड नाही. मुठभर महारांच्या शौर्य व पराक्रमाचे प्रतिक म्हणून भिमा कोरेगावचा विजयस्तंभ आजही साक्षी रुपाने उभा आहे.

"या लडाईत धारातीर्थी पडलेल्या व जखमी सैनिकाच्या स्मरणार्थ त्यांच्या पराक्रमाची किर्ती अजरामर रहावी म्हणून भिमा कोरेगाव येथे नदीच्या काठी प्रशस्त मैदानावर युद्धाची पहिली ठिणगी ज्या ठिकाणी पडली त्या ठिकाणी इंग्रजांनी भव्य असा स्तंभ उभारला आहे. २६ मार्च १८२१ रोजी या भव्य विजयस्तंभाचा पायाभरणी कार्यक्रम अत्यंत शानदार सोहळ्याने झाला. यावेळी शहिदांना बंदुकाच्या फैरी आणि तोफांची राज सलामी देण्यात आली. १८२२ मध्ये या विजयस्तंभाचे काम पूर्ण झाले. पूर्वी या विजयस्तंभाला महारस्तंभ असे नाव होते. हा स्तंभ ३२ वर्गफूट दगडाच्या चबुतऱ्यावर ६५ फूट उंच आहे."[३६] या कोरेगावच्या युद्धाबद्दल जनरल स्मिथ असे म्हणतो की, "लष्कराच्या इतिहासात कोरेगावच्या लढाईचा विजय म्हणजे शौर्य आणि पराक्रमाची गाथा आहे.'[३७] भारतीय इतिहासात या ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाच्या लढाईतील मुठभर महार सैनिकांच्या पराक्रमाची यशोगाथा सुवर्णाक्षरांनी लिहिण्यासारखी आहे. त्यामुळेच या विजयस्तंभावर महार सैनिकांच्या पराक्रमाबद्दल इंग्रजीत एक वाक्य लिहिले आहे.

"One of the proudest triamphs of the British Army in the East"

''पूर्वेकडील देशात ब्रिटीश सैन्याला जे अनेक विजय मिळालेले आहेत. त्यामध्ये अतिशय गर्व बाळगण्यासारखा हा विजय आहे.'' [३८] ब्रिटीशांनी मिळविलेल्या युद्धातील अनेक विजयापैकी हा विजय अत्यंत महत्त्वपूर्ण होता. म्हणून ही घटना शेवटपर्यंत ब्रिटीशांच्या स्मृतीत होती. याचाच एक भाग म्हणून

''महार बटालियनसाठी एक बॅज तयार करण्यात आला होता. त्या बॅज वर कोरेगावचा विजयस्तंभ भरण्यात आला होता. हा बॅच दुसऱ्या बटालियनमध्ये लेफ्टनंट मॉर्टलमॅन्स हा एक कलाकार अधिकारी होता. त्याने हा तयार केला होता.'' [३९] महारांनी या लढाईत गाजविलेल्या गौरवपूर्ण पराक्रमामुळे ज्याप्रमाणे महार बटालीयनसाठी बॅज तयार करण्यात आला होता. या बरोबरच या शौर्याबद्दल ठार झालेल्या २० महार सैनिकापैकी ''सोमनाक कमलनाक व रामनाक येमनाक या दोन शूरवीरांच्या नावावर आज महार रेजिमेंटमध्ये दोन प्लॅटुन्स ही आहेत.'' [४०]

कोरेगावच्या युद्धात पेशव्यांच्या सैन्याचा जो दारुण पराभव झाला होता. त्याला पेशवाईतील जातीवाद हे कारण कारणीभूत होते असे वि.का. राजवाडे म्हणतात. यासाठी खालील संदर्भ महत्त्वपूर्ण ठरतो. ''संपूर्ण महाराष्ट्र हा जातीजातीत विभागल्यामुळे तो दुर्बल ठरला. ब्राह्मण राज्यकर्त्यांनी पेशवे कालखंडात अनुदार दृष्टिकोन स्वीकारला. इतर जातींना राजकारणापासून दूर ठेवले. धर्माच्या नावाखाली ब्राह्मण जातीचा फायदा व हित पाहिले. शिवकाळात जातीच्या पलीकडे पाहण्याची राज्यकर्त्यांची जी वृत्ती होती, ती पुढे राहिली नाही. त्यामूळे विविध जातीत असंतोष निर्माण होऊन त्याचा परिणाम मराठी सत्ता कमकुवत होण्यात झाला.'' [४१]

ब्रिटीश सत्ता भारतात स्थिरकरण्यामागे महारांचा सिंहाचा वाटा होता. कारण ब्रिटीश काळातच महारांना माणूस म्हणून जगण्यास संधी प्राप्त झाली होती. पेशवाईत अतोनात छळ व अन्यायाला तोंड द्यावे लागलेल्या महारांना इंग्रजांनी जवळ केले व त्यांच्या ताकदीचा उपयोग आपली सत्ता भारतात स्थिरकरण्यासाठी करून घेतला. महारांनी देखील प्राणांची बाजी लावून

ब्रिटीशांना मदत केली. ऊन, वारा, तहानभूक या सर्व बाबीवर मात करून ब्रिटीशांना सहकार्य केले. ही बाब कांही प्रमाणात ब्रिटीश देखील विसरले नाहीत. म्हणून ब्रिटीशांनी भविष्यात खास महारांच्या पलटणी उभारल्या, या पलटणीची संख्या २१ होती. या पलटणीस बॉम्बे नेटीव्ह इन्फंट्री असे नाव होते. या सर्वच फलटणीमधल्या महार सैनिकांनी रणांगणावर अप्रतिम असे शौर्य गाजविले. यावेळी अनेक महार सैनिक उच्च दर्जाच्या लष्करी पदावर कार्य करत होते. अशा ब्रिटीश लष्करात उच्च दर्जाच्या पदावर काम बजावलेल्या महार लष्करी अधिकाऱ्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत.

## ५.६ ब्रिटिशकालीन महार लष्कर अधिकारी :

१) ''फर्स्ट ग्रेनेडियर बॉंबे इन्फंट्री :-

सुभेदार :- रगनाक महादनाक, परसनाक, धोडनाक

जमेदार :- गणनाक परसनाक.

२) सेकंट ग्रेनेडियर बॉंबे इन्फंट्री :-

सुभेदार :- मेजर धर्मनाक, सबनाक, इट्टनाक, हरनाक, भागनाक, रगनाक देवनाक

जमेदार :- भागनाक गंगनाक, शिवनाक गौनाक, भागनाक, इट्टनाक

३) फोर्थ बॉम्बे रायफल्स :-

सुभेदार :- शिवनाक चांगनाक, शिवनाक पांडनाक, रंगनाक, बापनाक रंगनाक

जमेदार :- गंगनाक रूपनाक, सुदनाक रामनाक, कूटनाक दुलनाक, कृष्णनाक, शिवनाक.

४) फिफ्त बॉंबे लाईट इन्फंट्री :-

सुभेदार :- चांगनाक रामनाक

५) सिक्सथ बॉंबे इन्फंट्री :-

सुभेदार :- मेजर रामनाक नामनाक, मेजर सखनाक, जननाक रामनाक, रंगनाक नामनाक धर्मनाक रामनाक रामनाक महादनाक

जमेदार :- सखनाक रामनाक, अर्जुननाक लखनाक, लकनाक रामनाक.

६) सेव्हनथ बॉंबे इन्फंट्री :

सुभेदार :- रामनाक मालनाक (डॉ. आंबेडकरांचे पिताश्री), देवनाक चांगनाक,गवोरनाक, दादनाक, महादनाक मालनाक.

७) एट्थ बॉंबे इन्फंट्री :-

सुभेदार :- मेजर चांगनाक, गोंडनाक इट्टनाक, सुदनाक, इट्टनाक.

८) नाइन्थ बॉम्बे इन्फंट्री :-

सुभेदार :- मेजर आणि सरदार बहादूर इट्टनाक भिकनाक, चांगनाक गोंदनाक.

जमेदार:- लकनाक भिकनाक, सकनाक, भिकनाक, इट्टनाक.

९) टेन्थ बॉम्बे इन्फंट्री :

सुभेदार :- लकनाक.

१०) ट्वेल्थ बाँबे इन्फंट्री :-

सुभेदार :- मेजर आणि बहादूर गंगनाक सजनाक,
केसनाक गोंदनाक.

११) थर्टीन्थ बॉम्बे इन्फंट्री :

सुभेदार :- धर्मनाक देवनाक

जमेदार :- ताननाक.

१२) फोर्टीन्थ बॉम्बे इन्फंट्री :

सुभेदार:- हिरनाक जमेदार - लकनाक सोननाक.

१३) फिफ्टीन्थ बाँबे इन्फंट्री :

सुभेदार:- इट्टनाक लकनाक,

जमेदार:- अर्जुननाक, देवनाक, धर्मनाक.

१४) सेव्हन्टीन्थ बॉम्बे इन्फंट्री :

सुभेदार :- भिकनाक जननाक, रूपनाक, बाबनाक
चांगनाक, गणनाक माननाक, गोणनाक
गणनाक, गणनाक बाळनाक, काननाक,
माननाक.

जमेदार :- गंगानाक गणनाक.

१५) एटीन्थ बॉम्बे इन्फंट्री :

सुभेदार :- भिवनाक गोणनाक.

१६) नाईन्टीन्थ बाँबे इन्फंट्री :

सुभेदार :- बहादूर गंगाराम कृष्णाची

(यांचे आडनाव भातनकर)
रामनाक लकनाक, कृष्णनाक बापनाक, सोमनाक जावनाक, रामनाक गंगानाक (मुलतानच्या लढाईत शौर्य गाजविले) इट्टनाक मल्हारनाक, सोमनाक शंकरनाक, भागनाक, रामनाक, गोवारनाक काळनाक.

जमेदारः- सोननाक तुलनाक, काळनाक, इट्टनाक, लकनाक, जाननाक, पांडनाक.

१७) ट्वेटिन्थ बॉबे इन्फंट्री :-

सुभेदार :- मेजर रामनाक चांगनाक, लकनाक हरनाक (तलवार बहाद्दर) सोमनाक हिरनाक (तलवार बहाद्दर), सकनाक.

१८) ट्वेंटिफर्स्ट मरीन :-

सुभेदार :- मेजर दहिवडकर, सुदनाक कमळनाक, देवनाक गुंडनाक, जयनाक हरनाक, रामनाक बबनाक, दुलाबनाक कमळनाक, शिवनाक हिरनाक, जननाक, बाळनाक.

जमेदार :- बाळनाक काळनाक, जननाक गणनाक गोंडनाक रामनाक बाळनाक रामनाक, नारायण सायगावकर (सॅपर्स अँड मायनर्स ऑर्डर ऑफ मेरिट)

१९) ट्वेंटि फोर्थ बॉंबे इन्फंट्री :-

सुभेदार :- येसनाक दादनाक

२०) ट्वेंटि सिक्सथ बॉंबे इन्फंट्री :

सुभेदार :- देवनाक मालनाक.

२१) ट्वेंटि एट्थ बॉंबे इन्फंट्री :

सुभेदार :- माननाक येसनाक

जमेदार :- अमृतनाक"[४२]

**५.७ समारोप :**

शिवकाळ, पेशवाई व ब्रिटीश कालखंडामध्ये महारांनी त्या त्या सत्ताधाऱ्याच्या सैन्यात इमाने-इतबारे सेवा केली. शिवकालखंडामध्ये महारांचा समावेश सैन्यात करण्यात आल्यामुळे हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेत महाराजांना मोठी मदत झाली. महारांच्या पराक्रमावर महाराजांनी मोठमोठ्या लढाया जिंकून स्वराज्य बळकट केले. एवढेच नाही तर आपल्या पोशिंद्यासाठी (शिवाजी महाराजांसाठी) स्वतःचे पाय एका महाराने तोडून दिल्याचे उदाहरण आहे. अनेकांनी आपल्या कुटुंबाकडे कमी; परंतु महाराजांच्या स्वराज्याकडे जास्त लक्ष देऊन महाराजांच्या साम्राज्यांची एक इंच जमीन सुद्धा शत्रुला जिंकणे मोठे जिकीरीचे करून ठेवले होते. छ. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर काही काळ मराठा साम्राज्यात गोंधळाची स्थिती होती. त्या स्थितीत देखील महारांनी त्या त्या सत्ताधाऱ्यांच्या काळात आपल्या तलवारीचे पाणी शत्रूला पाजले. शिवकालखंडानंतर पेशवाईस प्रारंभ झाला.

पेशवाईच्या काळातदेखील महारांनी आपल्या शौर्यात कसलाच फरक पडू दिला नाही; परंतु त्यांच्या शौर्याचे म्हणावे तसे गोड कौतुक पेशवाईत झाल्याचे दिसून येत नाही. या काळात महारांना अनेक यातनांना सामोरे जावे लागले; परंतु या सर्व यातना सहन करून छ. शिवरायांचे साम्राज्य पेशवाईत ही टिकून ठेवण्याचे काम महारांनी केले. परंतु दिवसेंदिवस महारावरील

अन्याय अत्याचार वाढत गेला. हा अत्याचार कमी होण्यासाठी महारांनी बरीच वर्ष वाट पाहिली. तसेच या काळातही त्यांनी पेशव्यांशी गद्दारी केली नाही, मात्र पेशव्यांच्या वागण्यात तिळमात्र फरक पडला नाही. याचवेळी ब्रिटीश आपली सत्ता भारतात रुजविण्याचा प्रयत्न करत होते. ब्रिटीशांनी भारताच्या प्राचीन इतिहासापासून मध्ययुगीन इतिहासाची सर्व पाने चाळली. यानंतर त्यांना एक बाब लक्षात आली की, भारतात सत्ता निर्माण करण्यासाठी जे अस्पृश्य व बहिष्कृत म्हणून जीवन जगतात व ज्यांची संख्या प्रचंड आहे. या बरोबरच त्यांच्या पराक्रमाने इतिहासाची पानेच्या पाने भरलेली आहेत. त्या सर्वांना सोबत घेतले तर आपण भारताचे शासनकर्ते बनू शकतो ही बाब ब्रिटीशांच्या लक्षात आल्याबरोबर त्यांनी यासर्व अस्पृश्य जातींना जवळ धरले. ज्या पेशव्यांनी अस्पृश्यांना दूर सारून त्यांचा अतोनात छळ केला होता. त्यांना ब्रिटीशांनी आपल्या छातीशी धरले. त्यांना आपल्या घरी घरगडी म्हणून कामास ठेवले. यामुळे या अस्पृश्य जातींनी पेशवाईला लाथ मारून ब्रिटीश सैन्यात प्रवेश केला आणि ब्रिटीश साम्राज्यात 'न भुतो न भविष्यति' अशा घटना घडू लागल्या. महार व इतर अस्पृश्यांच्या पराक्रमामुळे ब्रिटीशांनी सर्व भारतभर आपली सत्ता मजबूत केली व अनेक वर्षांपासूनच्या महाराष्ट्रातील पेशवाई व्यवस्थेला कायमची मुठमाती दिली.

## संदर्भग्रंथ सूची


१. वसंत मुन/हरी नरके / प्रा. अशोक गोडघाटे/प्रा. डॉ. कासारे/कांबळे, (संपा) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे (१९३७ ते १९४५) खंड-१८, भाग-२, पृ. १४९

२. प्रदिप गायकवाड, (संपा.) डॉ. बाबासाहेब आंबेडकर, आग्रलेख - बहिष्कृत भारत व मूकनायक, पृ. १८४-८५

३. डॉ. गाठाळ साहेबराव, मराठ्यांचा इतिहास, पृ. ३१५

४. खरात शंकरराव, महाराष्ट्रातील महारांचा इतिहास, पृ. १४८

५. भिक्षू सिवली बोधी, (अनु.), (आलेक्झांडर रॉबर्टसन) महारलोक, पृ. २६

६. कित्ता, पृ. २६,२७

७. डॉ. तिवारी बलभद्र, (अनु.), (कर्नल वी. लंगर) सदैव आग्रगामी, पृ. १३

अ. भिक्षू सिवली बोधी, (अनु.), उपरोक्त, पृ. १५

८. भिक्षू सिवली बोधी, (अनु.), उपरोक्त, पृ. ६४

९. खरात शंकरराव, उपरोक्त, पृ. १६१

१०. वसंत मुन/हरी नरके/गोडघाटे/डॉ. कासारे / कांबळे, (संपा) उपरोक्त, पृ. १४९

११. कित्ता, पृ. १४९

१२. फडके य. दि., (संपा.) महात्म फुले समग्र वाङ्मय, पृ. १७८

१३. दीक्षित आवळे, नागवंशीय - आंबेडकरी चळवळीत महारांचे योगदान, पृ. ५०

१४. कित्ता, पृ. ५०

१५. भिक्षू सिवली बोधी, (अनु.), उपरोक्त, पृ. ४

१६. खैरमोडे चा. भ., अस्पृश्यांचा लष्करी पेशा, पृ. ६

१७. कित्ता, पृ. ६

१८. भिक्षू सिवली बोधी, (अनु.), उपरोक्त, पृ. ३८

१९. Kamble N.D. , Deprived castes and Their struggle for Equality , P. 123, 124

२०. प्रा. भांडवलकर एस.एस. ,भारताचा इतिहास (१७५० ते १८५६) , पृ. १०५, १०६

२१. Kamble N.D. , Ibid , P. 124

२२. डॉ. वैद्य सुमन / डॉ. कोठेकर शांता , आधुनिक भारताचा इतिहास (इ.स. १७५७ ते १८५७) , पृ. ४६

२३. कित्ता , पृ. ४६

२४. कित्ता , पृ. ७४ ते ७७

२५. Kamble N.D. , Ibid , P. 124

२६. खांबे सुधाकर , शौर्य आणि पराक्रमाचे प्रतीक भिमा कोरेगावचा विजयी स्तंभ , पृ. ७

२७. डॉ. तिवारी बलभद्र , (अनु.) , उपरोक्त , पृ. १६

अ. खैरमोडे चा. भ. , उपरोक्त , पृ. ९

ब. लोखंडे हि. गो. , डॉ. आंबेडकरी सैनिकाची गौरवगाथा , भाग १ , पृ. १२८

क. खांबे सुधाकर , उपरोक्त , पृ. ८

२८. खैरमोडे चा. भ. , उपरोक्त , पृ. १०

२९. डॉ. तिवारी बलभद्र , (अनु.) , उपरोक्त , पृ. १६

अ. लोखंडे हि. गो. , उपरोक्त , पृ. १२८

ब. खैरमोडे चा. अ. , उपरोक्त , पृ. १०

३०. खांबे सुधाकर , उपरोक्त , पृ. २५ ते २७

३१. कित्ता , पृ. २८ ते ३०

३२. Kamble N.D. , Ibid , P. 124, 125

३३. खैरमोडे चा. भ. , उपरोक्त , पृ. १० ते १२

अ. खांबे सुधाकर , उपरोक्त , पृ. ३९

ब. शिंदे वि. रा. , भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न , पृ. १७२

३४. कित्ता , पृ. १७२

३५. भा. इ. सं. मं. पुणे , त्रैमासिक -६२, १ -४ , पृ. १४२

३६. डॉ. तिवारी बलभद्र , (अनु.) , उपरोक्त , पृ. १८

अ. खांबे सुधाकर , उपरोक्त , पृ. ४४

३७. कित्ता , पृ. ४३

३८. कित्ता , पृ. ४४

३९. खैरमोडे चा. भ. ,उपरोक्त , पृ. ८९

४०. खरात शंकरराव , उपरोक्त , पृ. १७२

४१. डॉ. गाठाळ साहेबराव , मराठ्यांचा इतिहास (१६३० ते १८१८ ) , पृ. ३९७

४२. खैरमोडे चा. भ. , उपरोक्त , पृ. १५ ते १७

अ. डॉ. तिवारी बलभद्र , (अनु.) , परिशिष्ट-११ , पृ. ५३

*प्रकरण – सहावे*

# उपसंहार

महार ही महाराष्ट्रातील अतिप्राचीन जात आहे. मराठा कालखंडातील शिवकाळ व पेशवेकाळामध्ये महाराष्ट्रातील प्रत्येक खेड्यामध्ये महार लोकांची वस्ती होती. यामुळेच 'गाव तेथे महारवाडा' ही म्हण रूढ झाली. मराठाकालखंडामध्ये अस्पृश्य व अतिशुद्र म्हणून गणल्या गेलेल्या जातीमध्ये महार, मांग, चांभार व ढोर या जातींचा समावेश होता. यामध्ये महार ही जात प्रमुख होती. या बरोबरच इतर अस्पृश्य जातीच्या तुलनेत यांची संख्या देखील जास्त होती. महार हा त्या काळातील गाव वतनदार व महत्त्वाचा बलुेदार होता. महार हा 'म्हार' या शब्दाचा अपभ्रंश आहे. महार या शब्दाचे मूळरूप 'म्हार' असे होते. नागवंश हा भारतातील प्राचीन वंश आहे. कारण ऋग्वेदामध्ये नागांचे उल्लेख आढळतात. याच नागांना 'महर' ही उपाधी होती. 'महर' या शब्दाचे रूप महाराष्ट्रीत 'महार' बनले. अनेक विद्वानांनी महार शब्दाच्या उत्पत्तीबद्दल आपली वेगवेगळी मते व काही दंतकथा देखील सांगितलेल्या आहेत; परंतु महात्मा फुले यांनी महार शब्दाची सांगितलेली उत्पत्ती अधिक विश्वसनिय वाटते.ती अशी महा + आरी= महार, म्हणजेच आर्यांचा सर्वात मोठा शत्रू महार होता. म्हणून त्यांना महा + आरी असे म्हटले गेले व याचा अपभ्रंश पुढे 'महार' असा झाला. नाग लोकांची प्राचीन काळात भारतातील विभिन्न प्रदेशात राज्य होती. ऋग्वेदात 'दासांचा' उल्लेख आढळतो. हे दास नागवंशीय होते. आर्यपूर्व काळात यांचीच संस्कृती अस्तित्वात होती. यावरून स्पष्ट होते की, भारतात आर्यांच्या पूर्वी नाग संस्कृती अस्तित्वात होती. आजचे महार हे प्राचीन नागलोकांचे वंशज आहेत. महारांच्या परंपरेनूसार त्यांचा पहिला राजा 'नाग' हा होता. नागलोक व राजे आपल्या नावाच्या शेवटी नाग हा शब्द वापरत असत. तर मध्ययुगीन काळात महार लोक आपल्या नावाच्या शेवटी 'नाक' या शब्दाचा वापर करत असत. उदा. कमळनाक महार, शिदनाक, कोंडनाक, तुकनाक, खंडनाक

इ. नाक हा शब्द नाग या शब्दाचा अपभ्रंश आहे. नाग कुलांची नावे आज महारांची अडनावे आहेत. महार लोक हे नागलोक असून ते महाराष्ट्राचे मुळ रहिवाशी आणि राज्यकर्ते होते. कदंबानी महारांची राज्य जिंकून घेतली. महाराष्ट्रामध्ये प्रत्येक खेड्यात महार लोकांची वस्ती होती. त्यामुळे गाव तेथे महारवाडा असे महाराष्ट्राच्या भूमित महार लोकांचे प्राबल्ये अधिक असल्यामुळे या प्रदेशाला महारांचे राष्ट्र ते महाराष्ट्र असे नाव प्राप्त झाले.

महार जातीमध्ये अनेक पोटजाती आहेत. निरनिराळ्या विद्वानांनी याची संख्या वेगवेगळी सांगितली आहे. 'संयुक्त महाराष्ट्राचा ज्ञानकोश' यात महारांच्या पोटजातीची संख्या ५३ सांगितली आहे. संशोधनातील प्राप्त आकडेवारीवरून ही संख्या ६७ आहे. महारातील पोटजातींचा चिकित्सक पद्धतीने अभ्यास केल्यानंतर असे निदर्शनास येते की, काही पोटजाती प्रादेशिकतेवरून पडलेल्या आहेत. तर काही पोटजाती महारांच्या उद्योग धंद्यावरून पडलेल्या आहेत. तर काही पोटजाती ह्या अडनावावरून पडल्यांचे दिसून येते. या वरून सिद्ध होते की, महार जातीमध्ये कसलाही वांशिक भेद नाही. महार जातीतील पोटजातीमध्ये जी काही उच्च निचतेची भावना जोपासली जाते ती ब्राह्मणी मानसिकतेच्या प्रभावाचा एक प्रकार आहे. महार ही जात अत्यंत पराक्रमी असल्यामुळे त्यांची भिती ब्राह्मणी मानसिकतेच्या लोकांना होती. म्हणून त्यांनी फोडा आणि झोडा या नितीचा वापर करून एकसंघ महार जातीला अनेक वेगवेगळ्या भागात विभागून त्यांच्यात उच्च निचतेची भावना वाढीस लावली. म्हणून फोडा आणि झोडा ही निती ब्रिटिशांनी भारतात सुरू केली नव्हती तर या ठिकाणच्याच ब्राह्मणी मानसिकतेच्या या पद्धतीचा वापर त्यांनी आपली सत्ता स्थिर करण्यासाठी केला होता. ''महार हे पराक्रमी तर होतेच या बरोबरच ते बुद्धीमान देखील होते.''[१] म्हणून यांचे मानसिक व बौद्धीक खच्चीकरण करण्यासाठी वरील बाबीचा वापर करण्यात आल्याचे दिसून येते.

शिवपूर्व काळात महारांना गावातील व सरकारची वेगवेगळ्या प्रकारची कामे करावी लागत होती. ज्यामध्ये बलुतेदार, येसकर, वेठबिगार, तराळ, जागला, राबता महार व पाडेवार

महार आशा विविध प्रकारची कामे महारांना करावी लागत. अनेक गावचे कोतवाल देखील महाराच असल्याचे दिसून येते. जर गाव मोठे असेल तर कोतवालास मदत करण्यासाठी तराळ असे. तराळसुद्धा महार जातीतीलच असे. क्वचित प्रसंगी इतर जातीकडेही कोतवालकी असे. सरकारी कामाबरोबरच गावकीच्या कामात महाराचा मोठा सहभाग असे. अर्थात गावच्या कामाचा सर्वात अधिक भार महारावरच होता हे सिद्ध होते. शिवपूर्व काळात महारास सरकारी, गावातील, वेठबिगारी कामे व इतरही काही कामे करावी लागत. ती कामे पुढील प्रमाणे सांगता येतील.

**अ. सरकारी कामे :**

सरकारी कामामध्ये महारास प्रशासकीय अधिकाऱ्याची सेवा करणे, प्रशासकीय निरोप देणे, शिवतंटा सोडविणे व साक्ष देणे, महसूल व्यवस्थेचे काम करणे, चोरीचा तपास लावणे, गावचे रक्षण करणे, सरकारी कामगार व गावची वेठबिगारी वाहने, साफ सफाई करणे, दवंडी देणे, मार्गदर्शक व वाटाडे म्हणून काम करणे, पिकाचे रक्षण करणे, जन्म मृत्यूची नोंद ठेवणे.

**ब. गावातील कामे :**

सण व उत्सवा वेळची कामे, सरपण फोडणे व आणणे, प्रेतासाठी खड्डा करणे, मुऱ्हाळी म्हणून जाणे, निरोप पोहोचविणे, होळीसाठी गोवऱ्या व लाकडे पुरविणे, मृत्यूची बातमी देणे, शेतकऱ्याचे ओझे वाहून नेणे.

**क. वेठ बिगारी कामे :**

कुणब्याची सर्व वेठबिगारी कामे, त्यांचे बी बियाणे व औताची वेठबिगारी वाहणे.

**ड. महारांची इतर कामे :**

वेसकर, जागला, प्रसुती व गर्भपात करण्याचे काम, विणकाम.

वरील प्रकारची गावकऱ्यांची व सरकारची सर्व कामे शिवपूर्वकाळात महारांनी केली. या वेळी महार हा अष्टेप्रहर राबणारा नौकर होता; परंतु त्यांच्या कामाच्या मोबदल्यात त्यांना

दिले जाणारे वेतन किंवा मजुरी मात्र फारच कमी होती. सरकारकडून जागल्याला वर्षाकाठी फक्त दहा वीस रुपये दिले जात असत. तसेच रयतेकडून काही हक्क व मानपान महारांना मिळालेले असत. त्या मध्येच त्यांना उपजिविका करावी लागे; परंतु एवढ्या तुटपुंज्या मोबदल्यामध्ये त्यांची उपजिविका होत नसे. त्यामुळे महारांना उदरनिर्वाहासाठी गावकऱ्यावरच आवलंबून राहावे लागे. म्हणूनच आर्थिकदृष्ट्या महार कमकुवत बनले, महारांनी खूप काम केले. २४-२४ तास राबले, गावची व सरकारी सर्व प्रकारची कामे केली, पडेल ते व सर्व संकटावर मात करून तो राबला; परंतु त्याचा मोबदला मात्र त्याला म्हणावा तसा मिळाला नाही. म्हणून महारांनी कधीच चोरीसारखा वाईट मार्ग अवलंबिला नाही.

एम. केन्नेडी (इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलीस) यांनी गुन्हेगारी जाती नावाच्या पुस्तकात मुंबई इलाख्यातील सर्व गुन्हेगारी जातींचा उल्लेख केलेला आहे. त्यामध्ये महाराष्ट्रातील अनेक जातीचा उल्लेख आहे; परंतु महाराष्ट्रातील जी मूळची जात महार आहे. या जातीचा गुन्हेगारी जातीत समावेश नाही. यावरून एक बाब सिद्ध होते की,| महारांनी कमी वेतनात व मजुरीत स्वत:ची व कुटुंबाची गुजरान केली; परंतु चोरीसारखा वाईट मार्ग अवलंबीला नाही. यावरून हे लोक किती स्वाभीमानी होते हे सिद्ध होते.

महार पुरुषांनी गावकी, सरकारी व इतर कामे केली या कामात स्त्रीयांनी देखील पुरुषांना मदत केली. या बरोबरच महार स्त्रियांनी या वेळी डॉक्टरचे काम देखील केल्याचे दिसून येते. कारण या काळात महार स्त्रियांनी प्रसुती व गर्भपात करण्याचे काम केलेले आहे.

महारलोक हे मूळचे क्षात्रवृत्तीचे असून ते शूरवीर, कर्तबगार व पराक्रमी होते. ते या भूमिचे मूळ मालक व राज्यकर्ते होते. "प्राचीन काळात महार हे राजे होते."[२] आर्य संस्कृतीच्या वसाहतवाल्यांनी त्यांचा राजकीय पराभव करून त्यांची राज्य नष्ट केली. कदंबांनी महारांपासून राज्ये जिंकून घेतली. महार पराजीत झाले. पराक्रमी महारांना आर्यांनी आपल्या वस्तीपासून दूर केले; परंतु हे मूळ लोक म्हणजे महार आपणावर आज ना उद्या हल्ला करतील या भितीने

आर्यांनी आपल्या वस्ती भोवती मोठी भिंत बांधली या भिंतीलाच 'गावकुस' असे म्हटले जात होते. शिवपूर्वकाळात प्रत्येक गावा भोवती गावाच्या संरक्षणासाठी कच्च्या विटांची मोठी भिंत बांधली जात असे. या भिंतीस गावात प्रवेश करण्यासाठी एक किंवा अनेक दरवाजे असत. याच भिंतीला 'गावकुस' म्हटले जात असे. या गावकुसास 'कोट' असेही नाव असे. या गावकुसाच्या आत आर्य राहत व गावकुसाच्या बाहेर अस्पृश्य जाती राहत होत्या. यावेळी अस्पृश्यांसमोर उदरनिर्वाहाचा प्रश्न होता तर आर्यासमोर संरक्षण व त्यांच्या विविध कामांचा प्रश्न होता. म्हणून आर्य आणि अस्पृश्य (अनार्य) यांच्यात पुढे करार होऊन त्यांनी आपापले प्रश्न सोडविले. अस्पृश्यांनी त्यांचे संरक्षण करायचे व त्या मोबदल्यात त्यांनी अस्पृश्यांना आश्रय व अन्न द्यायचे. अशा प्रकारचे गावकुसाच्या बाहेर या अस्पृश्यांची वस्ती निर्माण झाली. स्पृश्य आणि अस्पृश्य असे दोन वर्ग नंतर निर्माण झाले.

साधारणत: इ.स. १० व्या शतकापासून मुस्लिम आक्रमकांचे भारतावर आक्रमणे सुरू होतात; परंतु इ.स. १२०६ साली गुलाम साम्राज्य स्थापन झाले. येथूनच मध्ययुगीन कालखंडाला प्रारंभ होतो. आतापर्यंतच्या भारतीय राजकारणात, समाजकारणात, अर्थकारणात व धर्मकारणात मुलभूत बदल मुसलमानी राजवटीने घडवून आणला. या मुसलमानी राजवटीचा परिणाम भारताच्या प्रशासनावर ही मोठ्या प्रमाणावर जाणवतो. मुसलामनी राजवटीच्या काळात महारांना रणांगणावर पराक्रम गाजविण्याची सर्व प्रथम संधी प्राप्त झाली. अस्पृश्यांच्या शूरतेचा फायदा मुस्लिमांनी आपला साम्राज्यविस्तार करण्यासाठी करून घेतला. महार ही जात पराक्रमी तर आहेच या बरोबरच ही जात विश्वासू व इमानदार आहे. याची जाणीव मुस्लिमांना झाली. म्हणून मुस्लिमांनी महारांच्या विश्वासूपणा, इमानदारी व पराक्रमाचा फायदा पुरेपूर घेतला. ज्या महारांचा येथील स्पृश्याला स्पर्श देखील जमत नव्हता. त्या महारास मुस्लिमांनी जवळ केले होते. म्हणून महारांनी देखील प्राणपणाने मुस्लिम सत्ताधिशांना मदत केली. महारांच्या विश्वासूपणा, इमानदारी व पराक्रमामुळे ''मुस्लिमांनी आपल्या जनानखान्याचे

रक्षक म्हणून महारांची नेमणूक केली.''[3] भारतीय समाजव्यवस्थेचे व जातीव्यवस्थेचे चटके महारांना मोठ्या प्रमाणावर सहन करावे लागले. म्हणून अनेक महारांनी मुस्लिमधर्म देखील स्विकारल्याची उदाहरणे आहेत. यावरून महाराष्ट्रात मुस्लिमसत्ता स्थिर करण्यात महारांनी मोठी कामगिरी केली हे दिसून येते; परंतु अस्पृश्यांच्या शूरतेचा फायदा राज्यविस्तारासाठी करून घेऊन ही त्यांना मुसलमान सत्ताधिशांनी उच्चपदावर चढविले नाही. यावरून सिद्ध होते की मुस्लिम शासकांनी देखील फक्त अस्पृश्य महारांच्या शक्तीचा उपयोग स्वत:ची सत्ता स्थिर करण्यासाठीच करून घेतला.

मध्ययुगीन कालखंडामध्येच उत्तरेत गुलाम घराणे, लोधी घराणे, मोगल घराणे हे प्रमुख राजघराणे होऊन गेलेले आहेत. याच काळात दक्षिणेत आदिलशाही, कुतुबशाही, इमादशाही, निजामशाही, बरीदशाही आणि मराठे असे प्रमुख राज्यकर्ते आपापल्या कार्यक्षेत्रात कार्यरत होते. दक्षिणेतील बहुतांश प्रदेश मुसलमानी राज्यकर्त्यांनी व्यापल्या नंतर सर्वांच्या मध्यभागी छत्रपती शिवाजी महाराजांनी मराठी माणसाला सोबत घेऊन हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. छत्रपती शिवाजी महाराजांनी जी लष्करी निती अवलंबीली होती, त्यात पारंपरिक लष्करी सरंजामदार व लोकांना काढून टाकून त्याठिकाणी पराक्रमी लोकांना सरळ लष्करात भरती केले. लष्कर भरती करत असताना छत्रपती शिवाजी महाराजांनी कधीही जातीला किंवा धर्माला प्राधान्य दिले नाही. महाराजांनी व्यक्तिची जात किंवा धर्म बघून नियुक्ती, पदोन्नती व निलंबन केले नाही. एकनिष्ठ आणि कतृत्ववान व्यक्ती मग तो कुठल्याही जाती धर्माचा असो, त्याच्या कतृत्वाला पूर्णपणे संधी प्राप्त करून दिली. म्हणूनच ''महाराजांच्या सेन्यात ५६ जातीच्या लोकांचा समावेश होता.''[४] या जातीत महार ही जात प्रमुख होती. छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या हिंदवी स्वराज्याच्या यशस्वी वाटचालीमध्ये अस्पृश्य मानल्या गेलेल्या 'महार' या जातीच्या पराक्रमी लोकांनी आपला वैशिष्ट्यपूर्ण ठसा उमटविला आहे.

छत्रपती शिवाजी महाराजांचे हिंदवी स्वराज्य टिकविण्यासाठी व त्याचा विकास

करण्यासाठी अनेक महारांनी मोठे योगदान दिले. इ.स. १६६५ मधील पुरंदर गडावरील महारांचा पराक्रम मोठा धाडसाचा होता. मोगल राजा औरंगजेबाने मिर्झा राजा जयसिंग व दिलेरखान यांना मोठे सैन्य व शस्त्रास्त्रे देऊन शिवाजी महाराजांच्या विरुद्ध पाठविले होते. यावेळी दिलेरखानाच्या ५००० सैन्याने पुरंदरला वेढा घालून तोफांचा मोठा मारा केला होता. यावेळी गडावर फक्त ७०० सैनिक होते. या संघर्षात मुरारबाजी कामास आला; परंतु महारांनी न डगमगता किल्ला तसाच लढत ठेवला. या ७०० सैन्यात बहुसंख्य महार होते. मिर्झा राजा जयसिंग हिंदू असून तो औरंगजेबास मदत करत होता तर महार अस्पृश्य असून महाराजांसाठी प्राणाचे बलिदान देत होते. मग अस्पृश्य कोण ? मिर्झा राजा जयसिंग की महार ! इ.स. १६५२ मध्ये गोदनाक नावाच्या महाराने मोकदमाचा जीव वाचविण्यासाठी स्वत:चा जीव दिला होता. महाराजांच्या राज्यात २४० किल्ले होते. पैकी रायगड किल्ला महत्त्वपूर्ण व संरक्षणाच्या बाबतीत अभेद्य होता. या किल्ल्याचे सर्व दारे बंद केल्यानंतर जो कोणी इतर मार्गाने किल्ल्यावर जाऊन निशाण लावेल त्यास बक्षिस दिले जाईल असे महाराजांनी सांगितले. हे अत्यंत अवघड काम पाचाडच्या रायनाक महाराने करून बक्षिस मिळवले. नंतर महाराजांनी तो मार्ग कायमचा बंद केला. रायगडा संबंधीच दुसरी एक घटना आहे. एक वेळी औरंगजेबाने रायगडास वेढा दिला. हा वेढा अनेक दिवस होता. यामुळे गडावरील अन्न व दारूगोळा संपला होता. म्हणून महाराजांनी किल्ल्यात दंवडी देऊन चोरवाट सांगणाऱ्यास बक्षीस देण्याचे जाहिर केले. यावेळी खंडू महाराने चोर वाट सांगितली त्या बदल्यात बक्षिसा ऐवजी खंडू महारास आपले पाय महाराजांना द्यावे लागले. हे काम खंडू महाराने आपल्या राजासाठी मोठ्या हसतमुखाने केले. एवढेच नाही तर राजाच्या सुरक्षिततेसाठी त्याने आपला मुलगा किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या रायरोबास फूल म्हणून वाहिला. या देवाकडे जात असताना खंडूस एक संन्याशी भेटला तेव्हा त्याने खंडूच्या स्थितीबद्दल विचारना केली तेव्हा घडलेला सर्व प्रकार त्याने सांगितला. परत दुसरी एक मोठी वाट आहे; परंतु ती महाराजास सांगण्यास मी विसरलो असे म्हणून खंडूनी त्या संन्याशास

दुसरी वाट सांगितली व हा निरोप महाराजांना कळविण्याची विनंती केली. तेव्हा त्या संन्याशाने खंडूस ही वाट इतरांना सांगू नये म्हणून त्याची जीभ मागितली. खंडूने आपली जीभ देखील संन्याशास कापून दिली. एवढे अफाट प्रेम महारांचे महाराजांवर होते. महारांच्या विश्वासूपणा व पराक्रमामुळेच अविचारे व बेगले महार यांची पुरंदर किल्ल्याचे रक्षक म्हणून नेमणूक केली होती. या बरोबरच चिव्हे महार याची नेमणूक पुरंदर किल्ल्याचा किल्लेदार म्हणून केली होती. बहिरनाक नावाचा महार शिवाजी महाराजांच्या लष्करात नाईक या पदावर होता. या बरोबरच मेटे नाईकी बहुधा महारांकडेच असे. डोंगरी किल्ल्याच्या उतरणीवर सपाट भागावर वस्ती असे त्यास मेटे म्हणत. या मेट्यांनाच संरक्षण चौक्या असे ही म्हणत. मेटे हे संरक्षणाचे प्रमुख ठिकाण होते. म्हणून या ठिकाणच्या महारांना डोळ्यात तेल घालून पहारा द्यावा लागे. शिवाजी महाराजांच्या काळात खंडनाक महार, बेगले महार व महादनाग महार हे मेटकर म्हणून होते. महाराजांनी महारांच्या पराक्रमाचा वापर लष्करा बरोबरच घरगुती कार्यातही केल्याचे दिसते. महार पराक्रमी, कर्तबगार विश्वासू व इमानदार असल्यामुळे गावच्या पाटलाची, आसामीची व जमीनदाराची मुलगी किंवा सून परगावी जात असेल तर तिच्या संरक्षणासाठी तिच्या सोबत मुऱ्हाळी म्हणून महार जात असे. या मूळ चोर, दरोडेखोर व शत्रूपासून त्या स्त्रिचे रक्षण होत असे. छत्रपती शिवाजी महाराजांची मुलगी सखुबाई हिचा विवाह बाबाजी निंबाळकर यांच्या मुलाबरोबर झाला होता. तिच्यावर एकदा संकट आले. त्या वेळी वाल्हे येथील महार तिच्या कामी आले.|

छत्रपती शिवाजी महाराजांनी महारांना गावकुसाच्या आत प्रवेश दिला, त्यांच्या हातात शस्त्र दिले; परंतु शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रातील अस्पृश्यता कमी करण्यासाठी म्हणावा तसा प्रयत्न केल्याचे दिसून येत नाही. स्वराज्य स्थापनेत महाराजांनी महारांच्या पराक्रमाचा व शौर्याचा उपयोग करून घेतला; परंतु त्यांना त्यांच्या परक्रमाच्या तुलनेत उच्चपदे दिल्याचे विविध साधनांमधून दिसून येत नाही. छत्रपती संभाजी महाराजांच्या वधानंतर सुरू झालेल्या मराठ्यांच्या

स्वातंत्र्य संग्रामातही महारांनी भाग घेऊन आपल्या तलवारीचे पाणी मोगलांना पाजले. या काळात मौजे नागेवाडीच्या नागनाक महाराने धारदिव्य करून मोगलांकडून वैराटगड जींकला. याच काळात शिदनाक नावाचा एक पराक्रमी महार होता. संभाजी महाराजांचा औरंजेबाकडून क्रूरपणेवध झाल्यामुळे हा भयंकर चिडला होता. याने महारांची मोठी फौज निर्माण करून मोगलाच्या छातीत धडकी भरली होती. हाच शिदनाक पुढे शाहू महाराजांच्या काळातही होता. शिवकालखंडामध्ये महारांनी खूप मोठा पराक्रम गाजविला प्रसंगी आपला प्राणही दिला; परंतु त्यांची अस्पृश्यता व दारिद्र्यामधून सुटका झाली नाही.

शिवकाळाप्रमाणेच पेशवे काळातही महारांनी मोठा पराक्रम गाजविला. छत्रपती शाहू महाराजांच्या कालखंडात पेशवाईस प्रारंभ झाला. इ.स. १७१३ मध्ये छत्रपती शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथ भट यास पेशवाईची वस्त्रे प्रदान केली. येथूनच खऱ्या अर्थाने पेशवाईस प्रारंभ होतो. पेशव्यांच्या लष्करातही महारांचा भरणा होता. यामध्ये शिवकालखंडात ज्या शिदनाकाने पराक्रम गाजवून मोगलांना धडकी भरवली होती. तोच शिदनाक ताराबाई व शाहू यांच्यात सत्तेसाठी झालेल्या वादात शाहूची बाजू घेऊन ताराबाई विरुद्ध लढला होता. शाहू महाराजांनी नंतर ज्यांनी ज्यांनी त्यांना सत्ता मिळविण्यासाठी मदत केली होती. त्यांच्या कार्याप्रमाणे त्यांना बक्षिसे व मानसन्मान दिले होते. त्यात शिदनाक महारास कळंबी गाव इनाम दिले. या बरोबरच त्यास सरदारकीचे वस्त्रालंकार व बसण्यासाठी पालखी दिली. तुकनाक महार याने १७३९ मध्ये मराठे व पोर्तुगीज यांच्यात झालेल्या वसईच्या लढाईत पराक्रम गाजवून मराठा सैन्याचे नेतृत्व करणाऱ्या चिमाजी अप्पास 'वसईचा किल्ला' जिंकून दिला. इ.स. १७५२ मध्ये झालेल्या शिराळे गुमट येथील लढाईत तीन महार गोळी लागून जखमी झाले होते. या युद्धात चिमाजी आप्पास पाटीत गोळी लागली असता खंडनाक महार चिमाजी आप्पास रणमैदानावरून घेऊन आला. इ.स. १७६० मध्ये मराठे आणि निजाम यांच्यात उदगीरची लढाई झाली. यावेळी माणिक महार हा निजामाच्या बाजूने व मराठ्यांविरूद्ध लढला होता. यावेळी

माणिक महाराने निजामास सुखरूप चोर वाटेने राक्षसभुवन येथे आणले होते; परंतु ही चोरवाट इतरांना कळूनये म्हणून निजामाने माणिक महारास ठार केले. ज्या मार्गाने निजाम अलीस राक्षसभुवन येथे आणले होते. तो मार्ग आज ही माणिकदंड या नावाने ओळखला जातो. याप्रमाणेच कोंडनाक महार हा देखील जंजिरा मोहिमेत मराठ्या विरुद्ध व सिद्दी सातच्या बाजूने लढला होता. माणिक महार व कोंडनाक हे दोघेही मराठ्यांच्या विरूद्ध लढले होते. हा काळ छत्रपती शाहू महाराजांचा होता. यांच्याच काळात पेशवाईला प्रारंभ झाला होता. यामुळे महारांची मोठी कुचंबना या काळात होत होती. म्हणून नाविलाजाने महार मराठ्यांच्या शत्रूंना जाऊन मिळाले होते.

इ.स. १७९५ मध्ये मराठे आणि निजाम यांच्या मध्ये खर्ड्याची लढाई झाली यावेळी अनेक सरदार आपापली फौज घेऊन सवाई माधवरावाच्या सैन्यात सामील झाले. या मध्ये शिदनाक (दुसरा) महार हा देखील आपली फौज घेऊन सामील झाला. यावेळी शिदनाकाचा गोठ ब्राह्मण व मराठ्यांच्या शेजारी होता. म्हणून या सवर्णांनी तशी तक्रार पेशव्याकडे केली. यावेळी हिरोजी पाटणकराकडे पेशव्यांनी पाहिले, तेव्हा पाटणकर सवर्णांना उद्देशून म्हणाले, 'हि काही जेवणाची पंगत नाही तर तलवार धारणाऱ्या शूरांची पंगत आहे. येथे जातीचा विचार नाही||, ज्याची तलवार खंबीर तो हंबीर' या मूळे सर्वजन परत गेले. दुसऱ्या दिवशी मुजरा करून शिदनाक रणभूमीवर आपल्या सैन्यासह दाखल झाला. उभयंतात घनघोर युद्ध सुरू झाले. यावेळी परशुरामभाऊ पटवर्धन पठाणांच्या गराड्यात सापडला. त्यास सहिसलामत बाहेर काढण्याचे मोठे जिकीरीचे काम शिदनाकाने केले. यामुळे पटवर्धन घराण्यात पुढे शिदनाक जिवंत असे पर्यंत त्याला मोठा मान देत असत. पेशवा बाजीराव दुसऱ्याच्या काळामध्ये रायनाक महार हा रायगड किल्ल्याचा किल्लेदार होता. ब्रिटिशांनी हा किल्ला पंधरा दिवस लढवला; परंतु रायनाकाने तो ब्रिटिशांना जिंकू दिला नाही. हा किल्ला लढवत असताना रायनाक संपला परंतु त्याने किल्ला ब्रिटिशांना जिंकू दिला नाही. नंतर ब्रिटिशांनी महारांच्या मदतीनेच तो किल्ला

जिंकला या व्यतिरिक्त इतरही पराक्रमी कामे महारांनी पेशवाईत केल्याचे दिसून येते. पेशव्यांच्या काळात पथकदार म्हणून महार होते. असे ४४ पथकदार महारांची नावे सापडली आहेत. युद्ध प्रसंगी जखमी सैनिकांना रणांगणातून आणण्याचे धाडसी कार्य देखील महारांनी केले. या बरोबरच युद्ध साहित्य, माणसे, पत्रे व इतर सामान वसईच्या वेढ्याच्या वेळी पाण्यातून पोहोचविण्याचे काम सिता महार, फकिरा महार, बिरा महार व याण महार यांनी केले. 'उडत रूमाल' हि बहुमानाची पदवी पेशवेकाळात महारांना मिळालेली होती. ही पदवी कर्तबगारी गाजविणाऱ्या शूरविरांना दिली जात होती. तसेच पेशव्याच्या लष्करात हुलस्वार नावाचे महाराचे पथक देखील होते. पेशव्याच्या जनानखान्याचा रक्षक म्हणूनही महाराने कामगिरी केली आहे.

पेशवाईत महारांनी पेशव्यांना मोठी मदत केली; परंतु याचा मोबदला पेशव्यांनी त्यांच्या गळ्यात मडके व कंबरेला झाडाची फांदी हा दिला. पेशवाईमध्ये महाराष्ट्रात जातीयतेने मोठे थैमान घातले होते. वरील पोषाख लादण्याचे कारण असे सांगितले जाते की, "एका पेशव्याच्या जनानखान्यातील एका राणीवर एका रखवालदार महाराची नजर होती असा संशय त्या पेशव्याला आल्यावर संपूर्ण महार जातीवर अशा प्रकारचा पोषाख लादण्यात आला."[५] एका महाराच्या गुन्ह्याची शिक्षा सर्व महारांना देणे योग्य नाही; परंतु वरील पोषाखाचे हे कारण योग्य वाटत नाही. तर हिंदु धर्मशास्त्रानूसार फक्त क्षत्रियांनाच हातात शस्त्रे घेण्याचा अधिकार होता. अतिशुद्र म्हणून गणल्या गेलेल्या जातींना हातात शस्त्रे घेणे महापाप समजले जाई. या संदर्भात चा. भ. खैरमोडे म्हणतात, "हिंदु समाजातील खालच्या थरातील जातींना जर शस्त्रे वापरू दिली तर ते त्यांची उन्नती करून घेतील व अशा तऱ्हेने त्यांचा सामाजिक दर्जा वाढेल. ही भिती चातुर्वर्ण्याच्या रक्षकांना होती. शुद्र व अतिशुद्र यांच्या हाती शस्त्रे आली तर ते जातीभेदाविरुद्ध सशस्त्र बंड करतील आणि सर्व उच्चवर्णीय हिंदुचा शिरछेद करतील. ही या चातुर्वर्ण्य संरक्षकांना जबरदस्त भिती वाटत असल्यामुळे त्यांनी शुद्रातिशुद्रांना शस्त्रे वापरण्याची मनाई करणारे धार्मिक कायदे आपल्या स्मृतीमध्ये घातले. याची अंमलबजावणी हिंदु राजे करत

होते.''[६] वरील कायदा सर्व अस्पृश्य जातीसाठी होता मग गळ्यात मडके व कंबरेस झाडाची फांदी हा पोषाख सर्व अस्पृश्यांना नव्हता तर फक्त महारांसाठीच होता. याचे कारण असे सांगता येईल की, महार ही अतिशय कर्तबगार जात होती. मराठे काळात महारांनी रणांगणावर अनेक पराक्रम गाजविले. रणांगणावरील त्यांच्या नेत्रदिपक यशामुळे राज्यकर्त्यांच्या मनात महारांबद्दल दहशत निर्माण झाली असावी. महारांच्या या वाढत्या पराक्रमाला योग्य वेळी पायबंद घातला नाही तर महार शिरजोर बनतील व ते शत्रूला मिळून मराठी राज्य बुडवतील किंवा स्वत:च राज्यकर्ते होतील. या धास्तीने पेशव्यांनी महारांवर वरील नियम लादला; परंतु शेवटी व्हावयचे तेच झाले. कोरेगावच्या लढाईत महार इंग्रजांच्या बाजूने पेशव्याविरुद्ध लढले. परिणामी इंग्रज विजयी झाले व पेशवाईचा अस्त झाला.

पेशवाईमध्ये अस्पृश्यतेने उच्चांक गाठला होता. अस्पृश्यांच्या सावलीचा स्पर्श देखील उच्चवर्णीयांना आगीत टाकल्यागत भासत होता. या उच्चवर्णीयांनी धार्मिक व सामाजिक व्यवहारात अस्पृश्यतेचे पालन केले; परंतु त्यांनी लैंगिक कामवासना भागविण्यासाठी अस्पृश्य स्त्रियांशी संग करून अस्पृश्यतेला काळीमा फासली. अशा प्रसंगी ओरड होताच ते प्रायश्चित घेऊन शुद्ध होत असत. यासाठी पुढील घटना महत्त्वपूर्ण ठरतात. ''इ.स. १७३३ साली गंगाजी जगताप देशमुख व साली माली कुणबी यैसे सात जण कसबे सासवड याणी कसबे मजबुर महारीसी बदअमल केला या सर्वांना प्रायश्चित देऊन शुद्ध केले.''[७] ''कामाविस निसबत गुरव मौजे आऊंद उर्फ हवेली प्रांत पुणे याचा पुत्र बहिरजीने महारीसी बदअमल केला त्यास शुद्ध केले गेले.''[८] ''रामचंद्र कृष्ण अवगल या ब्राह्मणाने रमा मांगीन बरोबर संग केला.''[९] मराठे काळात अनेक श्रीमंत लोक व सरदारांनी अस्पृश्य कुणबीन स्त्रिया बाळगल्या होत्या. ''वेदशास्त्रसंपन्न गंगाधर पंडित यांनी महारीण कुळंबीन बाळगली होती.''[१०] ''नानासाहेब पेशव्यांचा ब्राह्मण सरदार गोविंद हरी पटवर्धन यांनीही महारीण बटीक बाळगली होती.''[११] ''बाजीराव मोरेश्वर भावे यांच्या घरातील कुणबीन चांभार जातीची निघाली.''[१२] पेशवाईतील

ही घृणास्पद वृत्ती महारांना आत्मपरिक्षण करावयास लाणारी होती. म्हणूनच भविष्यात महारांनी पेशवाई संपविण्याचा विडा उचललेला दिसतो.

महार पेशवाईतील व्यवस्थेला कंटाळले असतानाच ब्रिटिशांनी भारतात आपली सत्ता स्थिर करण्याचा मोठा प्रयत्न सुरू केला होता. ब्रिटिश आधुनिक विचार सरणीचे असल्याने यांना जातपात ही बाब मान्य नव्हती. त्यांनी महाराष्ट्रातील धार्मिक व सामाजिक स्थिती पाहून अस्पृश्य जातीच्या लोकांना जवळ करून आपले राजकीय स्थान बळकट केले. ब्रिटिशांनी अस्पृश्यतेला फाटा देऊन महार व महारीन यांना आपल्या घरी मुक्तपणे घरगडी व मुले सांभाळण्यासाठी ठेवून घेतले. पेशवाईतील जुलमी वृत्तीला लाथ मारून महार ब्रिटिशांना सामील झाले होते. या वेळी महारांनी ब्रिटिशांची सत्ता स्थिर करण्यासाठी अनेक युद्धामधून मोठा पराक्रम गाजवून पेशवाईचा अंत घडवून आणला. इ.स. १७५१ ला ब्रिटिश व पेशवे यांच्यात झालेल्या आर्काटच्या लढाईत महारांनी मोठा पराक्रम गाजवून पेशवाईस मोठी चपराक दिली होती. हे युद्ध जनूकाही स्पृश्य व अस्पृश्यातीलच युद्ध होते. इ.स. १७५७ मधील प्लासीच्या लढाईत ही महरांनी मोठा पराक्रम गाजविला होता. इ.स. १८०२-०३ साली झालेल्या दुसऱ्या इंग्रज मराठा युद्धात महारांनी आपल्या तलवारीचे पाणी पेशव्यांच्या सैन्यास पाजवून ब्रिटिशांना विजय मिळ्वून दिला. हवालदार सुभनाक वाहनाक, मदनाक येसनाक,| हवालार धोंडनाक पुंडनाक यांनी वेगवेगळ्या प्रसंगात ब्रिटिशांना मदत करून मोठे बक्षिस व बढती मिळवली होती. ५ नोव्हेंबर १८१७ च्या खडकीच्या लढाईत महार सैनिकांनी पेशव्यांच्या सैन्याची दाणादाण उडवली. महारांनी हे युद्ध पेशव्याविरूद्ध न लढता त्यांच्या प्रवृत्तीविरुद्ध लढल्याचे दिसून येते. शेवटी १ जानेवारी १८१८ मध्ये ब्रिटिश आणि पेशवे यांच्यात इतिहासाला विशेष नोंद घ्यावी लागली अशी लढाई झाली. ती म्हणजे कोरेगावची लढाई होय. ज्या लढाईने अनेक वर्ष सत्ता करणाऱ्या पेशवाईचा कायमचा अंत घडवून आणला. या युद्धात २० महार मृत्यू पावले तर ३ जन जखमी झाले. या सर्वांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ब्रिटिशांनी भिमा कोरेगाव येथे मोठा विजयीस्तंभ उभारून

त्यावर मृत्यू व धारातिर्थी पडलेल्यांची नावे कोरली आहेत. महारांचा हा पराक्रम पाहूनच भविष्यात ब्रिटिशांनी बॉम्बे इन्फ्रन्ट्रीची निर्मिती करून त्यात महारांना मोठे स्थान दिल्याचे दिसून येते; परंतु ब्रिटिश देखील नंतर बदलले. त्यांची सत्ता भारतात मोठ्या प्रमाणावर स्थिर झाल्यानंतर त्यांनीही स्थानिक उच्चवर्णीयांना खूश करण्यासाठी महारांना लष्कर बंदी करून त्यांच्यावर अन्याय केला. ''ब्रिटिशांनी उच्चवर्णीय लोकांना खूश करण्यासाठी व महारादी अस्पृश्य समजलेल्या लोकांना दुसरा कोणीचवाली नसल्यामुळे इंग्रज सरकारने लष्करातील वरिष्ठ दर्जाच्या व इतर जागा महारांना देण्याची बंदी केली.''[१३] म्हणून पुढे भारताच्या स्वातंत्र्य लढ्यात अनेक महारांनी भाग घेऊन ब्रिटिशांना भारत सोडण्यास भाग पाडले. या बद्दल आलेक्झांडर रॉबर्टसन असे म्हणतात की, ''भारतात ब्रिटिश साम्राज्य प्रस्थापित करण्याच्या प्रक्रियेत लहानसहान भाग महारांनी घेतला नाही तर फार मोठा भाग घेतला. ब्रिटिश माणसाच्या घरात काम करण्यात देखील महारांचा लहान सहान भाग नव्हता. ब्रिटिश हे महारांचे ऋण विसरले म्हणून त्यांच्या साम्राज्याला उतरती कळा लागल्याचे कारण नसेलही परंतु एक तत्कालीन परिस्थिती अवश्य आहे.''[१४]

वरील सर्व घडलेल्या घटना व प्रत्येक घटनेत महारांनी बजावलेल्या भूमिका या सर्व बाबींचा चिकित्सक अभ्यासकेल्यानंतर खालील प्रकारचे निष्कर्ष आपणास काढता येतील.

**निष्कर्ष :**

- महार हे भारतातील मूळ निवासी म्हणजेच भूमिपुत्र होते.
- आर्यांच्या पूर्वी महारांची राज्य भारतात होती.
- महार हे नागांचे वंशज आहेत.
- नाग या शब्दाचाच पुढे मध्ययुगीन काळात नाक असा अपभ्रंश झाला.
- महार हे राजकीय पराभवातून अस्पृश्य बनले होते.
- महार हा शब्द पराक्रमाशी संबंधीत आहे.

- महारातील पोटजाती ह्या ब्राह्मणी सुपीक डोक्यातून निघालेल्या कल्पना आहेत.
- महारांना राजकीय पराभवामुळे गुलाम म्हणून सर्व प्रकारची कामे नाविलाजास्तव व उदरनिर्वाहासाठी करावी लागली.
- महार हा न्यायव्यवस्थेतील प्रमुख घटक होता. याच्याशिवाय कसल्याच प्रकारचे न्यायदान होत नसे.
- महारामुळेच या प्रदेशास महाराष्ट्र हे नाव पडले.
- महार बुद्धिमान होते.
- महार गुन्हेगार किंवा चोर नव्हते.
- मुस्लिमसत्ता स्थिर करण्यात महारांचे मोठे योगदान होते.
- उच्चवर्णीय हिंदुच्या अत्याचारामुळेच अनेक महारांनी मुस्लिम धर्म स्विकारला.
- हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेत महारांचा सिंहाचा वाटा होता.
- पेशवाईत देखील महारांनी मोठा पराक्रम गाजविला.
- महाराष्ट्रातील पेशवाईचा अस्त महारामुळे झाला.
- ब्रिटिश सत्ता भारतात स्थिर करण्यात महारांचे मोठे योगदान होते.
- ब्रिटिश महारांचे ऋण विसरले म्हणून त्यांना भारत सोडावा लागला.

मध्ययुगीन कालखडातील सर्व घटनांचा आढावा घेतल्यास शेवटी असे म्हणता येईल की, महारांनी सर्वच शासकांच्या कालखंडामध्ये इमाने इतबारे काम करून आपल्या पराक्रमाच्या जोरावर सर्वांना मोठे सहकार्य केले; परंतु जवळ जवळ सर्व सत्ताधिशांनी प्रसंगानुरूप महारांच्या ताकदीचा उपयोग करून घेतला व काम झाल्यानंतर त्यांची उपेक्षा केली. म्हणून ही जात मराठा कालखंडामध्ये शेवटपर्यंत उपेक्षितच राहिली असे म्हणण्यास हरकत नाही.

## संदर्भग्रंथ सूची


१. डॉ. सोनसळे सा. द., भीमा कोरेगावची शौर्यगाथा, पृ. १३

अ. नवलकर ह. ना., शिवराम जानबा कांबळे चरित्र, पृ. ३८

२. कित्ता, पृ. ६४, ६५

अ) मंगूडकर मा. प., (संपा.) शिंदे लेखसंग्रह, पृ. १३७

३) भिक्षू सिवली बोधी, (अनु.) (आलेक्झांडर रॉबर्टसन) महारलोक, पृ. ३८

४) देशमुख मा. म., युगप्रवर्तक शिवराज आणि मराठ्यांची शौर्यगाथा, पृ. ५२

५) भिक्षू सिवली बोधी, (अनु.) उपरोक्त, पृ. २६

A) Alexander Robertson, The Mahar Flok, P. 33

६) खैरमोडे चा. भ., अस्पृशयांचा लष्करीपेशा, पृ. २

७) ओतूरकर रा. वी., पेशवेकालीन सामाजीक व आर्थिक पत्रव्यवहार, लेख १५६, पृ. ११४

८) बाड ग. चि. / पारसनिस द. बा., (संपा.) पेशवे रोजनिशी, खंड ८ नोंद ११२५

९) राजवाडे वि. का., (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड २४, लेख २२९

१०) कान्होबा मोरोबा (संपा.) फाटक न. र., घाशीराम कोतवाल, पृ. ५९

११) पाससनिस द. बा. (संपा.) इतिहाससंग्रह, खंड १, पृ. १३, १४

१२) राजवाडे वि. का., उपरोक्त, खंड २४, लेख १५

१३) वसंत मुन / हरी नरके / प्रा. गोडघाटे / डॉ. कासारे / कांबळे, (संपा.) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे, खंड १८, भाग १, पृ. २५६

अ) खरात शंकरराव, महाराष्ट्रातील महारांचा इतिहास, पृ. १६१

१४) भिक्षू सिवली बोधी, (अनु.) उपरोक्त, पृ. ६८

A) Alexander Robertson, Ibid, P. 93

# संदर्भग्रंथ सूची

## प्रकाशीत मूळ साधणे


| | | |
|---|---|---|
| १. | ओतूरकर रा. वि. (संपा.) | 'पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्र व्यवहार', भा. इ. सं. मं. पुणे १९५० |
| २. | केतकर द. वी. | 'इतिहासातील अंत:प्रवाह' अनाथ विद्यार्थी ग्रह, ६२४ सदाशिवपेठ, पुणे २ प्र. आ. सप्टेंबर इ. स. १९५७ |
| ३. | कर्वे चि. ग. (संपा.) | 'पुणे नगर संशोधन वृत्त', ४ खंड, पुणे नगर संशोधन समिती व भा. इ. स. मं. पुणे - ३०, १९५२ |
| ४. | केळकर न. चि. व आपटे द. वि. | 'शिवाजी-निबंधावली भाग' २, श्री शिवचरित्र कार्यालया तर्फे कार्यालयाचे चिटणीस न. चि. केळकर व आपटे द. वि. ३१२ सदाशिव पेठ, पुणे - ०२ |
| ५. | खरे ग. ह. (संपा.) | 'शिवचरित्र वृत्त संग्रह', खंड - ३, भा. इ. स. मं. पुणे |
| ६. | खरे ग. ह. / जोशी श. ना. | 'ऐतिसिक मराठी साधने', भारत इतिहास संशोधन मंडळ १३२१ सदाशिवपेठ पुणे - ०३, इ. स. १९८३ |
| ७. | खरे वा. वा. (संपा.) | 'ऐतिहासिक लेख संग्रह', खंड - १५, भा. इ. स. मं. पुणे |
| ८. | खोबरेकर वि. गो. (संपा.) | 'शिवकालीन कागदपत्रे' शासकिय सेंट्रल प्रेस, पुरातत्व विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई, जून १९७४ |
| ९. | गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस मुंबई | 'शाहू आणि संभाजी' (परस्पर हितसंबध) (पेशवे दप्तरातून निवडलेले कागद) गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई |
| १०. | जोशी श. ना. (संपा.) | 'शिवकालीन पत्रसार', संग्रह - ३ खंड, रायगड स्मारक मंडळ व भा. इ. सं. मंडळाच्या सहकार्याने चाललेले शिवचरीत्र कार्यालय, ३१२ सदाशिव पेठ, पुणे, १९३० |

| | | |
|---|---|---|
| ११. | जोशी श. ना. (संपा.) | 'संभाजीकालीन पत्रसार संग्रह', भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे - १९४९ |
| १२. | देशपांडे डॉ. प्र. न. | 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने', डॉ. प्र. न. देशपांडे, मुख्य चिटणीस राजवाडे संशोधन मंडळ, धुळे एप्रिल इ. स. २००२ |
| १३. | पवार आप्पासाहेब (संपा.) | 'ताराबाई कालीन कागदपत्रे', खंड ३, डॉ. उषा इथापे कुलसचिव शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, इ. स. १९७२ |
| १४. | पारसनिस द. बा. (संपा.) | 'ब्रहमेंद्रस्वामी धवडशीकर चरित्र व पत्रव्यवहार', निर्णय सागर प्रेस, मुंबई इ. स. १९६७ |
| १५. | पारसनिस द. बा. (संपा.) | 'पेशवे दप्तरातील व सनदापत्रातील माहिती', निर्णय सागर प्रेस मुंबई इ. स. १९१७ |
| १६. | पोतदार द. वा व मुजुमदार श. ना (संपा.) | 'सप्त संम्मेलन वृत्त', भा. इ. सं. मं. पुणे इ. स. १९१९ |
| १७. | बाड ग. चि / पारसनिस द. बा. (संपा.) | 'पेशवे रोजनिशी', ९ खंड, (पेशवे व सातारकर महाराज यांची रोजनिशी) पुणे इ. स. १९०६ ते ११ |
| १८. | बाड ग. चि / पारसनिस द. बा. (संपा.) | 'शाहु महाराज यांची रोज नीशी' |
| १९. | बाड ग. चि / (संपा.) पारसनिस द. बा. / मराठे / जोशी | 'सवाई माधवराव रोजनिशी' खंड २ |

| | | |
|---|---|---|
| २०. | बेंद्रे वा. सी .(संपा.) | 'महाराष्ट्रेतिहासाची साधने' , ३ विभाग मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय , १७२ नायगाव क्रॉस रोड दादर मुंबई - १४ |
| २१. | भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे | 'शिवचरीत्र सहित्य',, १५ खंड |
| २२. | भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे | 'ऐतिहासीक संकिर्ण साहित्य' , १७ खंड |
| २३. | भावे वि. ल. | 'श्रीमंत महाराज भोसले यांची बखर' मराठी दप्तर रूमाल पहिला मराठी दप्तर कार्यालय , ठोणे , शके इ. स. १८३९ |
| २४. | राजवाडे वि. का. (संपा.) | 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' , २५ खंड भा. इ. सं. मं. पुणे |
| २५. | सरदेसाई गो. स. (संपा.) | 'पेशवे दप्तर' , ४५ खंड , गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस , मुंबई सरकार , इ. स. १९३० ते १९३४ |
| २६. | सरदेसाई गो. स. | 'ऐतिहासीक पत्रबोध' , गिरगाव मुंबई , ति. आ. इ. स. १९६३ |
| २७. | सेतुमाधवराव पगडी | 'मोगल आणि मराठे' , ठोकळ प्रकाशन , ६२ बुधवारपेठ पुणे २ , प्र. आ. इ. स. १९६३ |
| २८. | सोहनी कृष्णाजी वि. / साने का. ना. (संपा.) | 'पेशव्याची बखर' , मॉडर्न बुक डेपो , पुणे - २ , शके १८४७ इ. स.१९२५ |

## दुय्यम साधने


| | | |
|---|---|---|
| १. | अत्रे त्र्य. ना. (अनु.) (एम केनेडी) | 'गुन्हेगारी जाती', वरदा बुक वरदा, ३९७ - १ से. बापट मार्ग पुणे - १६, इ. स. १९११ |
| २. | आत्रे त्रि. ना. | 'गावगाडा' ह. वी. मोटे प्रकाशन, ३ वेस्ट व्ह्यु दादर मुंबई, ति. आ. इ. स. १९८९ |
| ३. | औचरमल ल. या. | 'निजामकालीन मराठवाड्यातील समाजरचना व अस्पृश्याचे स्थान', अप्रकाशित पीएच. डी. प्रबंध, मराठवाडा विद्यापीठ औरंगाबाद इ. स. १९८६ |
| ४. | आंबेडकर डॉ. बी. आर. | 'महार आणि त्यांचे वतन', अशोक प्रकाशन, नागपूर इ. स. १९८८ |
| ५. | कठारे डॉ. अनिल | शिवकाळ व पेशवाईतील महारांचा इतिहास, कल्पना प्रकाशन, शिवाजी नगर नांदेड, जाने. इ. स. २००२ |
| ६. | कठारे डॉ. अनिल | 'मराठे कालीन सरकारी अधिकारी व त्याचे गैरवर्तन' सुगावा प्रकाशन पुणे |
| ७. | कान्होबा मोरोबा (संपा.) (फाटक न. र.) | 'घाशिराम कोतवाल', मराठी मुंबई ग्रंथ संग्रहालय, मुंबई दुसरी अवृत्ती इ. स.१९६१ |
| ८. | कुलकर्णी अ. रा. | 'शिवकालीन महाराष्ट्र', शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर इ. स. १९७७ |
| ९. | केतकर श्री. व्यं. | 'प्राचीन महाराष्ट्र सातवाहन पर्व' वरदा बुक्स, ३९७-१, सेनापती बापट मार्ग, पुणे दु. आ. जानेवारी १९८९ |

१०. कोलारकर डॉ. श. गो. 'मराठ्यांचा इतिहास' मंगेश प्रकाशन २३ फार्म लॅंड, नवी, रामदास पेठ, नागपूर - १० चौथी आ. १९९५

११. कोसारे एच. एल. 'प्राचीन भारतीय नाग', ज्ञानदीप प्रकाशन, नवी शुक्रवारी, शिर्के रोड, नागपूर - १९८९

१२. खरात डॉ. प्रकाश (संपा.) 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे' खंड - १, सुगावा प्रकाशन पुणे - ३० प्रथम आ. इ. स. २००३

१३. खरात शंकरराव 'महाराष्ट्रातील महारांचा इतिहास' डॉ. शकुंतला खरात, १२ विजय हाऊसिंग सोसायटी, पुणे विद्यापीठ मार्ग, पुणे-१६, इ. स. २००३

१४. खांबे सुधाकर 'शौर्य आणि पराक्रमाचे प्रतिक भिमा कोरेगावचा विजयीस्तंभ', सौ. सुजाता खांबे, चौरे ब्रदर्स. के १३५, शास्त्रीनगर, पुणे - ६ प्रथम आ. जाने इ. स. २००६

१५. खैरमोडे चा. भ. 'डॉ. बी. आर. आंबेडकर चरित्र' १२ खंड, सुगावा प्रकाशन, पुणे-३०, चौथी आ. ऑक्टोबर इ. स. १९९२

१६. खैरमोडे चा. भ. 'अस्पृश्यांचा लष्करीपेशा', सचिव महाराष्ट्र राज्य, साहित्य आणि संस्कृती मंडळ मुंबई - ३२, इ. स. १९९२

१७. गवळी डॉ. पी. ए. 'पेशवेकालीन समाज व जातीय संघर्ष' प्रचार प्रकाशन, कोल्हापूर इ. स. १९८२

१८. गवळी डॉ. पी. ए. 'सरंजामशाही' प्रियदर्शी प्रकाशन कोल्हापूर

१९. गवळी डॉ. पी. ए. 'पेशवेकालीन महाराष्ट्र' कैलास पब्लिकेशन औरंगाबाद,

२०. गवळी डॉ. पी. ए. 'पेशवेकालीन गुलामगीरी व अस्पृश्यता' प्रचार प्रकाशन कोल्हापूर डिसे. इ. स. १९८१

२१. गाठाळ डॉ. एस. एस. भारताचा इतिहास (१६३०-१८१८) कैलास पब्लिकेशन औरंगपुरा औरंगाबाद प्रथम आ. सप्टे इ. स. २००२

२२. गायकवाड प्रदिप (सचिव) (डॉ. आंबेडकर) आग्रलेख, बहिष्कृत भारत व मूकनायक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, समता प्रकाशन नवा नकाशा, लष्करीबान, नागपूर - १७

२३. गुरू गोपाळ चक्रनारायण 'एकच समाज महार - मराठा', सुधीर प्रकाशन, मू.- बोरगाव (मेघे) पो. वर्धागंज, ता. जि. वर्धा जाने इ. स. २००५

२४. गांजरे मा. फ. (अनु.) (डॉ. बी. आर. आंबेडकर) 'अस्पृश्य मुळचे कोण' ? व ते अस्पृश्य कसे बनले, अशोक प्रकाशन, नागपूर - २७

२५. जाधव श्रीराम 'भारतीय राजकारण आणि डॉ. आंबेडकर', बाबाभांड, साकेत प्रकाशन प्रा. लि. ११५ मा. गांधी नगर, स्टेशनरोड औरंगाबाद - ५, इ. स. १९९५

२६. जोशी लक्ष्मणशास्त्री (संपा.) 'राजवाडे लेख संग्रह', साहित्य अकादमी, नवी दिल्ली इ. स. १९५८

२७. जोशी शंकरराव (संपा.) 'मराठे कालीन समाजदर्शन', दि. दा. गांगल आनाथ

विद्यार्थी गृह प्रकाशन इ. स. १७८६ , सदाशिव पेठ , पुणे - २

२८. डहाट डॉ. धनराज — 'महाप्राण जोगेंद्रनाथ मंडळ' , संकेत प्रकाशन एन. आय. टी. व्यापार संकुल क्र. ६३ हिलरोड, गांधीनगर, नागपूर -१० प्र. आ. आक्टोबर इ. स. २००४

२९. डहाट डॉ. धनराज — बहुजनांचा मुक्तिपथ , संकेत प्रकाशन नागपूर १० , ऑगस्ट इ. स. २००६

३०. ढवळे प्रा. / बारगळ प्रा. — 'मराठ्यांचा इतिहास' , विद्या प्रकाशन रूईकर मार्ग , नागपूर २ इ. स. १९९६

३१. ढेरे रा. चि. — 'लज्जागौरी' , श्रीविद्या प्रकाशन पुणे इ. स. १९७८

३२. तिवारी डॉ. बलभद्र (अनु.) (कर्नल वी. लंगर) — 'सदैव आग्रगामी' , ब्रीगेडिअर , एम. आर. निकम कमांण्डेट , महार रेजिमन्ट केंद्र , सागर (मध्यप्रदेश) इ. स. २००२

३३. दांडेकर गो. नि. — 'महाराष्ट्र दर्शन' , मॅजेस्टिक बुक्स स्टॉल , गिरगाव मुंबई इ. स. १९८२

३४. दीक्षित बा. अ. — 'नागवंशीय - आंबेडकर चळवळीतील महारांचे योगदान' केनबोधी दईनिची न्योराई प्रकाशन , नागपूर - १७ द्वि. आ. इ. स. १९९९

३५. देशपांडे ब्रह्मानंद (संपा.) — 'श्री एकनाथ महाराजांची भारूडे' कैलास पब्लिकेशन , औरंगाबाद

| | | |
|---|---|---|
| ३६. | देशमुख मा. म. | 'युगप्रवर्तक शिवराज आणि मराठ्यांची शौर्यगाथा' विश्वभारती प्रकाशन , धनवटे चेंबर सीताबर्डी नागपूर , द्वि. आ. फेब्रु. इ. स. १९९९ |
| ३७. | नवलकर ह. ना. | 'शिवराम जानबा कांबळे चरित्र' , सुगावा प्रकाशन ८६१/१ सदाशिवपेठ पुणे , पुणे - ३० , इ. स. १९८७ |
| ३८. | नाथमाधव | 'स्वराज्याची स्थापना' , अ. अ. कुलकर्णी कॉन्टीनेन्टल प्रकाशन विजयनगर पुणे प्र. आ. १९३५ |
| ३९. | पवार प्रा. जयसिंग | 'छ. शिवाजी महाराज' , असंधती प्रकाशन शिवतेज १०८ साने गुरूजी वसाहत , राधानगरी रोड , कोल्हापूर - २ , दु. आ. मे. इ. स. १९८१ |
| ४०. | पुरंदरे ब. मा. | 'राजा शिवछत्रपती' राजहंस प्रकाशन , १०१५ सदाशिवपेठ , पुणे ०२ |
| ४१. | फडके य. दि (संपा.) | 'म. फुले समग्र वाङ्मय' महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ , नवीन प्रशासन , भवण मंत्रालयासमोर मुंबई - ३२ , पाचवी आ. इ. स. १९९१ |
| ४२. | फाटक न. र. (संपा.) (रानडे म. गो) | 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' , महाराष्ट्रराज्य साहित्य व संस्कृती मंडळ मुंबई , इ. स. १९६४ |
| ४३. | फुले जोतिराव | 'पवाडा छ. शिवाजी राजे भोसले' यांच, ओरिएंटल छापखाना मुंबई-१८६९. |
| ४४. | भवरे डॉ. एन. जी. | 'प्राचीन नागलोक व महाराष्ट्रातील बौद्ध धर्म प्रसार', संबोधी - स्मरणिका, बौद्ध भिखू संघ समिती, नांदेड. जाने इ. स. १९८९ |

| | | |
|---|---|---|
| ४५. | भागवत राजारामशास्त्री | 'राजारामशास्त्री भागवत यांचे निवडक लेख' |
| ४६. | भांडवलकर प्रा. एस. एस. | 'भारताचा इतिहास' (१७५०-१८५६) अभिजीत पब्लिकेशन नंदनवन कॉलनी मजगेनगर , कव्वा रोड , लातूर प्र. आ. जून इ. स. २००३ |
| ४७. | भावे वा. कृ. | 'पेशवेकालीन महाराष्ट्र भारतीय इतिहास अनुसंधान परिषद ' ३५ फिरोजशहा पथ , नवी दिल्ली ऑक्टो इ. स. १९७६ |
| ४८. | भिक्क्षू सिवली बोधी (अनु.) (आलेक्झांडर रॉबर्टसन) | 'महारलोक' , सुगत प्रकाशन, ७८०, वैशालीनगर, नागपूर-१७ द्वि. आ. ऑक्टोबर इ. स. १९९१ |
| ४९. | माटे श्री. म. | 'उपेक्षितांचे अंतरंग' कॉन्टिनेन्टल प्रकाशन , विजयनगर पुणे , ३० इ. स. १९८६ |
| ५०. | मून वसंत/नरके हरी/(संपा.) प्रा. अशोक /गोडघाटे/ प्रा. डॉ. कासारे / कांबळे | 'डॉ. बाबसाहेब आंबेडकर यांची भाषणे' , खंड १८ ३ भाग , आंबेडकर चरित्रसाधने प्रकाशन समीती , महाराष्ट्रशासन शासकिय कुटीर क्र. १८ , मंत्रालयासमोर मुंबई २१ प्र. आ. ऑक्टो. इ. स. २००२ |
| ५१. | मंगूडकर मा. प. (संपा.) | 'शिंदे लेख संग्रह' , ग. ल. ठोकळ प्रकाशन, २६ बुधवार पेठ, पुणे-२, इ. स. १९६३ |
| ५२. | मोरे चिंतामण | 'रणझुंजार शिदनाक' , सुगावा प्रकाशन ५६२ , सदाशिवपेठ , चित्रशाळा इमारत , पुणे - ३० , द्वि. आ. फेब्रु. इ. स. २००६ |
| ५३. | लोखंडे हि. गो. (भाऊ) | 'डॉ. आंबेडकरी सैनिकाची गौरवगाथा' , भाग १ , सुधीर प्रकाशन बोरगाव (मेघे) वर्धा |

५४. वाडेकर दे. दे. / कर्वे चि. ग. (संपा.) टिकेकर श्री. रा. 'चाफेकर संस्मृती' , म. गो. जोशी ६२३ / १५ सदाशिव पेठ, चाफेकर संस्मृती समिती पुणे . नोव्हे. इ. स. १९४६

५५. वालदेकर का. रा. 'महार आणि मराठे सांस्कृतीक अनुबंध' , संकेत प्रकाशन एन. आय. टी. व्यापार , संकुल क्र. ६३ , हिल रोड गांधी नगर , नागपूर १० , ऑक्टो. इ. स. २००५

५६. वैद्य डॉ. सुमन / कौठेकर डॉ. शान्ता 'आधुनिक भारताचा इतिहास' (१७५७-१८५७) ललिता पुरानिक श्री साई प्रकाशन , १ भगवा घर कॉम्प्लेक्स धरमपेठ , नागपूर १० , प्र. आ. जूलै. इ. स. १९९८

५७. शिंदे (महर्षि) वि. रा. 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' , कौशल्या प्रकाशन, एन-११, सी ३/२४/३, हडको, औरंगाबाद-०३, एप्रिल इ. स. २००३

५८. शेवजवलकर त्र्यं. श. 'श्री शिवछत्रपती प्रस्तावना आराखडे व साधणे' , मराठा मंदिर प्रकाशन मुंबई इ. स. १९६४

५९. शेणोलीकर ह. श्री. देशपांडे प्र. न. 'महाराष्ट्र संस्कृती : घडण आणि विकास' , मोघे प्रकाशन, कोल्हापूर-१९७२

६०. सरदेसाई गो. स. (संपा.) 'मराठी रियासत' खंड १, स्थिर बुध्दी राजाराम के. वी. ढवळे, श्री समर्थ सदन , गिरगाव मुंबई - ४ , दु. आ. इ. स. १९७५

६१. सरदेसाई गो. स. (संपा.) 'मराठी रियासत उत्तर विभाग' गणेश महादेव आणि कंपनी , ६०८ , सदाशिव पेठ पुणे , सप्टे. इ. स. १९२९

६२. सिंगारे डॉ. अनिल — 'दक्षिण भारताचा इतिहास', कैलास पब्लिकेशन औरंगाबाद इ. स. १९९६

६३. सोनसळे डॉ. सा. द. — 'भिमा कोरेगावची शौर्यगाथा' सुमेध प्रकाशन, पुणे - १६, २००७

६४. सोमवंशी बी. सी. — 'भारतीय जातिसंस्थेत मातंगाचे स्थान आणि महार- मांग संबंध', आनंद प्रकाशन औरंगाबाद, ऑगस्ट इ.स. १९८९

## English Books

1. Alexander Robertson — The Mahar Flok, Dr. Ashok Gaikwad, Kaushalya Prakashan , N 11, C-3/ 24/3, Hudco Aurangabad, Se. Ed. 2005

2. Bendrye V.S. — Maharastra of shiva shahi period (17th century) Phoneix publication Bombay 1946

3. Bhat Wamanrao — 'The Harijans of Maharastra'.

4. Bombay Gazette — 'Bombay Gazetter' Vol - XVII

5. Digh V. G. — 'Peshawa Bajirao Ist and Maratha Expansion' , Karnatak Publishing House, chira Bazar, Bombay

| | | |
|---|---|---|
| 6. | Elphinstone Mounstuart | 'Territiories comqured from the Paishwa' - A. Reports, Orientel Pub lishers 1488 Pataudi House Darya Ganj] Delhi, 1973 |
| 7. | Guha J. P. (Edi) (Grant Duff.) | 'History of Maratha', Vol-I , Associ ated Publishers House , Delhi 1978 |
| 8. | Government of Maharastra | 'Gazetter of Inda Maharastra' , State History , Part III , Government of Maharastra Publication , Bombay. |
| 9. | Kamble N. D. | 'Deprived castes and Their struggle for Equality' , S. B. Nangia, Ashish Publishing House, 8/18, Punjabi Bagh, New Delhi 26, 1983 |
| 10. | Kulkarni A. R. | 'Maharastra in the age of shivaji' , Poona 1969 |
| 11. | Pital Sr. Cadal | 'History of the Bombay Army' |
| 12. | Russal R.V. and Hiralal | 'Tribes and caster of the general Provinces' , of India Rajhani Book Center, Dilhi |
| 13. | Sen S. N. | 'Administrative system of the Maratha', K. P. Bagchi and company calcatta , 1976 |

14. Sen S. N. 'Militory system of the Maratha' , Ori ental Langhams Pvt. Calcatta. Th. Ed. 1958

15. Sardesai G. N. 'New History of the Maratha' Vol 2, Phonix Publication, Girgaon, Bombay, 1958

## त्रैमासिक - शब्दकोष - वृत्तपत्रे

१. कर्वे चि.ग./जोगळेकर स. आ. / जोशी य. गो. (संपा.) 'महाराष्ट्र परिचय अर्थात संयुक्त महाराष्ट्राचा ज्ञानकोश' प्रसाद प्रकाशन , पुणे इ. स. १९५४

२. केतकर श्री. व्यं (संपा.) 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' , खंड १८ , महाराष्ट्र ज्ञानकोश मंडळ लि. नागपूर श्री. व्य. केतकर ८४१ , सदाशिवपेठ , पुणे

३. कांबळे बबन गणपत (संपा.) 'वृत्तरत्न सम्राट' , दि. १८ मे २००६ , **वर्ष ४ थे,** अंक ४४ वा

४. गोडबोले रघुनाथ भास्कर (संपा.) 'श्री भारत वर्षिय प्राचीन ऐतिहासीक कोश' , चित्रशाळा प्रेस , १०२६ सदाशिव पेठ , पुणे इ. स. १९२८

५. जोशी महादेशवशास्त्री (संपा.) 'भारतीय संस्कृतीकोश' , खंड ७ , भारतीय संस्कृती कोश मंडळ , शनिवार पेठ पुणे ३०, २० मार्च १९९८

६. दाते य. रा / कर्वे (संपा.) 'सुलभ विश्वकोश भाग ५' , प्रसाद प्रकाशन, सदाशिवपेठ, पुणे २ , इ. स. १९५०

७. भारत इतिहास संशोधन मंडळ 'त्रैमासिक' ६२ , भा. इ. सं. मंडळ , पुणे.

| | | |
|---|---|---|
| ८. | भावे ह. अ. (विस्तार) (आपटे वा. ना.) | 'विस्तारित शब्दरत्नाकार' , भावे ह. अ. (वरदा बुक्स) ३९७/१,सेनापती बापट मार्ग, पुणे १६, जून इ. स. १९९६ |
| ९. | महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ | 'मराठी विश्वकोश', खंड १२ , म.रा.म.वि. निर्मिती मंडळ डी. ब्लॉक एन्स हटमेट, आझाद मैदान मुंबई ०१ , इ. स. १९८५ |
| १०. | मोल्सवर्थ | 'मराठी-इंग्रजी शब्दकोश', सुभदा सारस्वत पुणे - ति. आ. इ. स. १९७५ |
| ११. | मुंबई इतिहा संशोधन मंडळ | 'भारतीय इतिहास आणि संस्कृती' , त्रैमासीक, मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई |
| १२. | राजवाडे संशोधन मंडळ | 'संशोधक' , राजवाडे संशोधन मंडळ , धुळे |
| १३. | शर्मा राणाप्रसाद (संपा.) | 'पौराणीक कोश', ज्ञानमंडल लिमिटेड, वाराणसी १ , प्रथम संस्करण संवत २०२८ |


Battle of Khadki
5th Nov 1817
Dapodi
Mula
Khadki
Aundh
MARATHA CAVALRY
European Regt
Holkar Bridge
Range Hills
Ganeshkhind
MARATHA TROOPS
MARATHA CAVALRY
Old Residency
Mula
Mutha
MAP 12
Kilometre
Shanwar Wada
Pune

खडकी लढाई


KOREGAON
Enlarged Plan of
KOREGAON
Plan of the Defence of
KOREGAON,
Captain Staunton
Army of the Peshwa.

कोरेगाव लढाई नकाशा



परक्रमाचे प्रतिक भीमा कोरेगावचा विजयस्तंभ



बॉम्बे ग्रेनेडिअर बटालियनच्या सैनिकाचा पोशाख (इ.स.१८१८)




40445

महारांच्या पराक्रमामुळे कोरेगावचा स्तंभ ब्रिटीशांनी भविष्यात कॅप बॅच साठी वापरला